# प्रस्तावना

गुजरातीतील ऐतिहासिक आणि सामाजिक अशा दोन्ही कादंबऱ्यांचे प्रवाह जवळ-जवळ 108 वर्षांपूर्वीपासून एकदमच सुरू झाले आहेत. आजपर्यंत हे दोन्ही प्रवाह जवळजवळ समांतर वाहात आले आहेत. एक गोवर्धनराम सोडले तर इतर सर्वच महत्त्वाच्या गुजराती कादंबरीकारांनी ह्या दोन्ही प्रकारच्या कादंबऱ्या लिहिल्या आहेत.

ऐतिहासिक कादंबऱ्यांच्या पाठीमागची गुजराती लेखकांची मुख्य प्रेरणा म्हणजे देशाभिमान आणि देशभक्ती. ज्या कादंबरीत काल्पनिकतेचे प्रमाण वाढते त्यातील ऐतिहासिक तत्त्वाची सत्यता काहीशी कमी होते. तर काही कादंबऱ्यांतून ऐतिहासिक तत्त्वालाच चिकटून राहाण्याचा आग्रह धरलेला स्पष्ट दिसून येतो. आणि त्यामुळे त्यात ऐतिहासिक सुसंगती आढळली तरी अशी कादंबरी वाचकांच्या कल्पनाशक्तीला आवाहन देऊ शकत नाही, की वाचकांच्या मनात रसनिर्मिती करू शकत नाही.

ऐतिहासिक कादंबरी कच्ची असो की पक्की, तिच्या लेखकाचा कटाक्ष आपण निवडलेल्या कालखंडाचे यथातथ्य दर्शन घडवण्यावर, किंवा त्या कालखंडातील जीवनाचे कल्पनेला स्पर्शून जाईल अशा रीतीने सृजन करण्यावर जेवढा असतो त्याही-पेक्षा त्या कालखंडाचे वर्तमानाच्या संदर्भात निरूपण करण्यावर जास्त भर असतो.

सामाजिक कादंबऱ्या पाहिल्या तर त्यात लेखक जास्त करून स्वतःच्या काळातील समाजजीवनाचे दर्शन घडवतो. हे दर्शन काही कादंबऱ्यांतून अत्यंत वास्तव-वादी होते, तर काही कादंबऱ्यांतून भावनापूर्णतेने केलेले असते. त्याखेरीज, काही कादंबऱ्यांतून लेखकाचे समकालीन समाजजीवन म्हणजे एक स्वतंत्र आणि स्वायत्त जीवनखंड असावे, अशा रीतीने त्याचे वर्णन केलेले असते. काही कादंबऱ्यांतून दोन-तीन पिढ्यांच्या समाजजीवनाचे वर्णन करून त्याद्वारे त्या त्या पिढ्यांच्यातील साम्य व भेद स्पष्ट केला जातो. आणि त्यातून त्या त्या काळातील समाजजीवना-तील चांगल्या गुणांचे दर्शन किंवा विवेचन करण्याचा प्रयत्न केला जातो.

गुजराती सामाजिक कादंबऱ्यांतून बदलत जाणाऱ्या समाजजीवनाचे गडद फिके रंग रेखाटले गेले आहेत. आजपासून 108 वर्षांपूर्वी कादंबऱ्यांची सुरुवात झाली. त्या काळात इंग्रजांशी संबंध आल्यामुळे आपल्याला आपल्याच बालविवाह, जरठविवाह, कन्याविक्री, वराची विक्री, शारीरिक आणि मानसिक विसंगती (वधू-वरांतील), कौटुंबिक कलह, निर्जीव–निरर्थक रूढी, खोट्या समजुती, विवाह, मृत्यू यासारख्या प्रसंगांवर करण्यात येणारा मर्यादेबाहेरील खर्च, धर्माच्या नावाखाली चालणारी लफंगेगिरी आणि लुच्चेपणा, अशा अनेक सामाजिक अनिष्ट चाली खुपू लागल्या होत्या. त्यामुळे त्या काळातील कादंबऱ्यांतून यांपैकी एक ना एक तरी अनिष्ट प्रकारचे प्रतिबिंब पडलेले आढळते. जवळजवळ 95 वर्षांपूर्वीपासून विद्यापीठाच्या पदवीधरांचे लेखन प्रसिद्ध होऊ लागले. या लेखकांना सुसूत्र आणि विशाल पायावर आधारलेल्या उदारमतवादी शिक्षणाचा फायदा मिळालेला होता. त्यामुळे त्यांची दृष्टी विशाल आणि व्यापक बनली होती, मूलगामी आणि मर्मभेदी झाली होती. पाश्चात्त्य इतिहास, तत्त्वज्ञान, साहित्य आणि समाजशास्त्र यांबरोबरच पौर्वात्य संस्कृत ग्रंथांचाही त्यांनी अभ्यास केलेला होता. परिणामतः त्यांची देशाच्या उद्धाराची इच्छाही प्रबळ होती. हे जीवन सभ्य आणि सुसंस्कृत मनुष्याला शोभेल अशा रीतीने जगायला पाहिजे याची त्यांना जाणीव होती. म्हणूनच संसाराचे अधिष्ठान असलेला गृहस्थाश्रम ज्यायोगे निरामय, निर्मळ, स्वास्थ्यपूर्ण आणि प्रसन्न होईल अशा प्रयत्नांची ते पराकाष्ठा करीत होते. शहरांचा त्याकाळी विकास होत होता. खेडीपाडी उजाड होत होती. त्यामुळे एकत्र कुटुंबपद्धती जीर्णशीर्ण होऊ लागली होती. त्यामुळे, आणि 1885 मध्ये इंडियन नॅशनल काँग्रेसची स्थापना झाल्यानंतर सर्व राष्ट्राच्या सुशिक्षितांमध्ये जी जागृती होऊ लागली होती, त्यामुळे देशी संस्थाने, स्त्रीशिक्षण, स्त्री–प्रतिष्ठा, मध्यम आणि मजूर वर्गाचे जीवन, गरिबी अशा अनेक विषयांकडे आपल्या लेखकांचे लक्ष वेधले गेले. म्हणूनच त्या काळातल्या 1880 ते 1895 पर्यंतच्या पंडित युगाच्या कादंबऱ्यांतून या प्रश्नांची छाया थोड्याफार प्रमाणात नक्कीच पडलेली आढळून येते.

60 वर्षांपूर्वी पहिले महायुद्ध सुरू झाले. ते चार वर्षे चालले होते. ते चालू असताना आणि त्यानंतर पृथ्वीचा नकाशा बदलला. मानवी स्वातंत्र्य, मानवी समानता यांचे नवीन युग सुरू झाले. धर्म, राज्य आणि समाज यांचे केंद्रबिंदू बदलले. 1915 मध्ये गांधीजी आफ्रिकेहून परतले. गुजरात त्यांच्या सत्याग्रही चळवळीचे केंद्र

बनला. गांधीजींचे व्यक्तिमत्त्व आणि त्यांचे तत्त्वज्ञान यांची छाप सबंध देशावर आणि विशेषकरून गुजरातवर पडली. स्वातंत्र्य, सत्य, अहिंसा, स्त्री–पुरुष समानता, गरिबांबद्दलचे प्रेम, शोषणमुक्ती, हिंदु–मुस्लीम ऐक्य, अस्पृश्यता– निवारण, ग्रामोद्धार, विश्वबंधुत्व अशा विचारांचे वातावरण तयार झाले. जीवन हे सगळ्यात मोठे उपास्य दैवत आणि त्याग, तितिक्षा, पुरुषार्थ आणि पराक्रम यांचे उत्कर्ष-साधन मानले जाऊ लागले. गुजराती साहित्याच्या इतर दालनांप्रमाणेच कादंबऱ्यातूनही त्या भावनांचा पडताळा येऊ लागला. इतकेच काय पण कादंबरीचे स्वरूप आणि शैली याबद्दलच्या कल्पनाही बदलू लागल्या. त्यांचा विचार कमी झाला. पानांमागून पाने भरभरून केलेले तात्त्विक आणि सामाजिक विषयांचे विवेचन मागे पडले. दिपवून टाकणाऱ्या अलंकारांचे प्राबल्य आणि काव्यमय वर्णनांची माला नाहीशी झाली. भाषेतील पांडित्य नाहीसे झाले.

गांधीजींनी अुच्च दर्जाच्या नीतिमत्तेला धर्माची प्रतिष्ठा दिली होती. आणि गांधीजींच्या विचारांचा प्रभाव तत्कालीन गुजरातेतील लहानमोठ्या प्रत्येक साहित्यिकावर कमीजास्त प्रमाणात का होईना पण पडल्याशिवाय राहिला नव्हता. तरीसुद्धा कलेला नीतीच्या कचाट्यातून बाजूला ठेवण्याचा आग्रह धरणारा एक वर्ग गुजरातेतही होताच. त्यावेळी 'कलेसाठी कला' या विषयीचा वादही सुरू झाला. गुजराती कादंबऱ्यांतून खेड्यातील जीवनाला स्थान मिळाले होते. ऐतिहासिक किंवा सामाजिक, कसलीही कादंबरी असली तरी ती सरळ, वाचनीय बनावी असे प्रयत्न होऊ लागले. कादंबरीचे कथानक बंदिस्त आणि सुश्लिष्ट बनू लागले. पत्रलेखन धारदार बनू लागले. संवाद वास्तववादी आणि सजीव लिहिले जाऊ लागले. कथनशैलीत विनोद, रहस्यमयता आणि वक्रोक्तिपूर्णता या गुणांचा समावेश होऊ लागला. त्यातील गंभीरपणा कमी झाला निव्वळ शब्दचित्रांवरचा भर कमी झाला तसा रसाळपणावर भर वाढला. कादंबरीचे एकमेव उद्दिष्ट पक्के ठरले – आनंददायित्व.

35 वर्षापूर्वी दुसरे महायुद्ध सुरू झाले. ते 6 वर्षे चालले. त्या युद्धदरम्यान आणि नंतर जगात पुन्हा अभूतपूर्व, अश्रुतपूर्व क्रांती घडून आली. जगाने अणुयुगात पदार्पण केले. साम्राज्यवादाचा पाया डळमळू लागला. भारतासह आशिया व आफ्रिकेतील अनेक देश स्वतंत्र झाले. सर्वशक्तिमान मानले जाणारे इंग्लंड आणि यूरोप आता शक्तिहीन झाले. महासत्ता म्हणून आता अमेरिका आणि रशिया पुढे आले.

दुसऱ्या महायुद्धात कोटचवधी असहाय्य, निरापराधी लोकांची जी कत्तल झाली त्यामुळे माणसाची ईश्वरावरील, स्वतःच्या पौरुषावरील आणि भविष्यकाळावरील श्रद्धाच उडून गेली. जीवनाची निर्हेतुकता, निरर्थकता, बेशिस्ती, व्यक्तीचे एकलेपण, गौरवहीनता, किंकर्तव्यमूढता, वैफल्य, व्यक्तिमत्त्वाची मोडतोड आणि स्वातंत्र्य, या सर्व भावना पाश्चात्य साहित्यातून रेखाटल्या जाऊ लागल्या. त्याच भावनांची पावले इकडेही उमटू लागली. इकडच्याही साहित्यात उचलन धरली जाऊ लागली. स्वतंत्र भारतात निर्माण झालेली आर्थिक आणि राजकीय परिस्थिती, त्यातून झालेला अपेक्षाभंग यांमुळे या भावनांना खतपाणीच मिळाले.

याच काळात कादंबरीचा चेहरामोहरा पार बदलून गेला. 'कलेसाठी कला' हा वाद गांधीयुगात निर्माण झाला खरा; पण ह्याची मुळे त्या काळात रुजली नव्हती. या काळात तो पुन्हा पसरू लागला आणि त्याची पाळेमुळे खोलवर रुजून बसली. कलासृजनाव्यतिरिक्त कलाकृतीचे उद्दिष्ट दुसरे काही असू शकतच नाही. भावसंक्रमण किंवा मूल्याचा बोध हे त्याचे उद्दिष्ट असूच शकत नाही. कादंबरीचा नायक सुष्ट आहे की दुष्ट, उदात्त आहे की अधम हे आता महत्त्वाचे नसते. तो सुष्ट असो वा दुष्ट, उदात्त असो वा अधम, तो जे काही बनला ते कसा बनला हे पाहाणे महत्त्वाचे आहे. म्हणजेच पात्राचे ढोबळ वर्तन आणि त्या वर्तनामागील सूक्ष्म आणि कुटिल मनोव्यापार, या दोन्ही भूमिकांनी युगपद रचावे त्याप्रमाणे हल्ली कादंबऱ्यांचे कथानक असायला पाहिजे.

उद्दिष्ट निश्चित झाले की अर्थातच प्रवाह त्या दिशेने वाहत जातो. पण जिथे उद्दिष्टच निश्चित नसते तिथे त्याची गती कोणत्या दिशेला वळवायची? अशा स्थितीत निव्वळ आवर्तातूनच गती निर्माण होत असते. आणि पदविन्यास सरळ रेषेतून होण्याऐवजी वेड्यावाकड्या रेषेतून होत राहतो. त्यासाठी प्रतीकाची गरज भासू लागते.

म्हणून आधुनिक कादंबऱ्या प्रतीकप्रधान बनल्या आहेत. स्वतः घटना आधुनिक नसतात,तर घटनेचा निर्माता जे सूक्ष्मातिसूक्ष्म वर्णितो ते आधुनिक. फक्त आधुनिकच कशाला? कोणत्याही युगातील खऱ्या आणि मोठ्या कादंबरीकारांच्या दृष्टीने महत्त्वाचे असल्याने कादंबऱ्यांतून आता घटना नाहीशा होत आहेत. त्याऐवजी मनाच्या अजागृत, जागृत आणि अर्धजागृत संवेदना व्यापारांचे चित्रण हेच युगपद बनून गेले आहे. या सगळ्यामुळे त्यातून जे काही निर्माण होते, त्याचे अनुसंधान मात्र जाणूनबुजून अुत्तमाधिकाऱ्यांबरोबर होत असते. मध्यम प्रतीच्या

आणि हलक्या प्रतीच्या वाचकांबरोबरचा त्याचा संबंध सुटलेला आहे.

साहित्यिकांच्या आणि विशेषत: कादंबरीकारांच्या दृष्टीने हे इष्ट आहे का ? त्यामुळे मध्यम प्रतीचे व कनिष्ठ प्रतीचे वाचक आपली रसिकता शमविण्यासाठी म्हणा किंवा निव्वळ वेळ घालविण्यासाठी म्हणा सामान्याहून कमी दर्जाच्या म्हणाव्या अशा तऱ्हेच्या कादंबऱ्यांकडे वळू लागला आहे.

[ दोन ]

गुजराती कादंबऱ्यांच्या प्रारंभ काळापासून तो आजतागायत लिहिण्यात आलेल्या कादंबऱ्यांचा विचार केला तर कादंबऱ्यांचा प्रवाह तीन तऱ्हेने वाहात असल्याचे स्पष्टपणे जाणवते.

सर वॉल्टर स्कॉट यांच्या कादंबऱ्यांसारख्या कादंबऱ्या गुजरातीत लिहून घेतल्या पाहिजेत अशी सूचना सरकारी शिक्षणखात्याचे अधिकारी मि. रसेल यांनी केली होती. त्यानुसार नंदशंकर महेता (1835–1905) यांची 'करण घेलो' (1866) ही कादंबरी सगळ्यात पहिली कादंबरी मानली जाते. या कादंबरीत गुजरातचा अखेरचा हिंदू राजा करण वाघेला याच्या जीवनातील महत्त्वाच्या प्रसंगाच्या आधारे गुजरातेतील हिंदूराज्य कायमचे मावळण्याची कारणे सांगण्यात आलेली आहेत. कथा या दृष्टीने रसनिर्मिती आणि कलातत्त्व ह्या दोन कसोट्या तिला लावल्या तर ती बरीच कच्ची पडते. शिवाय या कादंबरीत ज्या जीवनाचे दर्शन घडते ते जीवन करणच्या काळातले नाही. ते लेखकाच्या काळातील जीवन आहे. परंतु तिच्यातील स्थळवर्णने, निसर्गवर्णने आणि प्रसंगवर्णने इतकी खुमासदार आणि रम्य उतरली आहेत की त्या शैलीमुळेच ही ऐतिहासिक कादंबरी आजही वाचनीय ठरते. त्या काळी तर ती इतकी लोकप्रिय झाली होती की त्या कादंबरीचे अनुकरण करून 'राणकदेवी', 'वनराज चावडो', 'सधरा जेसंग' अशा कादंबऱ्या लिहिल्या गेल्या. 'करण घेलो'चे भाषांतर मराठीतही करण्यात आले.

'करण घेलो' ही पहिली ऐतिहासिक कादंबरी मानली तर त्याआधी, परंतु त्याच सुमारास लिहिली गेलेली महीपतराम नीलकंठ (1829–1891) यांची 'सासुवहुनी लडाई' (1866) ही आपली पहिली सामाजिक कादंबरी ठरते. या कादंबरीत तत्कालीन समाजाचे दर्शन जसे घडते तसेच लेखकाच्या समाजसुधारणेच्या दृष्टिकोनाचेही प्रतिबिंब आढळते. परंतु या लेखकाजवळ आपले विचार आणि

संवेदना व्यक्त करण्याजोगी भाषाच नाही. त्यामुळे ह्या कादंबरीला महत्त्व मिळाले ते निव्वळ त्यात आढळणाऱ्या तत्कालीन सत्यघटनांच्या वर्णनामुळे, एक महत्त्वाचा दस्तऐवज म्हणून मिळालेले आहे. महीपतरामनी 'वनराज चावडो' आणि 'सधरा जेसंग' या दोन ऐतिहासिक कादंबऱ्याही लिहिलेल्या आहेत. साहित्यिक गुणाच्या दृष्टीने ह्या दोन्ही कादंबऱ्यांत काहीही खास नाही.

कालक्रमानुसार त्यांनी 'सासुवहानी लडाई' प्रथम लिहिली आहे. तरी-सुद्धा कादंबरीचा साचा, कितीही ओबडधोबड का होईना, पण प्रथम तयार झाला तो 'करण घेलो' मध्ये. त्यामुळे ह्या कादंबरीला केवळ पहिली ऐतिहासिक कादंबरी म्हणून नव्हे तर सर्वप्रथम कादंबरी म्हणूनच मानले जाते.

नंदशंकरनी सुरू केलेल्या प्रवाहातच 'राणकदेवी', 'अंधेरी नगरीनो गर्धवसेन', 'बे बहेनो' अित्यादी कादंबऱ्याही आढळून येतात. त्यांच्यापूर्वी प्रवाहाला नवीन वळण लावले ते गोवर्धनराम त्रिपाठी (1855–1907) यांच्या 'सरस्वतीचंद्र' (1887–1901) ने.

सरस्वतीचंद्र चार भागांत लिहिलेले आहे. सरस्वतीचंद्र, कुमुद आणि कुसुम यांच्या प्रणयकथेच्या अनुषंगाने या कादंबरीत संस्कृतीची कथा सांगितली आहे. ज्या काळात भारतात प्राचीन पूर्व, अर्वाचीन पूर्व आणि आधुनिक पश्चिम या संस्कृतीचा त्रिवेणीसंगम होत होता, त्या काळात सुशिक्षित, सुसंस्कारी, अभिजात व लोकसंग्राहक वृत्तीच्या माणसाचे आपली जात, आपले आप्तस्वकीय, आपला समाज, आपला देश, सबंध मानवजात इतकेच नव्हे तर जड आणि सचेतन भूतमात्र यांविषयीचे कर्तव्य काय असू शकते याचे रसाळ वर्णन यात करण्यात आलेले आहे. 'सरस्वतीचंद्र' मध्ये क्षुद्राहून क्षुद्र आणि पाशवी वृत्तीने जगणाऱ्या पात्रांनी सुरुवात करून अुच्च कोटीच्या आणि आध्यात्मिक वृत्तीच्या स्त्री आणि पुरुष पात्रापर्यंतच्या विविध छटांचे रेखाटन केलेले आहे. मानवी मनात खोलखोल चाल-लेल्या मंथनाचे आश्चर्यकारक विवेचन आहे. वर्णन अितके प्रभावशाली आहे, की प्रसंग डोळ्यांसमोर साक्षात अुभे राहातात. जीवनाशी ज्या ज्या विषयांचा संबंध येतो त्या प्रत्येक विषयाची तर्कशुद्ध, बुद्धीला पटेल अशा तऱ्हेने मीमांसा केली आहे.

कथावस्तू, वर्णनशैली, जीवनदर्शन यांच्या कसोट्या लावल्या तर 'सरस्वतीचंद्र'चे स्थान आजही अनन्य आहे. इतर कित्येक कादंबऱ्या सर्वांगसुंदर पर्वत असतील तर त्यातील नगाधिराज 'सरस्वतीचंद्र' आहे.

'सरस्वतीचंद्र'ने प्रवाहाला नवीन वळण लावले. ह्याच नवीन प्रवाहात

मणिलाल नभुभाई द्विवेदी यांची 'गुलाबसिंह', रमणभाई नीलकंठ यांची गुजराती साहित्यातील पहिली विनोदी सलग कादंबरी 'भद्रंभद्र', छोटालाल जीवनलाल मास्तर ऊर्फ 'विश्ववंद्य' यांची 'योगिनी कुमारी', भोगीन्द्रराय दिवेटिया यांच्या 'उषाकान्त', 'असिस्टंट कलेक्टर' आणि 'अजामिल' वगैरे, इच्छाराम. देसाईंची 'गंगा- एक गुर्जर वार्ता', चुनीलाल वर्धमान शहांची 'सोरठी सोमनाथ', मणिलाल छबाराम भट्टची 'पृथ्वीराज चौहाण अने चंदवरदायी', नारायण विसनजी ठक्करची 'पद्मिनी', मोतीलाल सट्टावाला यांची 'विक्रमनी वीसमी मदी' आणि अमृत केशव नायक यांची 'एम. ए बनाके क्यों मेरी मिट्टी खराब की ?' अशासारख्या असंख्य कादंबऱ्या आढळतात. या सगळयाच कादंबऱ्या लोकप्रिय झाल्या होत्या. मात्र त्यातील एकाही कृतीने कादंबऱ्यांच्या क्षेत्रात काहीही नवीन भर घातली नाही.

ही भर घातली ती कन्हैयालाल माणिकलाल मुनशी (1887 ते 1971) यांनी. 1915 मध्ये त्यांनी 'घनःश्याम' या टोपण नावाने लिहिलेली 'वेरनी वसूलात' 'गुजराती' साप्ताहिकातून क्रमशः प्रसिद्ध होऊ लागली. ह्या कादंबऱ्या नवीन कथावस्तू, नवीन पात्रे, नव्या तऱ्हेचे संवाद आणि नवा थाटमाट घेऊन आल्या. आणि गुजराती कादंबऱ्यांच्या प्रवाहाला दुसरे स्पष्ट आणि निश्चित वळण मिळाले.

मुनशींनी तेरा-चौदा ऐतिहासिक, पौराणिक आणि सामाजिक कादंबऱ्या लिहिल्या आहेत. त्यात सोळंकी युगाच्या कीर्तिगाथेची स्तुती करणाऱ्या तीन कादंबऱ्या 'पाटणनी प्रभुता', 'गुजरातनो नाथ' आणि 'राजाधिराज' यांचा समावेश होतो. महम्मद गिझनीने सोमनाथवर स्वारी केली तेव्हा त्याचा प्रतिकार करणाऱ्या भीमदेव सोळंकीच्या प्रेमाची व शौर्याची गाथा मानली जाणारी 'जय सोमनाथ', वंगभंगाच्या वेळी देशाला स्वातंत्र्य मिळवून देण्यासाठी गुजरातच्या तरुणांनी उराशी बाळगलेली स्वप्ने आणि त्या स्वप्नांचा नंतर झालेला निरास यांचे विवरण करणारी 'स्वप्नद्रष्टा', आर्यावर्ताच्या सीमा नर्मदेपासून हिमालयापर्यंत पसरविणाऱ्या महाभार्गवाचे जणू काही महिम्नस्तोत्रच असलेली 'भगवान परशुराम' यांचाही खास उल्लेख करायला पाहिजे.

मुनशींचा मध्यान्हीचा सूर्य तळपत होता त्याच वेळी स्वतःच्या तेजाने तळपत राहून लोकांची मने आपल्याकडे खेचून घेणाऱ्या कादंबरीकारांत प्रमुख आहेत, रमणलाल वसंतलाल देसाई (1892–1965).

मुनशींचे समकालीन किंवा त्यांच्यानंतरच्या लेखकांपैकी धूमकेतू यांनीही

सोळंकी युगाचे स्तोत्र असलेल्या 'चौलादेवी', 'राज्यसंन्यासी', 'कर्णावती', 'सिद्धराज जयसिंह' इत्यादी कादंबऱ्या लिहिल्या. परंतु त्यांपैकी एकही मुनशींच्या दर्जापर्यंत पोहोचू शकली नाही. किंवा लघुकथा लेखक धूमकेतूलाही त्या मागे टाकू शकल्या नाहीत. झवेरचंद मेघाणींनी 'वेविशाल', 'तुलसी क्यारो', 'सोरठ तारा वहेता पाणी' आणि 'गुजरातनो जय भाग 1–2' अशा सामाजिक व ऐतिहासिक कादंबऱ्यांतून गतकाळातील खानदानी, मान-मरातब आणि मनाचे औदार्य यांचे चित्र रंगवले. गंगेसारख्या परमपवित्र, वात्सल्यमूर्ती स्त्री-भूमिका निर्माण केल्या. आणि गुजराती माणसाच्या निरनिराळ्या छटांचे रम्य दर्शन घडविले. परंतु याही कादंबऱ्यांना नवीन मार्ग निर्माण करता आला नाही. किंवा त्यांच्यामुळे लोकगीत गायक आणि 'सौराष्ट्रनी रसधार'चे लेखक झवेरचंद मेघाणींच्या कीर्तीत भरही पडू शकली नाही. गुणवंतराय आचार्यांच्या विशेषतः सागरी साहसाच्या 'सक्करबार', 'मरफरोश', 'सरगोश' अशा कथांनी लोकांच्या मनात स्थान मिळविले खरे, परंतु त्या आणि 'देशदीवान', 'दरियालाल', 'हाजी कासम' 'नारी बीजली' वगैरे इतर कादंबऱ्याही मुनशींशी स्पर्धा करू शकल्या नाहीत, की त्यांना जाणकारांनी मान्यता दिली नाही. पन्नालाल पटेलांनी आपल्या 'वळामणा', 'मळेला जीव' आणि 'मानवीनी भवाई' या कादंबऱ्यांतून गुजराती खेड्यांचे जीवन हुबेहूब जिवंत केले. आणि कथा-लेखक म्हणून आपल्या अद्‌भुत कौशल्याने चिकित्सकांनाही दिपवून टाकले पण खेडे हे जसे त्यांचे सामर्थ्य ठरले तसा तो त्यांचा कमकुवतपणाही ठरला.

या सर्वच लेखकांची नावे गाजलेली आहेत, परंतु कादंबरीकार म्हणून रमणलाल देसाईंनी जे स्थान मिळवले आणि कित्येक वर्ष टिकवले ते स्थान, एक पन्नालाल पटेल सोडले तर, इतर कोणीही लेखक मिळवू किंवा टिकवू शकलेला नाही.

'जयंत', (1925), 'शिरीष' (1927) आणि 'कोकिळा' (1929) या रमणलालांच्या कादंबऱ्या बडोद्याच्या 'समाजविजय'च्या वार्षिक भेट पुस्तक-रूपाने प्रसिद्ध झाल्या तेव्हा त्यांनी गुजरातचे लक्ष्य फारसे वेधले नाही हे खरे; परंतु त्यानंतर त्या जेव्हा सुंदर रंगरूपात प्रसिद्ध झाल्या तेव्हा चांगल्याच गाजल्या. आणि गुजरातला मुनशींनंतरचा उल्लेखनीय कादंबरीकार लाभला.

त्यानंतर रमणलालांच्या एकामागून एक कादंबऱ्या बाहेर पडू लागल्या. त्या सर्वांनाच असामान्य लोकप्रियता मिळाली. प्रसन्न, पवित्र दांपत्य-जीवन,

रसपूर्ण प्रसंग व घटना, सूक्ष्म आणि निर्मळ विनोदवृत्ती, शक्यतेच्या मर्यादेत बसलेली आदर्शपरायण वृत्ती आणि भावपूर्णता, वास्तव जीवनाचे मार्मिक चित्रण आणि सरळ, मधुर, धारावाहिक शैली या सर्व गुणांचा विचार केला तर रमणलालांच्या कादंबऱ्यांनी गुजराती वाचकांच्यात, मुनशींचा माध्यान्हीचा सूर्य तळपत असतानाही, स्वतःचे असे स्थान मिळविले.

कल्पनाशक्तीची मर्यादा जशी मुनशींना नडली, गुजराती कादंबरीकारांना नडली, तशीच ती रमणलालनाही नडली. संपादक, प्रकाशक किंवा वाचक यांची मागणी अमान्य करणे अशक्य झाल्याने म्हणा किंवा सतत जनतेच्या नजरेसमोर राहण्याच्या वृत्तीने म्हणा, लिहिणाऱ्या प्रत्येक लेखकाला ही अडचण बहुधा भासतेच. ह्याच मर्यादेमुळे रमणलालांच्या नायक-नायिका एकाच मुशीतून काढलेल्या वाटतात. रमणलालांच्या कादंबऱ्या अनेकदा रहस्यमय कादंबऱ्यांसारख्या वाटतात. म्हणूनच त्या प्रतीतिपूर्ण होत नाहीत. रमणलालांची लेखनशैली आकर्षक निश्चितच आहे; परंतु त्यांचा वेग अत्यंत संथ आहे. त्यांचे कथानक सुश्लिष्ट असते. तसेच कित्येकदा ते अस्वाभाविक, असंभाव्य असते. त्यांच्या 'दिव्यचक्षू', 'ग्रामलक्ष्मी' आणि 'भारेलो अग्नि' नंतर त्यांची ताकद कमी होऊ लागली. आणि 'सौंदर्यज्योत', 'झंझावात' आणि 'प्रलय' यांचे कथानक विस्कळित झाले आहे, त्यातील कलात्मकता शिथिल झाली आहे.

ह्या इतक्या मर्यादा असल्या तरी रमणलाल मुनशींसमोर टिकून राहिले, आणि खऱ्याखुऱ्या अर्थाने 'लोकांचे लाडके' बनले हे सत्य आहे. सर्वसामान्य गुजराती कुटुंबातून मुनशींपेक्षा रमणलालच जास्त वाचले जात होते. विद्यापीठातून फारसे स्थान त्यांच्या कलाकृतींना मिळाले नाही. तरीसुद्धा रमणलालांच्या कादंबऱ्यांचा खप जास्त होता. लोकप्रियता ही काही साहित्यिक गुणवत्तेची कसोटी असू शकत नाही. तरीही रमणलाल केवळ लोकप्रिय लेखक नव्हते तर तत्कालीन विशेषाधिकारी विद्वानांच्या आदराला आणि अनुकूलतेला पात्र ठरले होते. मुनशींनी कादंबऱ्यांच्या प्रवाहाला वेगळे वळण लावले. परंतु काळातील अनेक नामांकित कादंबरीकारांपैकी ज्या कोणाचे नाव त्यांच्याशी अविभाज्य रीतीने जोडले जाते ते नाव रमणलालांचे आहे.

धूमकेतू, झवेरचंद मेघाणी, गुणवंतराय आचार्य इत्यादी लेखक रमणलालांचे जवळजवळ समकालीन. चुनीलाल वर्धमान शाह तसे पाहू जाता मुनशींचेही पूर्वसूरी. परंतु ज्यांना रमणलालांचे अनुगामी म्हटले जाते त्यात पन्नालाल पटेल, ईश्वर पेटलीकर, पीतांबर पटेल, मनुभाई पंचोली (दर्शक), चुनीलाल मडिया, निरंजन

वर्मा आणि जयमल्ल परमार, रामनारायण नागरदास पाठक, यशोधर महेता, पुष्कर चंदरवाकर, जयंती दलाल, बचुभाई शुक्ल, हरजीवन सोमैया, मोहनलाल महेता (सोपान), धीरुबेन पटेल, कुंदनिका कापडिया, शिवकुमार जोशी इत्यादींनी कादंबरीक्षेत्रात आपापली वैशिष्ट्यपूर्ण भर घातली आहे. त्यांच्यापैकी पन्नालाल पटेल आणि दर्शक यांची देणगी तर कित्येक काळ स्मरणीय ठरावी अशी आहे.

ह्यापैकी प्रत्येक लेखक आपापली नवीन कथावस्तू, नवीन पात्रे, नवी शैली घेऊन आला आहे आणि 'दर्शक' तर उदात्त दर्शन घेऊन आले आहेत. तसे असले तरी कादंबरीच्या गुणवत्तेच्या दृष्टीने पाहिले तर या सर्वच लेखकांचे नाते मुनशी, रमणलाल यांच्याशीच आहे.

हे नाते तुटले तेव्हा गुजराती कादंबरीला तिसरे वळण लागल्याचे स्पष्ट झाले. पंचवीस-एक वर्षापूर्वी सुरेश जोशी पाश्चात्त्य साहित्यावरून, विशेषतः त्याकाळी नवीनच असलेल्या साहित्य-मीमांसेवर आधारलेल्या कसोटचा घेऊन आले. तेव्हाच हे नवीन वळण मिळाले.

तत्कालीन गुजराती साहित्य-रसिकांच्यावर त्यांचा जो प्रभाव पडला तसा प्रभाव प्रा. बलवंतराय ठाकोर यांच्याखेरीज इतर कोणत्याही गुजराती साहित्यिकाचा तत्कालीन तरुणांवर क्वचितच पडला असेल.

नंदशंकर, गोवर्धनराम आणि मुनशी हे विचारप्रवाह घेऊन आले नव्हते. खुद्द कादंबरीच घेऊन आले होते. नंतर सुरेश जोशी 'छिन्नपत्र' घेऊन आले खरे, परंतु 'छिन्नपत्र' चा खास प्रभाव पडलाच नाही. त्यांच्या या विचारप्रवाहाच्या प्रभावाखाली आणि थोडयाफार त्यांच्या प्रत्यक्ष-अप्रत्यक्ष प्रभावाखाली लिहिणाऱ्या कादंबरीकारात चंद्रकान्त बक्षी, मधू, राय, रघुवीर चौधरी, श्रीकांत शाह, दिगीश महेता, राधेश्याम शर्मा, आणि किशोर जाधव हे प्रमुख आहेत. त्यांतील प्रत्येक लेखक सामर्थ्यवान आहे, प्रत्येकाची आपापली वैशिष्ट्ये आहेत. त्यांना यथायोग्य विद्वन्मान्यताही मिळालेली आहे. परंतु रंगमंचावर आलेली नाटके सोडली तर साहित्याच्या सर्वच स्वरूपात, एकटचा कादंबरीलाच जे शक्य आहे ते, बहुजनसमाजाच्या काळजाला हात घालण्याचे सामर्थ्य, यांतील कोणात अघुकही आढळत नाही.

**[ तीन ]**

असहकाराच्या युगात गुजरातेतील जीवनात जे बदल घडून आले, आणि गुजरात

एखाद्या शूरवीराचे जीवन जगू लागला, त्याचे अवलोकन करण्याचा त्यांचा एक प्रयत्न म्हणून रमणलाल 'दिव्यचक्षू' ची ओळख करून देतात. परंतु कथानक जसजसे पुढे सरकते तसतसे अरुण आणि रंजन यांच्या प्रणयकथेला प्राधान्य मिळत जाते, आणि गुजरातेत निर्माण झालेल्या नवचैतन्याचे चित्रण गौण बनत जाते. म्हणूनच 'दिव्य-चक्षू' ही गुजरातच्या राजकीय आणि सांस्कृतिक नवोत्थानाच्या कथेच्या निमित्ताने लिहिण्यात आलेली प्रणयकथा म्हणून ओळखावी लागते.

देशाचे नेते, देशसेवक, व्यापारी, सरकारी अमलदार यांच्याविषयी रमणलालांच्या मनात कमल्याही भ्रामक कल्पना नव्हत्या. तरीसुद्धा त्यांचे सौजन्य इतके आहे, की त्यानी जास्त भर दिला तो मानवी मनातील संदेशांवर. आणि कादंबरीचे लेखन भावपूर्ण भूमिकेतूनच केले. ते इतके कोवळ्या मनाचे आहेत, की किसनला मारून टाकणे त्यांना शक्य झाले नाही. आणि त्यांचे कौशल्य दिसते ते किसनच्या गंभीर आजाराचा उपयोग त्यांनी अस्पृश्यता निवारण्याच्या कामासाठी करून घेतला तेव्हा.

कौमुदी मासिकामाठी 'दिव्यचक्षू' तुकड्या-तुकड्यांनी लिहिली. गेली. त्यातच लेखकाचे अनवधान म्हणा किवा त्याच्या मर्यादा म्हणा, तीत बरेच कच्चे दुवे राहून गेले आहेत.

एक उणीव म्हणजे या कादंबरीतील घटना अत्यंत संथ आहेत. त्यातच पुन्हा वेळोवेळी लेखकाची चिंतने, मनने आणि टीका-टिपणे गतिभंजकाची (स्पीडब्रेकर्स) कामगिरी बजावतात. ह्या गतिभंजकातील कित्येक विचार आणि विनोद निश्चितच आनंददायी आहेत, तर कित्येक अगदीच सामान्य, रसहानी करणारे आहेत. कित्येक गतिभंजकातून (उदा. कंजूष चांगला की उधळ्या चांगला, ही चर्चा.) लेखक चर्चा निर्माण करतो. मात्र त्यावर आपला स्वतःचा अभिप्राय न देताच थांबतो. अनेकदा तो ममकालीन लोकमत आणि रूढी यांचे समर्थन करतो. प्रत्येक इंग्रजाचा पोर हा वाईटच असतो हे खरे नाही, असे रमणलाल आपल्या अनेक इंग्रजी पात्रांचे दृष्टान्त देऊन दाखवून देतात. तरीही इंग्रजांच्या राहण्या-वागण्याबद्दलची त्यांची मते अमहकार युगातील सामान्य लोकांच्या मतांपेक्षा निश्चितच वेगळी आहेत.

रमणलालांची भाषाशैली वर्णनाच्या वेळी जेवढी फुलते त्याहीपेक्षा जास्त संवादात फुलते. तिचा प्रवाह अनेक ठिकाणी संथ होतो. माझ्याजवळच्या तेराव्या आवृत्तीत असंख्य आणि कित्येकदा अर्थाचे अनर्थ करणारे मुद्रणदोष राहून गेले आहेत

त्यांची जबाबदारी अर्थातच रमणलालांवर नाही. परंतु त्यांच्या भाषेत अनेक ठिकाणी व्याकरणदृष्टचा अशुद्ध मानले जाणारे शब्दप्रयोग आले आहेत; तर कित्येक ठिकाणी भाषांतरित प्रयोग त्यांनी वापरले आहेत. वाक्यरचनेतही अनेकदा इंग्रजी ठेवण आढळते. असे असले तरी, विशेषतः रंजनचे अरुण आणि पुष्पाबरोबरचे संवाद म्हणजे संवादकलेचे उत्कृष्ट नमुने आहेत. या संवादातूनच पात्रांचे व्यक्तिमत्त्व फुलत जाते. आणि वाचक तऱ्हेतऱ्हेच्या लोकांच्या रसमधुर सृष्टींशी एकजीव होऊन जातो. भावपूर्ण तरुण रक्ताची प्रणयचित्रे रेखाटण्याची कला रंजन अरुणला उठवते त्या प्रसंगात, तसेच रंजन अरुणचा आत्महत्त्येचा प्रयत्न निष्फळ बनवून त्याच्यात सामावून जाते तो प्रसंग, अशातून दृष्टीला पडते. गुजराती साहित्यात ही कला वारंवार दिसून येत नाही.

**मनसुखलाल झवेरी**

# 1. प्रतिज्ञा

**स्वराज्यलाभप्रति पूरितात्मने**

**–श्रीमद्भागवत।**

एका छोट्याशा मोकळ्या मैदानात एक लहानसा ध्वज फडकत होता. ध्वजाच्याभोवती गोल धरून वीसेक तरुण उभे होते. सर्वांचे चेहरे गंभीर होते. सूर्योदयाची वेळ झाली होती. तारुण्यावस्था ओलांडून प्रौढत्वाकडे झुकणारा, चिंतामग्न चेहऱ्याचा एक तेजस्वी पुरुष त्या कोवळ्या चेहऱ्याच्या तरुणांच्यात उठून दिसत होता. युवकांच्या त्या रांगेत तो मेरुमणी शोभत होता.

एका तरुणाने आपल्या गोड-बुलंद आवाजात गायला सुरुवात केली. त्या गीताचा एकेक चरण तो म्हणे. बाकी त्याच्या पाठोपाठ गात होते.

युद्ध सुरू जाहले। वीर हो व्हा जागे
शुभ शांतीचा हा संग्राम
केशरी वस्त्र करा परिधान ।
वीर हो व्हा जागे ।।
अस्त्र शस्त्र ना गाजवायचे
शत्रूला ना भिववायाचे
शत्रुविरहित युद्धामध्ये या, द्या अपुले प्राण ।
वीर हो व्हा जागे ।।
विश्व व्यापले वैरविषाने
शिरे उडाली तलवारीने
तंटा, झगडा ह्यातच भरला अमर्याद अभिमान ।
वीर हो व्हा जागे ।।

स्नेहभरित ही नदी वाहू द्या
शुष्क रणी हिरवळ फुलवू या
गाजवा नाव गुर्जरांचे, करूनिया शिरकमले कुर्बान ।
वीर हो व्हा जागे ।।

समूहगीताने मन प्रभावित होते. आताही सगळ्यांची मने उचंबळून आली. उजळलेल्या पूर्वेतून वर येणाऱ्या सूर्याने आपला एक किरण त्या ध्वजावर टाकला. सूर्याचा आणि त्या ध्वजाचा तेजसंबंध जुळून आला.

गोलाच्या केंद्रबिंदूवरून तेजस्वी चेहऱ्याचा जनार्दन पुढे आला. ध्वजाजवळ जाऊन त्याने ध्वजाला भावपूर्ण वंदन केले. आणि गंभीर आवाजात तो शपथ घेऊ लागला.

'या ध्वजाच्या साक्षीने मी प्रतिज्ञा करतो की, या सत्याच्या लढाईत मी नेहमीच अहिंसेचे पालन करीन.'

मग ध्वजाकडे तोंड करून मागे चालत तो पुन्हा आपल्या जागेवर परत आला. एकामागून एक तरुण ध्वजासमोर गेले आणि त्यांनीही जनार्दनासारखीच प्रतिज्ञा केली. शेवटचा एक तरुण मात्र पुढे पाऊल टाकतानाच अडखळला. त्याच्या चेहऱ्यावर काहीशी अश्रद्धा आणि थोडी नाराजी स्पष्ट दिसत होती. गोलात तो सगळ्यात शेवटी, म्हणजेच जनार्दनच्या शेजारी डाव्या हाताला, उभा होता. पुढे जाताना अडखळलेल्या त्या तरुणाकडे सगळेच पाहू लागले.

'अरुण, थांबलाससा ?' जनार्दनने आर्जवाने विचारले.

'माझ्याच्यानं प्रतिज्ञा पाळली जाईल का ?'

'तू शपथ घेशील आणि ती पाळशील अशी माझी भावना होती. परंतु तुझ्याच्यानं ते होणार नसेल तर तू शपथ न घेणंच योग्य. माझा काहीही आग्रह नाही.' जनार्दन उत्तरला. त्याच्या आवाजातली नाराजी मात्र लपू शकली नाही.

गोलातल्या दोन-तीन तरुणांनी एकमेकांकडे अर्थपूर्ण नजरेने पाहिले. अरुण क्षणभर विचारात पडला. काही क्षण असेच गेले. मग अरुण निश्चयी पावले टाकीत पुढे झाला. आश्चर्यचकित होऊन सगळे त्याच्याकडे पाहू लागले. ध्वजाजवळ उभा राहून अरुण गंभीर आवाजात बोलू लागला.

'या ध्वजाच्या साक्षीने मी शपथ घेतो की, मी एक वर्षापर्यंत अहिंसेचे संपूर्ण पालन करीन.'

जनार्दनच्या गंभीर चेहऱ्यावर स्मित पसरले. तो म्हणाला,

'मला फार आवडलं हे अरुण. हे अहिंसामय एक वर्षच पुढच्या वर्षांनासुद्धा खेचून आणील.'

अरुण परत आपल्या जागेवर आला. इतर तरुणांच्यात सुरू झालेली नेत्र-पल्लवी आता थांबली. जनार्दन काही बोलायला सुरुवात करणार होता. तेवढ्यात समोरच्या एका घरातून एक तरुणी लगबगीने त्यांच्या दिशेने येताना दिसली. सगळे-जण तिच्याकडे पाहू लागले.

'काय ग, रंजन, काय झालं ?' जवळ आलेल्या त्या तरुणीला जनार्दनने विचारले.

ध्वजाला साक्ष ठेवून अहिंसाव्रताचे पालन करण्याची प्रतिज्ञा फक्त पुरुषांनीच घ्यायची होती. स्त्रिया जात्याच अहिंसक असतात, या समजुतीचा आधार घेऊन जनार्दनने सगळ्या स्त्रियांना शपथ घेण्याच्या कार्यक्रमातून गाळले होते.

जनार्दन थोडा विचित्र पुरुष होता. तो दिसायला जसा चमत्कारिक होता तसेच त्याचे वागणेही थोडे विचित्रच होते. त्याला ओळखणारांनी अनेकदा त्याला संपूर्ण साहेबी पोषाखात पाह्यले होते. तर काही वेळेला संपूर्ण खेडवळ पोषाखातही पाह्यले होते. अनेकदा तो अनपेक्षित जागी भेटत असे. कधी तो महादेवाच्या मंदिरातून बाहेर पडेल तर कधी एखाद्या मुसलमानांच्या मशिदीत शिरताना दिसे.

त्याच्याबाबतीत तऱ्हेतऱ्हेचे तर्क-कुतर्क केले जात. कोणी म्हणत की जनार्दन खून करून पळून आलेला आहे. तर कोणाच्या मते तो गुप्त पोलीस आहे. कोणी त्याला बाँब बनवणाऱ्यांच्या टोळीचा नेता समजत. आपल्या वाचनाचा अभिमान बाळग-णाऱ्यांनी तर जनार्दनला हिंदुस्थानात अराजक माजवणाऱ्या बोल्शेविक संघाचा एक पगारी प्रचारक ठरवला होता.

चार-एक वर्षापूर्वी तो गावाबाहेर, एक छोटीशी मठी बांधून तिथे राहात असे, त्यावेळी त्याला कोणीसुद्धा ओळखत नव्हते. पण गेल्या चार वर्षात मात्र त्याला गावात राहणारे सगळे आबाल-वृद्ध चांगले ओळखू लागले होते. इतकेच काय पण जवळ-पासच्या खेड्यातली माणसेही आता जनार्दनला ओळखू लागली होती.

शहरातल्या सुखवस्तू पांढरपेशांच्या वस्तीत एका सकाळी एक फावडे अन् एक झाडू घेऊन साफसफाई करताना चार वर्षापूर्वी जनार्दन एका बाईला दिसला.

'ए मेल्या, तू तिकडे साफ करतोयस आणि इकडे कचरा तसाच ठेवला आहेस. या इथली घाण काढून टाक की !' ब्राह्ममुहूर्तावर उठलेली ती बाई जनार्दनवर डाफरली.

'हो हो ताई, त्या जागेचीसुद्धा पाळी येईलच की.' जनार्दन म्हणाला.

त्या बाईंना जरा आश्चर्य वाटले. नेहमीच्या पगारी झाडूवाल्यापेक्षा या झाडूवाल्याचे उच्चार कितीतरी शुद्ध होते. ते ऐकून ती आश्चर्यचकितच झाली. वाढत्या प्रकाशात तिला दिसून आले की, एक स्वच्छ आणि टापटिपीचा माणूस आज भंगीकाम करीत आहे.

'आजकाल मेले भंगीसुद्धा स्वच्छ कपडे घालू लागले आहेत, अन् शुद्ध बोलू लागले आहेत.' ती बाई स्वतःशीच पुटपुटली. हलक्या जातीतल्या लोकांनी चांगले कपडे घातले आणि चांगले शुद्ध उच्चार केले तर त्यात इतरांना वाईट का वाटावे काही कळत नाही. परंतु हलक्या समजल्या जाणाऱ्या जमातीचे आचार-उच्चारात सुधारणा झाली तर ती तथाकथित उच्च जातींना महसा सहन होत नाही, हे अगदी खरे आहे.

सफाईचे काम थांबवून जनार्दन आपल्याजवळ येत असलेला पाहून त्या स्त्रीने त्याला दटावण्यासाठी मनातल्या मनात काही वाक्ये रचलीही. हलक्या जातीच्या लोकांशी बोलताना एक खास कडक भाषा वापरली जाते. परंतु जनार्दन खरोखरच जवळ आलेला पाहून ती स्त्री मनात योजलेली वाक्ये बोलूच शकली नाही. काय बोलावे या विचारात ती पडली असतानाच जनार्दन तिला म्हणाला,

'ताई, हा बोळ साफ करायला तुम्ही मला मदत कराल का ?'

जनार्दनच्या या प्रश्नावर काहीही उत्तर न देता ती स्त्री घरात निघून गेली. जनार्दनने आपले काम पुन्हा सुरू केले.

त्या दिवशी दुपारी त्या बोळातल्या दोन-चार स्त्रिया सकाळच्या प्रसंगाबद्दल बोलत होत्या. सगळ्यांचीच मते सारखी पडली.

दुसऱ्या दिवशी आणखी काही स्त्री-पुरुषांनी जनार्दनला सफाईचे काम करताना पाहिले. त्यातल्या एका स्त्रीला जनार्दनने विचारले, 'बाईसाहेब, हे पाणी तुम्ही असं सांडलंय ना त्यापेक्षा चहूबाजूंनी सांडलं असतंत तर ? '

दुसरी एक बाई केरसुणीवर कचरा घेऊन टाकायला चालली होती. तिला जनार्दनने हटकले.

'बाई, हा कचरा अंगणात नका टाकू. आणा तो. मी लांब टाकून येतो.'

एक गृहस्थ कागद फाडून त्याचे तुकडे खिडकीतून बोळात फेकत होते. संक्रांतीच्या दिवशी उडणाऱ्या पतंगाप्रमाणे ते कागदाचे कपटे चारी दिशांना उडत होते.

अगदी शांतपणे जनार्दनने एकेक तुकडा गोळा केला. मग त्याने त्या गृहस्थांना मोठ्याने हाक मारून खिडकीत बोलावून घेतले. खिशातून आगपेटीची काडी काढून ती पेटवली. आणि ते सगळे कागद जाळून टाकले. त्यांची राख झाली ती पायातल्या

वहाणांनी चुरगाळून टाकली. आणि मग तो त्या गृहस्थांना म्हणाला,

'भाऊसाहेब, कागद असे जाळून टाकले की कचरा होत नाही, बघा!'

'बरं, बरं. समजला तुझा शहाणपणा. तुला काय करायचंय? मला वाटेल तसे मी कागद फेकीन!'

बोळात हवे तसे कागद फेकायचा आपला हक्क घालवायला त्या गृहस्थांची तयारी होती की नाही ते त्या गृहस्थांनाच ठाऊक. परंतु आपल्या कामात काही सुधारणा सुचवल्या की, त्या माणसाला सुरुवातीला तरी अशीच उलट उत्तरे द्यायची प्रत्येक माणसाची प्रवृत्तीच असते.

त्या गृहस्थांचे उत्तर ऐकून जनार्दनही काही बोलला नाही. परंतु दुसऱ्या दिवशी मात्र तो बोळ स्वच्छ दिसत होता. एका महिन्यात त्या बोळातले प्रत्येक अंगण न अंगण पाणी शिंपडून स्वच्छ होऊ लागले आणि त्यावर सुंदर सुंदर रांगोळ्या रेखल्या जाऊ लागल्या.

शहरातल्या दुसऱ्याही भागातली मुले-मुली जनार्दनने एकत्र केली. त्यांना करता येईल अशी सोपी कवायत त्यांच्याकडून तो करून घेई. आणि कवायतीला अनुकूल लयीची काही संग्रामगीते तो त्यांना शिकवीत असे. छोटी-छोटी मुले तुकडीतुकडीने मिरवणुका काढीत गात-गात बोळा-बोळांतून फिरत. तेव्हा मुलांच्या दंगा मस्तीला कंटाळलेल्या त्यांच्या आईवडिलांची मने मुलांच्या त्या शिस्तबद्ध रांगा पाहून आनंदाने भरून येत.

जवळपासच्या खेड्यातूनही जनार्दनचे जाणे-येणे होते. एखाद्या झोपडीच्या अंगणात नाहीतर मोहोल्ल्यातल्या मैदानावर तो खेडुतांना गोळा करी. आणि त्यांना किती तरी मजेदार माहिती सांगे. जगात होणाऱ्या घडामोडी तो अशिक्षित लोकांना समजेल अशा साध्यासोप्या भाषेत समजावून सांगे. त्यांच्या रोजच्या जीवनात त्यांना जास्त रस वाटेल अशी जेवणे किंवा मेळे तो घडवून आणी. गावातले रस्ते, विहिरी, श्रमदानाने दुरुस्त करून घेई. आणि गावातल्या तरुणांना गावशिवेचे रक्षण करण्यासाठी तयार करी.

जसजशी जनार्दनची कीर्ती वाढू लागली तसतसे त्याच्याविरुद्ध बोलणारेही वाढू लागले. कोणी म्हणत तो दारुगुत्याजवळ फिरत राहातो आणि संधी मिळाली की हळूच आत घुसतो. याच्याहूनही गंभीर आरोप त्याच्यावर आला होता. तो म्हणजे, 'तो वेश्यांच्या वस्तीतून हिंडताना बऱ्याच वेळा दिसला होता. इतकेच नाही तर वेश्यागृहात बेधडक घुसतानाही तो आपल्याला अनेकदा दिसला होता.' असे सांगणारे

लोकही मोठ्या संख्येने निघत.

या सगळ्या प्रवादांमुळे माणसे त्याच्याजवळ यायला बिचकत. गंभीर प्रकृतीची शहाणी माणसे तर तिरस्कारपूर्वक त्याच्यापासून दूरदूर राहात. कित्येकांना त्याच्या विचित्रपणाचीच भीती वाटे. आणि कित्येक लोक त्याला अर्धवट, खेळकर, अवधूत मानीत.

असे होता होता त्याच्याभोवती पंचवीस-तीस तरुणांचा एक गट जमा झाला होता. तीन-चार तरुणीसुद्धा त्याच्या निकट सहवासात आल्या होत्या. त्या तरुणां-पैकी काहींना त्याने खेड्यात पाठवले होते. काहींच्याकडून तो बोळ साफ करवून घेत असे. काहींना बोळातल्या मुलांशी खेळायला पाठवत असे. तर काहींच्याकडून तो लेख लिहवून घेऊन ते गावातल्या मोहोल्ल्या-मोहोल्ल्यातून वाटीत असे. किंवा त्यांच्या-कडून गाणी रचवून ती गाऊन घेत असे.

त्याच्या या वागण्याने हलके-हलके सत्ताधाऱ्यांचेसुद्धा त्याच्याकडे लक्ष जाऊ लागले. सत्ता ही मोठी मत्सरी आहे. मोठ्या अभिमानाने एखाद्याचे आरशात पडलेले प्रतिबिंबही तिला सहन होत नाही. बोळ साफ राखणे हे नगरपालिकेचे काम. ते काम दुसऱ्या कोणी केले तर ते नगरपालिकेला कसे सहन होणार? शिक्षण द्यायचे काम शिक्षणखात्याचे. एखादी व्यक्ती लेख लिहिते, लिहवून घेते किंवा खेडुतांना एकत्र करून त्यांच्याशी त्यांच्या भाषेत बोलते, त्यांच्या ज्ञानात वाढ करण्याची जबाबदारी स्वतःच्या शिरावर उचलू लागते हे शिक्षणखात्याच्या सत्तेला केवढे आव्हान म्हणायला हवे. जनतेच्या संपत्तीचे संरक्षण करण्याचे काम पोलीसखात्याच्या हातात. पण खेडूतच संरक्षण करू लागले तर पोलिसांच्या सत्तेत किती घट होते! अेखाद्या व्यक्तीचा अशा स्थापित सत्ताक्षेत्रात शिरकाव होऊच शकत नाही. व्यक्तीने सत्तांची अंमलबजावणी करणारे साधन बनायचे असते. उलट जनार्दन या सगळ्या सत्तांना फूट पाडणारा एक बंडखोर आहे असेच सत्ताधाऱ्यांना वाटू लागले.

जनार्दन आणि त्याचे कार्य यावर आता सत्ताधीशांची कडक नजर राहू लागली. तो कुठे जातो, काय बोलतो, या सगळ्या गोष्टींची नोंद राहू लागली. आता इतकी काळजी घेतल्यानंतर जनार्दनच्या कार्यामागच्या हेतूचा अंदाज चटकन करता येणे अत्यंत साहजिक होते. ह्या कोणा चक्रम, अर्धवट पुरुषाला आपली वेडी स्वप्ने प्रत्यक्षात उतरवण्याचा मोह होत आहे, असा प्रथम अंदाज होता. आणखीन विचार झाला तेव्हा एक स्वार्थी पुरुष लोकांना भुलवून पैसे गोळा करण्याच्या खटाटोप करतो आहे, असे वाटू लागले. परंतु असे अर्धेमुर्धे अंदाज बांधून कधी सत्ता स्वस्थ बसत नाही.

शेवटच्या टोकापर्यंत आपल्या तर्क-कुतर्कांची शक्यता त्यांनी शोधली पाहिजे.

या तर्क-कुतर्कांचा शोध घेता-घेताच त्यांना जनार्दन म्हणजे एक महाभयंकर चळवळ्या आणि बंडखोर असल्याची जाणीव होऊ लागली. मानवाचे ज्ञान असेच वाढत आले आहे. अनुभव परंपरेनुसार विशिष्ट ज्ञान – विशिष्ट मान्यता – सिद्ध तरी होते किंवा विशिष्ट ज्ञान-मान्यता-मनात पक्की रुजली की त्याची शाबिती घडलेल्या घटनांवरून करण्याचा प्रयत्न होतो. एकदा जनार्दनला चळवळ्या म्हणून मानले, तेव्हा आता तो चळवळ्याच आहे हे निश्चित ठरवण्याजोग्या काही घटना घडून आल्याचेही त्यांना दिसून येऊ लागले. सत्ताधाऱ्यांची खात्रीच पटली की जनार्दन बंडखोर क्रांतिकारक आहे आणि आपली मते प्रत्यक्षात उतरविण्याकरिताच तो सर्व काही करीत आहे.

त्यातच जनार्दनच्या मंडळातर्फे एक पत्रक प्रसिद्ध होऊ लागले. या पत्रकातले लेख धगधगीत निखाऱ्यासारखे प्रखर आणि जळजळीत असत. सत्ताधारी आणि जनता या दोन्ही संस्थांच्या दोषांवर हे पत्र साधार प्रकाश पाडीत असे. आपल्याच पक्षातर्फे आपल्यावर टीका झाली तर जनता मोठ्या उदारपणे ती सहन करते. जनतेची संख्या मोठी त्यामुळे ही टीका प्रत्येक व्यक्तीवरच होते. आणि मग त्या व्यक्तीच्या दोषाचा भारही सर्वांत वाटला जाऊन थोडा हलका होतो. ती टीका विसरलीही जाते. परंतु सत्तेची मूर्तीच असलेले सरकार आपल्यावरील टीका क्वचितच सहन करते. अतिरेकी अहंपणाचा हा परिणाम आहे. जो स्वतःला सर्वशक्तिमान मानतो तो आपण सर्वज्ञ आहोत असेच मानीत असतो. म्हणूनच प्रजापक्षाचे म्हणून मानले गेलेल्या पत्राने सत्तेला उद्देशून काही सांगावे, हे राज्य चालवणाऱ्यांना उरात खंजीर खुपसल्यासारखे वाटावे, यात काही नवल नाही. हा व्यक्तिदोष नाही. हे समाज मानसाचे लक्षण मानले जाते.

म्हणूनच वेळोवेळी सत्ताधाऱ्यांबरोबर संघर्ष होईल असे प्रसंग जनार्दनवर येऊ लागले होते. आज जनार्दनच्या मंडळात काही महत्त्वाची घटना घडणार आहे अशी खबर पोलीस अधिकाऱ्यांना लागली होती. व्रतधारी व्रत घेण्यापूर्वी आणि नंतरही नकळतच स्वतःच्या कार्याला जादा महत्त्व देत असतो. खादी नेसायची असो की चरखा चालवायचा असो, जणू काही हिमालयावरच चढायचे आहे, अशी गंभीर, स्वतःच्या मनात दडवलेली, परंतु तरीही चेहऱ्यावरून चटकन ओळखता येईल अशा तऱ्हेची त्यांची वागणूक असते. सत्ताधारीही त्याच प्रमाणात त्यांचे गांभीर्य मापतात. आणि खादी वापरणारे, किंवा चरखा चालवणारे जणू काही बाँबच बनवणारे आहेत, अशा सावधगिरीने सत्ताधारी उपाय योजतात.

अेका पोलीस अधिकाऱ्याने घरात प्रवेश केला आणि ओसरीवर बसून काहीतरी लिहीत असलेल्या रंजनला त्याने विचारले,

'जनार्दन आत आहे का ?'

'तुमचं काय काम आहे ?' रंजनने विचारले.

'मी पोलिसांचा माणूस आहे. मला जनार्दनला भेटायचंय.'

'तुम्ही बसा इथं. मी विचारून येते.' असे सांगून रंजन लगबगीने घराच्या मागील भागात जमा झालेल्या तरुणांच्या गटाकडे आली. तिला येताना पाहून सगळेच विचारात पडले. सगळ्यांच्याच मनात विचार आला, 'रंजन इतक्या लगबगीनं का येतेय ?'

जनार्दनने विचारले, 'काय ग रंजन ? काय झालं ?'

'एक पोलीस अधिकारी तुम्हाला भेटायला आलाय.' रंजनचा आवाज बारीक पण गोड होता. कित्येक तरुणांच्या डोळ्यांत राग चमकू लागला. आधीच अप्रिय असलेले पोलीसखाते राजकीय गुन्ह्यांच्या तपासात पडू लागले तेव्हापासून ते जास्तच अप्रिय झाले होते.

'इतकंच ना ? चल, आलोच मी. आजपासून आपण अहिंसक बनलो आहोत. जनावरांच्या कोटीतून निघून माणूस बनलो आहोत. आपल्याला राग-द्वेष काहीही नाही आता. अरुण, तू चल माझ्याबरोबर.'

जनार्दनचा आवाज अगदी शांत होता. अरुणचे डोळे मात्र पेटले होते. त्याचा लाल झालेला चेहरा सगळ्यांना स्पष्ट दिसत होता. अरुण हिंसेचा मोठा उपासक होता. आजच थोड्या काळापुरता तो अहिंसक बनला होता. परंतु आजपर्यंत अंगी बाणलेली वृत्ती आत्तासुद्धा चेहऱ्यावर उमटल्याखेरीज राहिली नाही.

जनार्दन, अरुण आणि रंजन तिघेही चालू लागले.

'जिथे तिथे अरुण !' एक अस्पष्ट आवाज अरुणच्या कानांवर आला. अरुण हळूहळू मागे सरकत आला आणि त्याने इतर सभासदांच्याकडे तिरप्या नजरेने पाहिले. एकदोघे हसले.

'स्वराज्य हाच तेवढा मिळवणार !' फक्त अरुणलाच ऐकू येईल अशा आवाजात कोणीतरी बोलले. टीका-निंदेचे बाण ब्रह्मास्त्रासारखेच तीक्ष्ण असतात. ज्याचा नेम धरून ते मारले जातात त्यालाच ते लागतात.

'हो, हो. मीच मिळवणार स्वराज्य !' अरुण मागे वळत ओरडला. जनार्दनने काही न बोलता अरुणच्या खांद्यावर हात ठेवला आणि तो म्हणाला,

'पोलीस दोस्त आपली वाट पाहताहेत. तू स्वराज्य मिळवशील तेव्हा तू अरुण राहाणार नाहीस हिंदुस्थानच्या ३३ कोटी लोकांच्यात तू मिसळून गेलेला असशील.

# 2. मतभेद

**नाही वैराचा सूड घेणे**
**मैत्रीचे मात्र दुःख साहणे**

**—कलापी**

जनार्दनची वाट पाहात पोलीस अंमलदार खोलीत थांबला होता. तेवढ्या वेळात त्याने चौफेर नजर टाकली. ओसरीवर एक गोल टेबल होते. त्याच्याभोवती काही खुर्च्या होत्या. टेबल, कागद आणि पुस्तके यांच्याशिवाय दुसरे काहीही तिथे नव्हते. बसल्या बसल्या जेवढे पाहता येत होते, तेवढे त्या अंमलदाराने पाहून घेतले. परंतु समोरच्या एका कागदाला की एका पुस्तकाला त्याने हात लावला नाही. फिरायची सवय असलेला पोलीस अधिकारी एकाच जागी फार वेळ बसून राहू शकत नाही. म्हणूनच तो जागचा उठला, उभा राहिला आणि उगीचच इकडेतिकडे करू लागला. जवळची खिडकी उघडीच होती. त्यातून त्याने नजर बाहेर टाकली. आतल्या मोठ्या व्हरांड्यात साधी कांबळी आणि सतरंज्यांची बिछायत अंथरलेली होती. या व्हरांड्याच्या भिंतीवर फोटोंच्या फ्रेम्स टांगल्या होत्या. त्यात काँग्रेस महासभेचे अध्यक्ष, धर्मसुधारक, समाजसुधारक, अन्य काही नेते, प्रमुख व्यापारी यांचे फोटो होते. त्यांच्याबरोबरीने रिपन, मिन्टो, हार्डिंगसारखे व्हाइसरॉय, मोर्ले, माँटेग्युसारखे सज्जन भारतमंत्री यांच्याही तसबिरी तिथे दिसत होत्या. सगळ्या जगातले महापुरुष आणि क्रांतिकारक यांच्याही तसबिरी त्या भिंतीवर होत्या.

परंतु अधिकारी आत गेला नाही. सगळेच पोलीस अधिकारी काही अमानुष नसतात. गुन्हा करणाऱ्यांनी निमूटपणे गुन्हा कबूल केला तर पोलिसांना ज्या अतिरेका-बद्दल दोष देण्यात येतो ते अतिरेक करण्याची गरज त्यांना भासणार नाही. गुन्हेगार

प्रामाणिक असला तर पोलिसांचीही गरज भासायची नाही हे जेव्हा होईल तेव्हा होईल, पण त्यामुळे काही पोलिसांच्या सध्याच्या अत्याचारांचे समर्थन करता येणार नाही. आणि तसे समर्थन करावे, अशी सगळ्या पोलीस अधिकाऱ्यांची वृत्तीही नाही.

आतून जनार्दन, रंजन आणि अरुण बाहेर आले. व्हरांड्यातून नजर फिरवीत जनार्दनने पोलीस अधिकाऱ्याचे स्वागत केले, 'अरे, व्वा, नृसिंहलाल ! तुम्ही होय ? या साहेब, या. बसा. आज काय काम काढलंत ?'

पोलीस अधिकारी नृसिंहलाल खुर्चीवर बसला. त्याच्यासमोर जनार्दन अन् त्याच्या शेजारी रंजन बसली. अरुण दोघांच्या पाठीमागे उभा राहिला.

'तुमच्याशी खास काम आहे. आपण दोघंच इथे बसलो तर चालेल का ?' नृसिंहलाल म्हणाला.

नृसिंहलाल वयाने जनार्दनच्या बरोबरीचा होता. त्याच्या पोषाखामुळे जो दरारा वाटत होता, तेवढाच. आपला दरारा आणखी वाढवण्याचा प्रयत्न त्याने कधी केलाच नाही. मारेकऱ्याचा वेष घातला असला तरी त्याच्या चेहऱ्यावर सज्जनतेचा भाव स्पष्ट दिसत होता. आणि पोलिसांच्या निष्ठुर धंद्यात कित्येक वर्षे यशस्वीपणे काढली तरी त्याच्यामध्ये संस्कारहीन पशुतेचा पूर्ण अभाव जाणवत होता.

'ते कशाला ?' जनार्दनने विचारले. 'माझ्याजवळ कोणापासून लपवून ठेवण्याजोगे काही नाहीच मुळी. तुमची हरकत नसेल तर या दोघांनाही इथेच राहू देत की.'

नृसिंहलालने थोडा विचार केला. मग तो म्हणाला, 'बरं तर. तुमच्याशी जे बोलायचंय ते मी नंतर बोलतो. सध्या मला तुमच्या या जागेची झडती घ्यायची आहे.

'झडतीचा हुकूम आहे तुमच्याजवळ ?' अरुणने रागाने विचारले.

'आपल्याला हुकुमाशी काय करायचंय ? नृसिंहलाल माझा दोस्त आहे. त्याला न दाखवण्यासारखं इथं काही नाही.' जनार्दन म्हणाला.

'पण आता ते काही इथं मित्र म्हणून नाहीत.' अरुण म्हणाला.

नृसिंहलालने अरुणकडे रोखून पाहिले, एखाद्या मुलाच्या विनाकारण धुमफुशीकडे वडीलधाऱ्यांनी ज्या दृष्टीने पाहावे, तशा नजरेने. मग तो म्हणाला,

'माझ्याजवळ झडतीचा हुकूम आहे. हुकूमाशिवाय मी येईनच कसा ?'

खिशातून हुकूम काढून नृसिंहलालने अरुणच्या हाती दिला. हुकूम वाचता-वाचताच अरुण रागाने थरथर कापू लागला. रागामुळे त्याच्या तोंडातून शब्दही फुटेना. त्याने हुकुमाचा तो कागद टेबलावर टाकला. तो नृसिंहलालने उचलला. जनार्दनच्या नजरेतून ही गोष्ट निसटणे शक्यच नव्हते. त्याने प्रेमळ आवाजात म्हटले,

'अरुण, आजचं आपलं व्रत विसरायचं नाही हं. राग हे हिंसेचे मुख्य अंग आहे.'

अरुणने काहीच उत्तर दिले नाही. परंतु मनातल्या मनात तो अहिंसा आणि शांती यांना मसणात जायचाच शाप देत असावा, असे भाव त्याच्या चेहऱ्यावर प्रगट झाले होते.

'तुम्ही माझं घर तपासू शकता.' जनार्दनने सांगितले.

'ठीक आहे. तुम्हीही चला माझ्याबरोबर.' नृसिंहलालने म्हटले. ताबडतोब त्याने टेबलावर पडलेले कागद आणि पुस्तके तपासायला सुरुवात केली. ती तपासत असतानाच त्याला नावांची एक यादी सापडली. त्याने विचारले,

'हे काय आहे? कोणाची नावं आहेत यात?'

'त्यात लिहिलंय ना. माझ्या मंडळाच्या सभासदांची नावं आहेत त्यात.'

नृसिंहलालनी नावे वाचली. एक नाव वाचून तो जरा दचकलाच. 'कंदर्प? हा कोण?' त्याने विचारले.

'तुमचेच चिरंजीव' जनार्दनने सांगितले.

नृसिंहलालने पुढे नावे वाचायचे सोडून दिले, आणि तो पुस्तके चाळू लागला. त्यातील तीन पुस्तकांनी त्याचे लक्ष वेधून घेतले. 'क्रांतिवादाचे तत्त्वज्ञान', 'जगातील क्रांतिकारक', 'कार्लमार्क्सचा साम्यवाद' ही तीन पुस्तके आणि सगळी यादी त्याने बाजूला काढली.

मग दोघे उठून आत गेले. अरुण आणि रंजन मागे राहिले.

आतल्या भिंतींवरच्या तसबिरी पाहून नृसिंहलाल किंचित हसला, म्हणाला,

'तसबिरींची ही भाऊगर्दी कशाला केलीय?'

'जरा लक्ष देऊन पाहा, म्हणजे कळेल की ही भाऊगर्दी नाही. या तसबिरींच्यातून मी हिंदुस्थानचा चालू इतिहास एकत्र केला आहे.'

'तो कसा काय बुवा?'

'सांगतो. हे पाहा, राजा राममोहन रॉयपासून सुरुवात करून मी सगळ्या वर्तमान-कालातील समाजसुधारकांना एकत्र आणलंय. त्यांच्यापासून ही समाजसुधारकांची माला सुरू होते. कित्येक व्यक्तीच्यात धर्मसुधारणा आणि समाजसुधारणा यांचा मिलाफ झालेला आहे. या इकडे व्योमेश बॅनर्जी, लालमोहन आणि दादाभाईपासून काँग्रेसच्या राजकीय प्रवृत्तीची सुरुवात झाली. लोकमान्य टिळकांच्या नंतर त्यांना दोन वाटा फुटल्या. काझी शहाबुद्दीन, सयाणी आणि तैयबजी यांनी मुसलमानांचे प्रतिनिधित्व केलेलं तुम्हाला दिसतंच आहे.'

'पण मग या इंग्रजांच्या तसबिरी कशासाठी ?' नृसिंहलालनी विचारले.

'इंग्रजांचे आपल्यावरील उपकार मी तरी कधी विसरू शकणार नाही, आणि हिंदुस्थान पण ते विसरणार नाही. वडेरबर्न आणि कॉटन सारख्यांना बाजूला ठेवलं तरी इंग्रज अधिकाऱ्यांच्यात ह्या रिपन-हार्डिंगसारखे हिंदुस्थानचे हितचिंतक होतेच. त्यांचा प्रभाव अगदीच नगण्य नव्हता.'

'पण तुम्ही तर खुदीराम बोसची तसबीरही लावली आहे इथे ?'

'त्यानं केलेल्या खुनाचं समर्थन अहिंसावाद्यांना करण शक्य नाही. परंतु देशाच्या उद्धाराची कळकळ त्यालाही होती हे कोण नामंजूर करील ?'

'आणि गांधीजीचा हा फोटो असा एकटाच एका बाजूला का लावलाय ?' पोलिसांची माणसेही बोलताना 'गांधीजी' किंवा 'महात्मा गांधी' असे म्हणताना अडखळत नाहीत. लोक आणि पोलीस या दोघांचेही या उपाधीबद्दल एक व्रत आहे.

'गांधीजी हे हिंदुस्थानातील चालू संस्कृतीचे मुकुटमणी आहेत. धर्म-समाज आणि राजकीय सुधारणा आत्तापर्यंत महत्त्वासाठी परस्परांशी स्पर्धा करीत होत्या. गांधीजींनी त्या सर्वांना आता एकत्र आणलं आहे.' जनार्दनने उत्तर दिले.

नृसिंहलालला हे सगळे समजले की नाही हे पाहण्यासाठी जनार्दनने त्याच्याकडे पाहिले. पण त्याला काही कळले नाही. दोघेही तिथून निघाले आणि पटांगणात आले. तिथे एक छोटासा ध्वज फडफडताना नृसिंहलालला दिसला.

'हा कसला ध्वज आहे ?'

'तो आमचा ध्वज आहे.'

'तुम्ही नक्की राजद्रोहाच्या गुन्ह्यात सापडणार आहात.'

'का म्हणून ?'

'युनियन जॅकच्या ऐवजी हा ध्वज का फडकवलात तुम्ही ?'

'देशी संस्थानात युनियन जॅक कुठे असतो ?'

'या संस्थानांना तेवढ्यापुरती सूट मिळालीय.'

'अहो, आपल्या देशात तर देवळा-देवळांतून झेंडे फडफडत असतात जिथे जिथे पवित्रता आढळते तिथे तिथे ध्वज फडकावता येतो.' मग किंचित हसून जनार्दनने म्हटले, 'एवढं कशाला, तुमच्या ताडीच्या गुत्यावरसुद्धा झेंडा असतोच की ! मग युनियन जॅकबद्दल इतका आग्रह का ?'

'ते काही चालणार नाही.' असे म्हणून नृसिंहलाल ध्वजाच्या दिशेने पुढे सरकला. बरोबर जनार्दन होताच.

जवळ जाऊन नृसिंहलालने तो ध्वज निरखून पाहिला. तो पांढराशुभ्र ध्वज सूर्याच्या प्रकाशात चमकत फडकत होता. या निर्जीव वस्त्रात वारा जीव भरत असल्याचे जाणवत होते. की एखादी जिवंत भावनाच त्यात मूर्त झाली होती?

'हा ध्वज नव्यानंच उभारलेला दिसतोय!' नृसिंहलाल म्हणाला.

'हो ना. इथे रोज होणारे फेरफार पोलिसांच्या ध्यानात येणार, हे मला ठाऊक आहे.'

'पण आज हा उभारायचं कारण काय?' नृसिंहलालने विचारले.

'आमच्या मंडळातल्या काहींना रक्ताचा लाल रंग आवडायचा तर काही क्रोधाच्या काळ्या रंगाला फार मान देत. आज सगळ्यांनी एकत्र जमून निश्चय केला, की अहिंसेचा पांढराशुभ्र रंगच सर्वांनी पुजायचा. तेवढ्याचसाठी हा ध्वज इथं उभारला होता. आणि अहिंसेची प्रतिज्ञा सर्वांनी घेतली होती.' जनार्दनने त्या ध्वजाचे गुपित सांगितले.

'आज तुम्ही सगळे एवढ्याच कामासाठी इथं जमला होतात?'

'हो ना. फक्त एवढ्याचसाठी.'

नृसिंहलालने काहीशा अविश्वासाने जनार्दनकडे पाहिले. मंडळाचे सदस्य गटा-गटाने फिरत-फिरत आत जाताना दिसत होते.

'हा झेंडा मला न्यावा लागणार!' थोडा वेळ विचार करून नृसिंहलालने म्हटले,

'कुठे?'

'मुद्देमाल म्हणून पोलीस तपासासाठी.'

'हा तुमचा मुद्देमाल इथे कायम राहणारच आहे की.'

'पण इथे नाही ठेवता येणार मला तो. पोलीस कचेरीत न्यावा लागतो तो.'

'हा ध्वज इथून कुठेही हलणार नाही. हां, आता तुमच्या पोलीस कचेरीवरच हा फडकवायचा असेल तर गोष्ट वेगळी!'

'हं' पोलीस कचेरीवर तो झेंडा फडकवायच्या कल्पनेनेच नृसिंहलालला हसू आले. त्याने सगळीकडे पाहिले. मग खिशातून एक शिटी काढून त्याने ती हळूहळू वाजवायला सुरुवात केली.

'का हो? तुमच्या पोलिसांना बोलावताय की काय?' जनार्दनला या शिटीची चांगलीच ओळख होती. 'तसं काही करायची गरज नाही. तुम्ही या ध्वजाखेरीज इथल्या इतर सगळ्या वस्तू इथून घेऊन जाऊ शकता. ध्वजाबाबत आमच्या हातून काही गुन्हा घडला असेल तर आम्ही येऊन आपणहून तो गुन्हा कबूल करू.'

'आणि आम्ही इथून हा ध्वज उचलून नेला, तर तुम्ही काय कराल ?'

'आम्ही काय करू ? आमच्या अंगात ताकद असेतोपर्यंत तुम्हाला हा ध्वज इथून नेऊ देणार नाही.'

'पण तुम्ही स्वतःला अहिंसक म्हणवून घेता ना ?'

'अर्थात.'

'मग अहिंसेचं पालन करून या ध्वजाचं रक्षण कसं करणार तुम्ही ? तुम्ही ताकदीचा उपयोग करणार, नक्की.'

'तुम्हाला नाही समजायचं ते. तुम्ही तो ध्वज काढून बघाच. मग तुम्हाला दिसेल अहिंसा या ध्वजाचं रक्षण कशी करील ते.'

'भल्या माणसा, तू हे काय चालवलंयस ? फुकट चांगल्या माणसांच्या मुलांना बहकवतोयस, घरात कलह लावतोस, आणि आमचा जीव टांगणीला लावतोयस ! नृसिंहलालने जनार्दनला दोष दिला.

जनार्दन हसून म्हणाला,

'मी काही कोणाला बोलावून आणत नाही. ज्याच्या मनाला येईल तो माझ्या कार्यात सामील होतो.'

'मग तू सरळ बोल की. उगीच आभाळाला हात टेकवता. हे करून काय फायदा ? ठीक आहे. थोडं जास्त बोला, थोडं जास्त मागा. पण ही स्वराज्याची भाषा उगीच कशाला ?'

'नृसिंहलाल, ह्या आकाशाला जर इंग्रजांचे हात टेकतात तर तुमचे आमचे का टेकू नयेत ? आणि स्वराज्याला भ्यायचं कारणच काय ? दादाभाईसारख्या महर्षीचा हा मंत्रोच्चार आहे. आणि तुमच्या इंग्रजी सत्ताधाऱ्यांनी स्वराज्याचा हक्क मान्यही केला आहे. मग आता तुम्ही का घाबरता ?'

जनार्दनचे हे बोलणे एकत असताना नृसिंहलालच्या चेहऱ्यावर व्याकुळ भाव दिसू लागले. आपण द्रोहाचे शिक्षण घेतो आहोत या विचारानेच त्याच्या मनात भीती निर्माण झाली. हिंदुस्थानचे आजचे वातावरण आणि जनार्दनसारख्या बेडर पुरुषांचे बोलणे यांच्यामुळे आपले मन कदाचित पालटायचे, अशी त्याला भीती वाटू लागली.

'जाऊ दे. आज नाही तुमचा झेंडा घेऊन जात मी. फक्त ती पुस्तके आणि यादी घेऊन जातो. पण तुमच्यापैकी कुणालातरी माझ्याबरोबर यावं लागेल.' नृसिंहलाल घाईघाईने म्हणाला.

'ठीक आहे. माझी काही हरकत नाही. चला तर.' असे म्हणून जनार्दन पुढे चालू लागला. तसा नृसिहलालही त्याच्याबरोबर जाऊ लागला.

आतल्या भागात सगळे तरुण सभासद एकत्र बसले होते. तीन-चार जण ओसरीवर, रंजनजवळ उभे होते. रंजन खळखळून हसत होती. जनार्दनला पाहिल्यावर मात्र ती गप्प झाली.

'रंजन, एवढं हसायला काय झालं?' जनार्दनने विचारले.

'या अरुणभाईचं अन् विमोचनचं एका कवितेवरून भांडण चाललं होत. ते मी सोडवलं.' असे म्हणून रंजन पुन्हा हसू लागली.

'अरुण, तू आपल्या मंडळाचा चिटणीस आहेस. या साहेबांबरोबर तुला आज जायचंय. ते विचारतील त्या सगळ्या प्रश्नांची उत्तरं दे.' जनार्दनने सांगितले.

'हो हो, चला माझ्या मोटारीतून.' पोलीस अधिकारी नृसिहलाल म्हणाला.

'ठीक आहे.' म्हणून अरुण तयार झाला. आजच स्वीकारलेल्या व्रताची जनार्दनने त्याला पुन्हा आठवण करून दिली.

'मोटारीत जागा असेल तर मी पण येते.' रंजन म्हणाली. 'सुशीलाबाईच्या घरीच मला जायचं आहे.'

अशी बेधडक परक्या, पोलिसाच्या मोटारीतून जायची मागणी करणाऱ्या, उच्छृंखल वाटणाऱ्या त्या तरुणीच्या धाष्टर्याकडे नृसिहलाल पाहातच राहिला. म्हणूनच आपल्याला मोटारीतून जायची परवानगी मिळाली आहे, अशी रंजनने आपली समजूत करून घेतली. पुस्तके आणि यादी घेऊन तिघेही तिथून निघाले.

जनार्दन टक लावून पाहात होता. परंतु जिथे त्याची दृष्टी खिळली होती, तिथले काहीच त्याला दिसत नव्हते. तो आपल्या अंतश्चक्षूने एक सुंदर दृश्य पाहात होता. या दृश्याभोवती चहूकडे काळे ढग झेपावले होते. स्वराज्य आणि अहिंसेचे तेजस्वी स्वप्न, उतावीळ तरुण आणि त्यांच्यात मिसळलेल्या तरुणी. सूर्याच्या तेजाला सीमा नसते. परंतु एखादा लहानसा काळा ढग त्या तेजाला झाकळून टाकतो तेव्हा?

केवढा भयंकर प्रयोग होता हा. पण असा कोणता प्रयोग भयंकर नसतो? इतिहास घ्या किंवा विज्ञान –शिर कापून हातावर ठेवले नाही तर प्रयोगच होत नाही!

# 3. पित्याचे वात्सल्य

**तुम्ही वाढविले राखून माझी मर्जी**
**कसा विसरू मी आधार तुमचा बापूजी !**

**——दलपतराय**

नृसिंहलालने आधी रंजनला बसवले. शेजारी अरुणला बसवले आणि मग स्वत: अरुणच्या जवळ बसला. नृसिंहलाल लठ्ठ होता. रंजनही काही बारीक नव्हती. त्यातून तिला जरा ऐसपैस बसायची सवय होती. रंजनला फार दाटी होणार नाही याची खबरदारी घेतल्याने संकोचून बसलेल्या अरुणच्या मनात आले, आगगाडीतल्या सारखी मोटारीतही स्त्रियांच्यासाठी स्वतंत्र जागा राखून ठेवायला हवी ! स्त्री-पुरुषांच्या वाढत्या संबंधाच्या या युगात अरुणचे हे विचार अगदीच जुनाट म्हणायला हवेत.

'अरुणभाई, मी तर ऐकलंय की मॅजिस्ट्रेट तुमचा दोस्त आहे.'

रंजन आणि अरुण यांचा परिचय फार जुना नव्हता. पाच-सात महिन्यांपूर्वी एका दीर्घकाळ चाललेल्या राजकीय खटल्याचा निकाल लागला होता. त्यात पंचवीस-एक तरुणांना शिक्षा झाली होती आणि दहा-बारा तरुणांना निर्दोष म्हणून सोडून दिले होते. राज्ययंत्रणा उलथून टाकण्याच्या कटामध्ये सामील झाल्याचा आरोप त्या सगळ्यांवर ठेवण्यात आला होता. आरोपींपैकी कोणीही स्वत:चा बचाव केला नव्हता. म्हणून मग कागदपत्रांवरून अनुमान करून पोलीस अधिकाऱ्यांच्या जबा-न्यांचा आधार घेऊन न्यायाधिशांना आपला निर्णय द्यावा लागला होता. आरोपींनी आपला बचाव करावा म्हणून न्यायाधिशांनी त्यांना खूप समजावून पाहिले. परंतु त्यांनी हट्टाला पेटून आपला बचाव केला नव्हता. गोंधळात पडलेल्या न्यायाधिशांनी योग्य न्याय द्यायचा आटोकाट प्रयत्न केला. आणि शेवटी पोलिसांच्या इच्छेविरुद्धच

त्यांनी दहा आरोपींना सोडूनही दिले. उरलेल्या पंचवीस जणांना अगदीच साधी शिक्षा दिली.

सोडून देण्यात आलेल्या आरोपींच्यातला एक अरुण होता. अरुणचे वडील सरकारी नोकरीत मोठ्या हुद्यावर होते. उत्तम विद्यार्थी म्हणून प्रसिद्ध असलेल्या अरुणला सरकारी नोकरीत लावून देण्याची त्यांची फार इच्छा होती. आपल्या शिफारशीवरून ते अरुणला चांगल्या जागी चिकटवून देऊही शकले असते. पण अरुणने सरकारी नोकरी करायला साफ नकार दिला होता.

अरुण शिकत राहिला. आणि शिकता शिकताच, तीन वर्षांच्या आतच तो एका भयंकर राजद्रोही कटात सापडला. त्याच्या वडिलांनी हजारो रुपये खर्च केले. काळजीने आणि खटपटीने त्यांच्या रक्ताचे पाणी झाले. बचाव करायला जेव्हा एकेका आरोपीने नकार दिला तेव्हा अरुणच्या वडिलांनी वकिलांचा सल्ला घेतला. अरुणविरुद्ध पुरावा मिळाला नाही, म्हणून तो सुटला.

अरुणने एखाद्या चांगल्या कार्यात पडावे अशी त्याच्या वडिलांची फार इच्छा होती. अरुणला सरकारी नोकरी मिळायची आशा जेव्हा संपली तेव्हा, त्यांनी अरुण-साठी सहकारी खात्यातली निमसरकारी नोकरी शोधून काढली. या खात्याचा नवीन अधिकारी नव्यानेच आलेला एक युरोपियन होता. अरुणच्या वडिलांनी त्याच्या-बरोबर काम करून त्याची मर्जी संपादन केली होती. त्यांनी अरुणला वळणावर आणायची आपली इच्छा त्या साहेबाच्या कानांवर घातली. एकमार्गी, चळवळी आणि भावनाप्रधान तरुण मंडळी सहकारी खात्यात चांगली काम करतात असा साहेबाचा समज होता. त्याने अरुणला मुलाखतीसाठी बोलावून घेतले.

अरुण साहेबाकडे गेला. साहेबाने त्याला मोठ्या प्रेमाने बोलावले. खादीच्या कपड्यातल्या अरुणला साहेबाने काळजीपूर्वक न्याहाळले आणि त्याच्याकडे एक कृपाकटाक्ष टाकत तो हसला.

'तू माझ्या खात्यात नोकरी करशील का?' साहेबाने विचारले.

'हो, करीन की! मी कोणत्याही खात्यात नोकरी करायला तयार आहे.' अरुणने उत्तर दिले. राजद्रोही म्हणून प्रसिद्ध असलेला एक तरुण नोकरी स्वीकारल्याचे इतक्या सरळसरळ मान्य करतो हे ऐकून साहेब त्याच्याकडे क्षणभर पाहातच राहिला. अरुणच्या डोळ्यांत क्षणभरच निखारे चमकल्याचे आणि पुन्हा ते शांत झाल्याचे साहेबाला जाणवले.

'तुझे वडील खूष होतील हे ऐकून. तुम्ही मंडळींनी देशसेवेचं व्रत घेतलं आहे.

तुम्हाला माझ्या खात्यात लोकसेवेचं काम करायला चांगली संधी मिळेल.' साहेबाने सांगितले.

'मला जमेल तेवढं करीन मी.'

'तुला सुरुवातीला शंभर रुपये पगार मिळेल. सहा महिन्यांनंतर मी तुला दीडशे देईन. हेसुद्धा तुझ्या वडिलांच्यामुळे होऊ शकेल. नाहीतर तुझा पूर्वेतिहास लक्षात घेतला तर तुला या खात्यात मी नोकरीसुद्धा देऊ शकणार नाही.'

'पण साहेब, मी तर निर्दोष सुटलो. शिवाय पगाराचा लोभ मला नाही. माझ्या गरजा लक्षात घेतल्या तर मला याच्या निम्म्यानं रक्कम मिळाली तरी पुरेल.'

'अंहं, पण तुझी लायकी यापेक्षा जास्त पगाराची आहे. अर्थशास्त्राचा एम्. ए. आहेस ना?'

'होय.'

'तुला विद्यापीठाचं पदकही मिळालंय्?'

'हो तर. साहेब तुमची हरकत नसेल तर मी तुम्हाला माझ्या भवितव्याबद्दल काही विचारू का?'

'नोकरी चांगली सांभाळशील तर पंधरा-वीस वर्षांनंतर चार-पाचशे रुपये पगार सहज कमावू लागशील.'

'होहो! त्याशिवाय काही?' साहेबांच्या नजरेला नजर भिडवीत अरुणने विचारले.

'तुला 'रावबहादुर' ही पदवी मिळेल. हा निव्वळ योगायोग आहे.'

'पण साहेब, मी उत्तम काम केलं तर शेवटी मला ही तुमची खुर्ची मिळेल की नाही?'

साहेब जरा चमकला. हा शांत पोरगा फारच आगाऊपणे बोलत आहे असे त्याला वाटले. साहेब म्हणाला, 'अरे, ही तर कायदेशीर राजमान्यतेची जागा आहे.'

'म्हणजे खात्याचा मुख्य अधिकारी बनणं मला शक्य नाही?'

'कधीच नाही!' साहेब ठासून म्हणाला.

'मग माझ्यानं ही नोकरीसुद्धा होणार नाही. मी व्हाइसरॉय होऊ शकणार नाही, गव्हर्नर होऊ शकणार नाही, हे मान्य. पण मी खात्याचा प्रमुखसुद्धा बनू शकणार नाही हा कोणता जुलूम?'

साहेब एकदम गरम झाला. ताठ बसून तो घोगऱ्या आवाजात ओरडला,

'आज तुम्हाला खात्याचं प्रमुख बनवलं, तर उद्या तुम्ही गव्हर्नरची जागा मागाल, परवा व्हॉइसरॉयच्या खुर्चीवर तुमची नजर जाईल.'

'मग त्यात तुमचं काय गेलं ? आम्ही काय फक्त कारकून आणि मदतनीस होण्यासाठी जन्म घेतलाय का ?' अरुणने उलट विचारले.

'माझ्या खोलीतून चालता हो एकदम ! ' साहेबाने हुकूम सोडला. पुढचे बोलणे अर्थातच संपले होते.

अरुण किंचित हसला आणि म्हणाला,

'आणि ' तुम्ही माझा हा देश सोडून तावडतोब चालते व्हा ', असं म्हटलं, तर ?'

साहेबाने रागारागाने टेबलावर हात आपटला. पण तोपर्यंत अरुण खोलीच्या दरवाजापर्यंत पोचला होता.

अरुणचे वडील इंग्रजांचे कट्टर चाहाते होते. इंग्रज नियमाचे भोक्ते, निःपक्षपाती आहेत असे ते मानत. इंग्रजांची चिकाटी, सुव्यवस्था, याबाबत कौतुक करताना ते कधीही थकत नसत. अरुणचे मत मात्र वेगळेच होते. अर्थशास्त्राच्या खोल अभ्यासाने त्याला समजून चुकले होते की इंग्रज स्वार्थी आहेत. इतिहासाने त्याला सांगितले होते की इंग्रज काही संतांचे अवतार नाहीत. हिंदुस्थानावर आतापर्यंत इतक्या धाडी आल्या. त्यातलीच ही एक धाड, हिंदुस्थानावर कबजा करून बसली होती.

आपल्या या मतांवर अरुणचा पूर्ण विश्वास होता. इंग्रजांच्या चांगल्या कामातही तो दोष दाखवी. इतर परकीय टोळ्या हिंदुस्थानी बनून हिंदुस्थानवर राज्य करीत होत्या. परंतु इंग्रजांच्या टोळीने हिंदी लोकांना दूर ठेवले होते आणि गौरवर्णाच्या पडद्याआड ती राहात होती. हिंदुस्थानच्या भल्यासाठी या लोकांनी केलेले आणि करीत असलेले सगळे प्रयत्न त्याला दांभिक वाटत. हिंदुस्थानची राजकीय प्रगती करण्याचे इंग्रजांचे सगळे प्रयत्न त्याच्या मते वर्णाभिमान राखण्याचे प्रयत्न होते. हळूहळू त्याच्या मनात या सत्ताधारी वर्गाबद्दल द्वेष, चीड उत्पन्न होऊ लागली होती. त्यांच्या हाताखाली नोकरी करणे म्हणजे गुलामगिरी होय, असे त्याचे मत झाले होते. जोपर्यंत वरिष्ठ पदासाठी हिंदुस्थानी लोकांची लायकी मान्य करण्यात येत नाही, तोपर्यंत नोकरीचा विचारही शक्य नाही, असे त्याने ठरवले होते.

त्यातच वंगभंग चळवळीतील क्रांतिकारकांच्या विचारांनी त्याला आकृष्ट केले आणि त्याने क्रांती हेच आपले ध्येय ठरवून टाकले. गांधीजींच्या अहिंसात्मक असहकाराची तो टर उडवी. चरख्यात त्याला रस नव्हता. पाश्चात्य देशात यशस्वी झालेला क्रांतिवाद त्याला हिंदुस्थानसाठीही योग्य वाटू लागला. ही क्रांती हिंदुस्थानात कशी यशस्वी होईल, याचा शोध घेता घेताच त्याला स्वतःच्या विचाराचे ध्येयवादी तरुण भेटले. आणि त्यांनी एक गुप्त मंडळ स्थापन केले.

ह्या मंडळाच्या कार्याची कोणालाच कल्पना नव्हती. ही मंडळी बाँब बनवत होती की रेल्वेचे रूळ उखडत होती याबद्दल कसलाच पुरावा कोणाला मिळाला नव्हता. एक-दोनदा टपालाने त्यांना परदेशातून क्रांतिवादावरची काही पुस्तके आली. ती पकडली गेली आणि मग ह्या सगळ्या मंडळीवर कट करीत असल्याचा आरोप ठेवण्यात आला. आणि बचाव करायचा नाही या त्यांच्या आग्रहामुळे अनेकांच्यावर तो आरोप शाबितही करण्यात आला.

त्यातून अरुण सुटला. त्याला नोकरी मिळावी म्हणून त्याच्या वडिलांनी केलेली खटपट निष्फळ ठरली. त्यांनी मुलाला त्याबद्दल दोषही दिला.

'अरुण, हे काय घेऊन बसलायस तू ? यामुळे तुझी कीर्ती वाढेल असं का वाटतं तुला ?' त्यांनी विचारले.

'मी हे कीर्ती मिळावी म्हणून थोडंच करतो आहे ?' अरुणने उलट विचारले.

'मग कशासाठी ? दोन-चार भणंग वर्तमानपत्रांनी कौतुक केलं, तसा तू चढून गेलास. माझ्यामागे तुझं काय होईल याचा विचार केलायस का तू ?'

अरुणने काहीच उत्तर दिले नाही. वडिलांच्या मनाविरुद्ध तो वागला होता. परंतु वडिलांच्या समोर उलटून बोलायचा विचार स्वप्नातदेखील त्याच्या मनात आला नव्हता. वडिलांची माया तो पूर्णपणे ओळखून होता. अरुणचे लहान-मोठे सगळे हट्ट त्यांनी पुरवले होते, उलट अनेकदा कौतुकाने तो मागेल त्यापेक्षा जास्त देऊन त्यांनी त्याचे लाड केले होते. मुलानेही आतापर्यंत या कौतुकाची चांगली परत-फेड केली होती. वडिलांना तो मान देत आला होता. अभ्यासात तो यशस्वी ठरला होता. आता पोरगा चांगली नोकरी करील, पैसे कमावील आणि प्रतिष्ठा मिळवील अशी स्वप्ने पाहाणाऱ्या त्याच्या वडिलांना मुलाची नोकरीबाबतची ही अनास्था पाहून फार दुःख झाले होते. येईल हळूहळू ताळ्यावर असे त्यांना पहिल्यांदा वाटले खरे, परंतु मुलगा जेव्हा एका राजकीय खटल्यात गोवला गेला तेव्हा मात्र, ते एकदम म्हातारे झाले होते. मोठ्या मुष्किलीने त्या आरोपातून सुटलेल्या आपल्या मुलासाठी त्यांनी आपल्या नोकरीतील वशिल्याच्या जोरावर नोकरी आणली तर पोराने त्या कृपावंत युरोपियन अधिकाऱ्याचाच अपमान केला. म्हणूनच आज पहिल्यांदाच ते अरुणला दोष देत होते.

पण अरुणने त्यांच्या कुठल्याच प्रश्नाचे उत्तर दिले नाही. तेव्हा आता याला कोणत्या मुद्द्यावर जरब द्यावी हेच वडिलांना कळेना. बऱ्याच विचारांती त्यांनी एक

शेवटचा प्रहार करायचे ठरवले होते. पण तो अगदी निरुपाय झाला तरच शेवटी उपयोगात आणायचा होता. मुलाला रागे भरायची त्यांना आतापर्यंत सवय नव्हती. आणि मुलगा तर काही बोलतच नव्हता. त्यामुळे ते गोंधळून गेले आणि त्यांनी त्याला अचानक निकराची धमकी दिली.

'अरुण, तुला मी शेवटचं सांगून टाकतो. तू जर तुझे हे उपद्व्याप चालू ठेवणार असलास तर मी तुला ह्यापुढे एक पैसुद्धा देणार नाही.'

'पण मी कधी मागितले तुमच्याकडे ?' अरुण नरमाईने पण ठासून बोलत होता.

आपण उगीचच या थराला गोष्टी नेल्या, असा पश्चात्ताप त्या प्रेमळ वडिलांना वाटू लागला. आपण असे एकदम म्हणायलाच नको होते. चार दिवस त्याची समजूत घातली असती आणि मग त्याला ही धमकी दिली असती तर काय बिघडले असते ? एवढी कसली घाई होती ? उगीच त्या पोराचे मन दुखावले.

वडील कष्टी झाले. त्यांच्याच्याने पुढे काही बोलवेना. आता काय करावे अन् काय बोलावे, हेच त्यांना समजेना. ते तिथून उठून दुसऱ्या खोलीत गेले.

# 4. कृष्णकान्त

**गोरा आ ऽ ऽ ला**
**काय काय घे ऽ ऊ न ?**

अरुण विचारात गढून गेला होता. नोकराने येऊन त्याच्या हातात एक व्हिजिटिंग कार्ड दिले. तोपर्यंत त्याच्या मनात अनेक विचार येऊन गेले. त्याचे विचार एकाच मुद्द्यावर घोळत होते : वडिलांना खूष ठेवूनही देशसेवा कशी करता येईल ?

कार्डाकडे नजर जाताच त्याने नोकराला म्हटले, 'अरे आत बोलव ना त्यांना, लवकर !'

आत येणाऱ्याची वाट पाहात तो दाराकडे नजर लावून बसला. दोनतीन मिनिटांतच एक व्यक्ती दारातून ओरडतच आत आली, 'हॅलो, हॅलो, ओल्ड बॉय ! काँग्रॅच्युलेशन्स ! (हॅलो, हॅलो, दोस्त. अभिनंदन !)'

हे वाक्य उच्चारणाऱ्या व्यक्तीचा रुबाबदार इंग्रजी पोशाख होता. खुद्द विलायतेत राहाणाऱ्या इंग्रज तरुणांनीसुद्धा धडा घ्यावा असा, कसलीही उणीव नसलेला, तो पोशाख होता. इंग्रजी पोशाख अंगावर झकास बसतो आणि तो सोयीचाही असतो. ती व्यक्ती घाईघाईने आत आली. तिने आपला हात लांब करून अरुणचा हात धरला आणि जोराने हलवला. मग त्याने जवळचीच खुर्ची ओढली आणि तो तिच्यावर ऐसपैस बसला. आणि त्याने शिंगासारखा आपला सिगार ओढायला सुरुवात केली.

तेवढ्यात त्याच्या मागोमाग आलेल्या एका साध्यासुध्या गृहस्थाला त्या नवागताने खुणेनेच एक खुर्ची दाखवली. तीवर तो गृहस्थ बसला. या गृहस्थाने एक धोतर नेसले होते आणि अंगाभोवतीही एक धोतरच लपेटले होते.

'कृष्णकान्त, तुम्हाला कार्ड पाठवायची काय गरज होती ?' अरुणने विचारले.

'अर्थात. अशा पद्धती मुद्दाम पाळायलाच हव्यात. कोणाच्याही घरी आगाऊ

सूचना न देता जाण्याचा जंगलीपणा आता आपण टाकून दिला पाहिजे.' तोंडात सिगार ठेवूनच बोलण्याची सवय कृष्णकान्तने लावून घेतली होती. परिस्थितीनुरूप तो इंग्रजी किंवा गुजराती बोलत असे.

कृष्णकान्त हा अरुणचा मेहुणा. त्याच्या म्हणण्याला काही आक्षेप घ्यावा असे अरुणला वाटले नाही. म्हणून तो विषय तसाच सोडून त्याने विचारले, 'माझं अभिनंदन कशाबद्दल केलंत तुम्ही?'

'का? तू केसमधून निर्दोष सुटलास ही काय कमी आनंदाची बातमी आहे?' कृष्णकान्तने उलट अरुणलाच विचारले.

'तुमचं पत्र मिळालं होतं मला!'

'पत्र पुरत नाही अशा वेळी. मी स्वतःच यायला पाहिजे होतं. निकालाच्या दिवशी मी येणार होतो कोर्टात. पण माझ्या गिरणीतच थोडी कुरबुर सुरू झाली आणि मग मला येताच आलं नाही.'

'ताई आली होती.'

'आम्ही दोघही बरोबरच येणार होतो. अरे हो, या साहेबाची ओळख करून देतो हं. यांचं नाव जनार्दन. आमच्या शहरातले हे 'गांधीजी'.' कृष्णकान्तने हसत हसत ओळख करून दिली.

'मी म्हणजे गांधीजींच्या पायाची धूळ. जगात दुसरे गांधीजी नाहीतच.' जनार्दन म्हणाला.

अरुणला जनार्दनचे नाव ऐकून माहीत होते. त्याच्या स्वभावाबद्दल त्याला थोडी-फार माहितीही होती. परंतु त्याच्या मते अहिंसा म्हणजे भेकडांची नीती होती आणि चरखा फिरवणे हे दुबळ्या बायकाचे लक्षण होते. म्हणून अरुणने आतापर्यंत या गांधीजींच्या अनुयायाच्या कामाकडे जास्त लक्ष पुरवलेच नव्हते. जनार्दनला आता प्रत्यक्ष पाहिल्यावर अरुणची उत्सुकता वाढली. जनार्दनच्या अंगावर कुठेही भेकडपणाचे लक्षण नव्हते की चेहऱ्यावर कुठे दुर्बलतेची छटा नव्हती. त्याचा स्वच्छ चेहरा, निरोगी शरीरयष्टी पाहिली, आणि आपल्या मनात गांधीजींच्या अनुयायांबाबतच्या निर्माल्यता, चिंता, उपासमारी, औदासीन्य या कल्पना चुकीच्या होत्या असे त्याला वाटू लागले. अरुणने जनार्दनला नमस्कार केला आणि तो कृष्णकान्तला म्हणाला, 'मी यांचं नाव एकलं होतं. आज प्रत्यक्षच भेट झाली, याचा फार आनंद झाला. आता माझी ओळख करून द्या ना.'

'तुमची ओळख तर कृष्णकान्तांनी यापूर्वीच करून दिली आहे. तुमच्यावर खटला चालू होता तेव्हापासून, तुम्हाला नावानं तर ओळखत होतोच. मुंबईहून परतताना वाटेत कृष्णकान्त तुम्हाला भेटायसाठी इथे उतरणार होते. मी त्यांच्या बरोबरच होतो. मलाही तुम्हाला भेटायची इच्छा होती.' जनार्दनने सांगितले.

'फार चांगलं केलंत, फार उपकार झाले माझ्यावर. पण तुम्ही दोघं मित्र कधीपासून झालात ? ' अरुणने विचारले.

'आम्ही एकमेकांचे शत्रु-मित्र आहोत.' कृष्णकान्त हसून म्हणाला.

'मी नाही कोणाला माझा शत्रू मानीत. गिरणीचे मजूर आणि कृष्णकान्त यांच्यात बोनसबद्दल थोडी कुरबुर चालली होती. ती मिटवण्यासाठी त्यांनी मला मध्ये घातलं. दोन्ही बाजूंना मान्य होतील अशा अटी एखाद्या चांगल्या कायदे पंडिताकडून तयार करवून घ्याव्यात अशी कृष्णकान्ताची इच्छा होती. म्हणून ते मला बरोबर घेऊन गेले होते ' जनार्दनने सांगितले.

मजुरांच्या या तक्रारीबद्दल अरुणने वर्तमानपत्रात वाचले होते. तो भांडवलशाहीचा कट्टर शत्रू होता. मग समाधानकारक अटींबद्दल बरीच चर्चा झाली. गिरणी मालकांच्या स्वार्थपरायणतेबद्दल सूचना दिल्या गेल्या. तेही चांगले असू शकतात यावरही सहज चर्चा झाली. मग कृष्णकान्तने हा वादविवाद थांबवण्यासाठी विचारले,

'व्हेअर्स ओल्ड मॅन (म्हातारा कुठे आहे ? )'

कृष्णकान्तने हा प्रश्न आपल्या वडिलांना उद्देशून विचारला आहे हे अरुणच्या लक्षात आले. इंग्रजी भाषेच्या उत्तम अभ्यासाचा परिणाम, आणि जुनाट झालेल्या आर्यजीवनात इंग्रजी जीवनाचा भपका घुसवण्याची इच्छा, म्हणूनही तरुणाच्या बोलण्यात एक प्रकारच्या बेपर्वाईचा झोक,काहीशी चातुर्यपूर्ण बेअदबी आणि तिरस्कार-रहित टिंगल यांच्या छटा दिसू लागल्या आहेत. वाक्पटुता– स्मार्टनेस या नावाखाली या प्रथेचा मान हळूहळू वाढतो आहे. कृष्णकान्त संपूर्ण इंग्रजी रिवाजांचा चाहता होता. एका गुजरात्याच्या दिसण्यात आणि बोलण्यात जेवढी जास्तीत जास्त हुषारी आणि चलाखी येऊ शकते तेवढी ती कृष्णकान्तमध्ये उतरली होती.

'मी निरोप पाठवतो त्यांना. घरातच आहेत ते ' अरुणने उत्तर दिले.

'तुला माझ्याबरोबर यायचं आहे. सुरभीनं खास बोलावलं आहे तुला. एखादा आठवडा तरी बरोबर राह्यचंय.' कृष्णकान्तने अरुणला आग्रह केला. त्यात सुरभीचा, अरुणच्या बहिणीचाही आग्रह समाविष्ट होता.

वहिणीला भेटायची अरुणलाही इच्छा झाली. परंतु जुने रिवाज न पाळणाऱ्या या युगानही वहिणीच्या घरी जाऊन राह्यचा भावाला संकोच वाटतोच. त्यातून कृष्णकान्तच्या घरची राहाणी अगदीच वेगळ्या प्रकारची होती. त्याच्याबरोबर राहाणे अरुणला सोपे गेले नसते.

'आता कुठे जायचं ?' अरुणने आपली नाराजी व्यक्त केली.

'ते काही चालायचं नाही. आजच निघायचय आपण '

'माझी पण तुम्हाला तीच विनंती आहे. तुमची ओळख वाढली तर मला फायदाच होईल.' जनार्दनने म्हटले.

तेवढ्यात अरुणचे वडील तिथे आले. जणू काय आपल्याला नमस्कार करताच येत नाही, अशा तऱ्हेने कृष्णकान्तने त्यांना कसाबसा नमस्कार केला. जनार्दनची ओळख करून दिली. दोघांनी मिळून अरुणला बरोबर घेऊन जायची इच्छा व्यक्त केली आपण अरुणला दुखावले आहे. या जाणिवेने वडिलांनी अरुणला 'तुला आवडेल ते कर ' म्हणून सांगितले. वहिणीला भेटता येईल आणि जनार्दनच्या दिसून आलेल्या प्रवृत्ती प्रत्यक्ष पाहायची संधी मिळेल या भावनेने शेवटी अरुणने त्यांच्याबरोबर जायचे मान्य केले.

'देटस अ गुड बॉय. स्पोर्ट. (ह्याला म्हणतात शहाणा मुलगा ! )' उभा राहून अरुणची पाठ थोपटीत कृष्णकान्त म्हणाला. काही तासच तिथे थाबून तिघेही निघाले. मध्ये एकदा अरुणच्या वडिलांनी कृष्णकान्तला एका बाजूला नेले. आणि अरुणचे देशसेवेचे वेड नाहीसे करायचा प्रयत्न करण्याची त्याला विनंती केली.

'माझ्याकडे थोडे दिवस राहिला ना म्हणजे येईल वळणावर. तो योग्य लोकांत मिसळला नाही. योग्य समाजात मिसळला म्हणजे देश-बिश सगळ थोतांड लगेच विसरून जाईल तो ' कृष्णकान्तने मामाल्याला दिलासा दिला.

## 5. पहिली ओळख

**परकर, चोळी निरी घेरदार**
**सोनेरी शालूचा काठ छानदार**
**तलम सुंदर वस्त्रांमध्ये**
**झाकी अलबेली अपुले अंग !**

—न्हानालाल

मोठ्या व्यापारी शहराला अनेक स्टेशने असतात. कृष्णकान्ताच्या गिरणीच्या बागत रेल्वेने एक खास स्टेशन केले होते. आणि तिथली जा-ये वाढली म्हणून ते कायम करून वाढविले होते. अनेक लोक मुख्य स्टेशनाच्या ऐवजी याच स्टेशनाचा उपयोग करीत.

बरोबर जनार्दन होता. त्यामुळे अरुणच्या वडिलांनी सांगितले होते तरी कृष्ण-कान्तने अरुणला गाडीमध्ये कसलाच उपदेश केला नाही. गाडी स्टेशनात शिरली तसा खिशातून रेशमी रुमाल काढून कृष्णकान्तने तो हलवला. समोर,प्लॅटफॉर्मवर उभ्या असलेल्या अत्यंत सुशोभित पोशाखातल्या तरुणीनेही रुमाल हलवला. आणि गाडी थांबताच डब्यात चढून तिने कृष्णकान्तच्या गालाचे चुंबन घेतले.

अरुण डोळे विस्फारून पाहातच राहिला. एकान्तातसुद्धा कोणी कोणाचे चुंबन घेते का असा प्रश्न अरुणला एरवी पडे. ही शृंगारकथा म्हणजे निव्वळ चित्रातून दिस-णारी पुराणकथा किंवा दंतकथा आहे असे मानणाऱ्या अरुणने चुंबनाचे हे प्रदर्शन पाहिले तेव्हा तो अवाक् झाला. अरुणचा झालेला गोंधळ पाहून जनार्दन हसला.

'रंजन, हा सुरभीचा भाऊ.' कृष्णकान्तने अरुणची रंजनशी ओळख करून दिली. अरुण. रंजनला, कृष्णकांतच्या बहिणीला, नावाने ओळखत होता. एकदोनदा त्याने तिला पाहिलेही होते. परंतु ओळखीच्या स्त्रियांची यादी फार लांबलचक करायची

फिकीर अरुणला कधीच वाटली नाही. त्यातून रंजनने आज पोशाखही अगदीच वेगळा केला होता त्यामुळे रंजनला तो चटकन ओळखू शकला नव्हता.

'ओहो, अरुणभाई का ? मी तर ओळखलंच नाही !' रंजनने डोके किंचित तिरके केले. मग तिच्या मनात काहीतरी आले आणि तिने अरुणबरोबर हस्तांदोलन करण्यासाठी आपला हात त्याच्यापुढे केला. पोलिसांच्या लाठीमारामुळे जमा स्वयंसेवक सुन्न बनतो, तशा शून्यपणे अरुणने आपला हात पुढे केला.

'मजेत आहा ना ? वहिनी रोज तुमची आठवण काढतात' गप्प गप्प असलेल्या अरुणला रंजनने पुन्हा एकदा बोलायची संधी दिली. 'अं ? हंऽऽ' असे अर्धवट कोणाला कळतील न कळतील असे उद्‌गार अरुणने काढले. पण अडून बसलेली त्याची जीभ अजून बोलू शकत नव्हती.

'सुरभी नाही आली ग ?' कृष्णकान्तने विचारले. पत्नीचे नाव न घेण्याची जुनाट पद्धत आता जात चालली आहे. कृष्णकान्तच्याच वेगाने ही जुनी पद्धत टाकून दिली गेली तर येत्या दहा-वीस वर्षांच्या आत हिंदूंच्या मर्यादशीलतेचे हे उदाहरण दंतकथेत किंवा जुन्या धाटणीच्या कहाण्यांत जमा होईल.

'तिची तब्येत बरी नाही. फिरायची तर तिला मुळीच आवड नाही.' रंजनने उत्तर दिले. रंजनने जनार्दनला पाहिले अन् त्याला नमस्कार केला. कोणाशी हस्तांदोलन करायचे आणि कोणाला नमस्कार करायचा, याविषयी आपल्या समाजात अजून काही नियम झालेले नाहीत. परिस्थितीनुरूप दोन्ही प्रकार उपयोगात आणले जातात. आणि तेच बरोबर आहे.

सगळेजण गाडीतून उतरले. स्टेशनबाहेर उभ्या असलेल्या मोटारीजवळ आले. रंजन चटकन गाडीच्या पुढच्या भागात जाऊन बसली. आणि तिने आपल्या शेजारी बसायला अरुणला बोलावले.

'या अरुणभाई, तुम्ही माझ्याजवळ बसा. भाई आणि जनार्दन मागच्या बाजूला बसतील.' रंजन म्हणाली.

रंजनच्या वागण्याने आश्चर्यचकित झालेला अरुण तिघांकडे विस्फारलेल्या नजरेने पाहात होता. तो जाऊन गाडीच्या पुढच्या जागेत, रंजनजवळ बसला. आता गाडी चालवणारा कुठे बसणार हा प्रश्न साहजिकच त्याच्या मनात आला. परंतु त्याच्या शंकेचे निरसन ताबडतोबच झाले.

'मी चालत जाईन की आश्रमापर्यंत.' जनार्दनने म्हटले.

'छे, छे. गाडी आहे, मग चालायचं कशाला ?' कृष्णकान्त म्हणाला.

'मी एका दिशेला जाणार आणि तुम्हाला दुसऱ्या दिशेनं जायचं. उगीच तुम्हाला त्रास.'

'त्यात त्रास कसला ? पाच मिनिटं इकडेतिकडे. मी चटकन पोचवते ना तुम्हाला.' रंजनच्या या बोलण्याने अरुणच्या डोक्यात प्रकाश पडला. गाडी रंजनच चालवणार होती !

जनार्दन आणि कृष्णकान्त मागे बसले. आणि रंजनने मोटार चालू केली.

मोटारीत बसल्यावरच मोटारीत बसायची कोणाची लायकी आहे आणि कोणाची नाही, हे कळून येते. एखाद्या गबाळ्यासारखा, मोटारीला बसणाऱ्या धक्क्याने हादरणारा, दाराला किंवा खिडकीला घट्ट पकडून बसणारा, घाबरून गेलेला माणूस पाहिला की पक्के समजावे, हा मोटारीत पहिल्यांदाच बसला आहे म्हणून. जरुरीपेक्षा जादा हुषारी दाखवणारा, चेहऱ्यावर हसू आणलेले, इतरांच्या समोर दबून संकोचून बसण्याची तयारी दाखवणारा मनुष्य पाहिला की,समजावे, हा दुसऱ्याच्या गाडीत बसलेला आहे. मालकाची ऐट काही वेगळीच असते. बसणाऱ्याचा चेहरा किंवा त्याचे हातवारे यावरूनच तुम्हाला चटकन मोटारगाडीचा मालक कोण ते सांगता येते.

अरुणला अशा गाड्या माहीत नव्हत्या असे काही म्हणता आले नसते. परंतु रंजनसारख्या तडफदार तरुणीशी त्याचा आतापर्यंत संबंध आला नव्हता. त्याने रंजनकडे न पाहताच रंजनची मूर्ती कल्पनेने रंगवायला सुरुवात केली. रंजनच्या पोशाखाचा तपशील तो तपासू लागला. तिचा आजचा वेष पाश्चात्य नक्कीच नव्हता. पण मग त्याला तो पोशाख इंग्रजी का वाटला ? हात जास्त उघडे राहिले होते म्हणून ? कोण जाणे ! ह्या पोशाखाला बंगाली पद्धतीचाही म्हणता आले नसते. पण थोडेसे अंग उघडे राहिल्यामुळे त्याला जरा बंगाली छटा आल्यासारखे वाटत होते. हा महाराष्ट्रीय धाटणीचाही नव्हता. अंगाला चापूनचोपून बसलेल्या कपड्यांमुळे कदाचित तसे वाटण्याचा संभव होता. या पोशाखाला पार्शी पद्धत म्हणता आली नसती. पण मुद्दाम काळजीपूर्वक गबाळ्यासारखे नेसल्यामुळे साडी किंचित मुटल्यासारखी वाटत होती. म्हणून कदाचित तसा भास होत असावा. पण मग रंजन नक्की काय नेसली होती ? गुजराती पद्धतीच्या या नेसूत रंजनने सगळ्या प्रकारच्या पोशाखाची छटा आणली होती की काय ?

अचानक मोटार थांबली. समोर एक छोटे मैदान दिसत होते. जवळच एक छोटे

घर होते. तिथे जनार्दन उतरला. सगळ्यांनी त्याला नमस्कार केला. अरुणला उद्देशून जनार्दन म्हणाला,

'आता तुम्ही केव्हा भेटणार?'

'मला इथे काहीही काम नाही. तुमचा आश्रम पाहाच्या निमित्ताने तर मी इथे आलो आहे.'

'मग उद्या वाट पाहातो तुमची.'

'हो चालेल. उद्या नक्की येईन मी.'

'मीच गाडीतून घेऊन येईन त्यांना.' रंजन म्हणाली. जनार्दन गाडीपासून दूर झाला. आणि रंजनने गाडी वळवून घेऊन वेगाने सोडली.

अरुण पुन्हा रंजनचा विचार करू लागला. जसा पोशाख चमत्कारिक तसेच वागणेही! शभर वर्षापूर्वीच्या एखाद्या गुजराती बाईने रंजनला अशी मोटार चालवताना पाहिले असते तर तिने रंजनला ओळखले तरी असते का? हीही एक गुजरातीणच आहे हे तरी तिला समजले असते का? असे चापल्य, अशी सफाई, असे स्वातंत्र्य, तिला पटेल तरी का? जगात सर्वत्र घडून येत असलेल्या क्रांतीचे प्रतिबिंब रंजनच्या वागण्यात पडलेले नाही ना? अन् हे प्रतिबिंब असेल तर क्रांती किती मोहक असली पाहिजे! असल्या क्रांतीची कल्पना हिंदुस्थानात का नाही फैलावत?

'तुम्हाला गाडी चालवायची आवड आहे का?' अरुणकडे न पाहाता रंजनने विचारले. अरुणचे विचार थांबले. प्रश्न आपल्यालाच विचारलाय का याची खात्री करून घेण्यासाठी अरुणने रंजनकडे पाहिले. आपल्या प्रश्नाचे उत्तर मिळाले नाही, असे पाहून रंजनने चालत्या गाडीवरचे लक्ष काढून क्षणभर अरुणकडे पाहिले.

'मला विचारलंत?' गोंधळून जाऊन अरुणने विचारले.

'हो ना.' हसून रंजनने उत्तर दिले.

तिच्या हास्यातसुद्धा अरुणला एक नवीन गोडवा जाणवला. अरुणच्या प्रश्नाला 'हो'कार देऊन रंजनने आपली नजर पुन्हा समोर, गाडीकडे वळवली. तेजस्वी ताऱ्याच्या मागे प्रकाशाची रेषा रेखावी, तशी मधुर हास्याची एक रेषा अरुणला दिसली.

'मला सराव नाही.' अरुणने उत्तर दिले.

'चार दिवसांत शिकवीन मी तुम्हाला.' अरुणकडे न पाहताच रंजन म्हणाली.

अशा तडफदार तरुणीशी बोलताना पहिल्यांदा फार संकोच वाटतो, तसेच उतू जाणारा उत्साहही वाटतो. रंजनबरोबर गप्पा माराव्यात असे अरुणला वाटत होतेच.

परंतु गप्पा मारायला त्याला विषयच सापडत नव्हता. प्रत्येक ठिकाणी देशसेवेबद्दल बोलता येत नाही याची आयुष्यात आज त्याला प्रथमच जाणीव झाली. क्रांतीच्या तत्त्वज्ञानालाही जीवनात कुठेतरी मर्यादा पडतात. देशसेवा आणि क्रांती या दोन विषयांखेरीज गप्पा मारायला त्याची तयारी नव्हती.

'तुम्हाला तुरुंगाचाही अनुभव आहे ना ?' थोड्या वेळाने रंजनने पुन्हा सुरुवात केली. यावेळी मात्र ती समोर पाहात नव्हती. म्हणूनच हा प्रश्न आपल्यालाच विचारला आहे याबद्दल अरुणची खात्री पटली. आता आपल्याला आपल्या आवडत्या विषयावर बोलता येईल, हे लक्षात घेऊन त्याला फार आनंद झाला. तो चटकन उत्तरला, 'हो ना.'

आता पुढे काय बोलावे,हा त्याला पुन्हा प्रश्न पडलाच, आज आपल्याला बोलताच येणार नाही,असे त्याला वाटू लागले. अनेक ओळखीच्या लोकांच्या मोटारी जात होत्या. रंजनकडे पाहून त्यातल्या अनेकांनी टोप्या काढून तिला अभिवादन केले, रुमाल हलवले. रंजन प्रत्येकाकडे पाहून आपले मधुर हास्य करीत होती. अरुण जरा विचारात पडला. ही तरुणी इतरांकडे पाहून जशी हसते आहे, तशीच आपल्याकडेही पाहून हसते आहे. इतरांच्यासारखेच सामान्य स्मितच तिने आपल्याही वाट्याला दिले की काय ?

'किती दिवस होतात तुम्ही तुरुंगात ?' थोड्या वेळाने रजनने पुन्हा विचारले.

'केस चालू होती, तोपर्यंतच. एखादं वर्ष.'

तेवढ्यात गाडीने एका मोठ्या बागेत प्रवेश केला. आपण आपल्या बहिणीच्या घरी पोचलो, हे अरुणच्या लक्षात आले. गाडी पायऱ्यांसमोर उभी राहिली आणि तिघेही जण खाली उतरले.

'चला, मी तुम्हाला वहिनीकडे घेऊन जाते.' पुढे होत रंजनने अरुणला म्हटले. दोघे एका खोलीत गेली. तिथे एका सोफ्यावर निजलेल्या तरुणीने बसल्या जागेवरूनच सावकाश समोर पाहिले. आणि एकदम तिच्या हालचालीत उत्साह आला. ती उठून उभी राहात प्रेमळ आवाजात म्हणाली, 'भाई, तू कसा इथे ?'

'तुला भेटायला. पण तू अशी का झालीस ?' अरुणने उलट तिलाच विचारले.

'काही नाही रे उगीचच.' कसली तरी तीव्र वेदना लपवायचा प्रयत्न करीत सुरभी म्हणाली.

'काय अरुण ? रस्ताभर रंजनने तुझं डोकं पिकवलं की नाही ?' आत येणाऱ्या कृष्णकान्तने प्रश्न केला.

सुरभी मागे सरकली आणि जाऊन सोफ्यावर बसली.

# 6. परिस्थितीचे तावेदार

**सूर्याने दिवसा उजेड दिला**
**अंधार रात्रीचा केला कशाला ?**
**बिजली गे !**

**—न्हानालाल**

रंजन स्टेशनवर जाऊन आली होती. तिला तोंड धुऊन केस विंचरणे भागच होते. मोटारीत बसून जा किंवा पायी चाला, अस्फाल्टचा रस्ता असला तरी धूळ उडल्या-शिवाय राहात नाही, असे तिचे म्हणणे होते. आणि त्याविरुद्ध कोणी काही बोलूच शकत नसे. श्रीमंतांना स्वच्छता फार प्रिय. कारण इच्छेप्रमाणे स्वच्छता राखण्याची सोय त्यांना उपलब्ध असते. वडीलधाऱ्यांनी उत्तेजन दिले, त्यामुळे रंजनला स्वच्छ-तेची इतकी आवड निर्माण झाली होती की, घरात बसल्याबसल्यासुद्धा दर दोन तासांनी प्रसाधन केल्यावाचून तिचे चालत नसे. आताही ती उठली आणि, 'वहिनी, मी आलेच.' असे म्हणून तिथून बाहेर गेली.

कृष्णकान्तने एक खुर्ची ओढली आणि तो सुरभीच्या जवळ जाऊन बसला. त्याने सुरभीच्या हातावर आपला हात ठेवला. सुरभीची प्रकृती कशी काय आहे हे पाहाण्या-साठीच कृष्णकान्तने तिच्या हातावर आपला हात ठेवला खरा, परंतु तेवढ्यानेही सुरभी संकोचली.

'का ग, तुला प्रकृती सुधारायची नाही वाटते ?' त्याने सुरभीला विचारले.

'मला काय झालंय ?' नजर एका बाजूला वळवत सुरभीने विचारले.

'बघ, तुला बरे वाटावे म्हणून तुझ्या भावाला घेऊन आलोय. एका आठवड्यात

तुझं वजन वाढलं नाही ना . . .

कृष्णकान्ताचा सिगार विझला होता. त्याने एक सुदर चकाकती काडेपेटी काढली आणि काडी पेटवून सिगार पुन्हा पेटवला. प्रत्येक कामात तरबेज हात वेगळाच पडतो. विजेच्या पंख्याखाली बसलेल्या कृष्णकांतने फरफर करून मोठ्या सफाईने काडीची ज्योत सांभाळून आपला सिगार पेटवला.

'नाहीतर काय ?' सुरभीने विचारले.

'नाहीतर मग बघच.' हसत हसत कृष्णकान्त म्हणाला,

आता रात्र झाली होती. विजेच्या दिव्याचा थंड, भुरकट उजेड पडला होता. अरुणचा गोंधळ अजून कमी झाला नव्हता.

'अरुण, तू आधी जेवणार की, माझ्याबरोबर ? आज मी माझ्या काही मित्रांना जेवायला बोलावलंय.' कृष्णकान्तने सांगितले. हल्लीच्या काळात पाहुण्यानाही इतरांच्या बरोबरीने भरपूर स्वातंत्र्य दिले जाते. आपल्याचबरोबर, आपल्याच पद्धतीने पाहुण्यांनी जेवले पाहिजे असा आग्रह यजमान धरत नाहीत.

'भाई माझ्याबरोबरच जेवील.' सुरभीने सांगितले.

'प्लीज युवरसेल्फ ! तुझी मर्जी' म्हणून कृष्णकान्त जागचा उठला. 'जेवणाची व्यवस्था कुठवर आली आहे ते पाहून आलोच मी'. कृष्णकान्त सुरभीकडे पाहून हसला आणि तो खोलीच्या बाहेर पडला. त्याच्या सिगारचा धूर आणि तंबाखूचा कडक, गोड वास मागे उरला.

आता भाऊ आणि बहीण एकटेच राहिले. थोडा वेळ दोघांनीही एकमेकांकडे टक लावून पाहिले आणि एकाएकी सोफ्याच्या हातावर माथे टेकून सुरभी स्फुंदून स्फुंदून रडू लागली.

भाऊ-बहिणींसारखा प्रेमळ, निष्पाप संबंध मान्या जगात कुठल्याही नात्याचा नाही. बालकाच्या निर्व्याज हास्यासारखे निष्कलंक, दोन मित्रांच्या मैत्रीसारखे आकर्षक, वियोगी जोडप्याप्रमाणे विव्हलता निर्माण करणारे आणि माता-पित्यांच्या वात्सल्यासारखे स्वार्थरहित असे प्रेम फक्त बहीण-भावांच्यात आढळते.

अरुण सुरभीच्या जवळ गेला. क्षणभर तसाच उभा राहिला. मग त्याने आपला हात तिच्या मस्तकावर ठेवला.

'ताई !'

मानवी भाषेतला अत्यंत पवित्र शब्द अरुणने उच्चारला होता. रडणाऱ्या बहिणीने

चेहरा वर उचलला आणि भरल्या डोळ्याने भावाकडे पाहिले.

'असं काय करतेस ग ?' अरुणने प्रेमाने विचारले.

सुरभीने पातळाच्या पदराने अश्रू पुसले आणि किंचित हसून उत्तर दिले,

'काही नाही रे भाई, उगीचच रडू आलं. तुला पाहिलं आणि का कोण जाणे, हृदय भरून आलं. तू आलास, मला फार फार बरं वाटलं.'

खोटा उत्साह आणून सुरभीने गप्पा मारायला सुरुवात केली. परंतु अरुणला मनातल्या मनात जाणवले की काहीतरी कारणामुळे सुरभीचे मन दुखावलेले आहे. भावाबहिणीच्यात दोन वर्षांचे अंतर होते. पाठोपाठच्या भावाबहिणीच्यात जे समजूतदार संबंध असतात ते इतर नात्यात फारच क्वचित असू शकतात. भावाला आपल्या मनातले दुःख कळले आहे, हे सुरभीला समजले होते. भावाच्या मनात त्याचे दुःख राहू नये म्हणून सुरभीने आनंदाने गप्पा मारायला सुरुवात केली. गप्पा मारता मारता दोघेही खूप हसत होती. दोघांनाही आपले लहानपण जणू आठवले होते.

तरीसुद्धा अरुणच्या डोळ्यासमोरून बहिणीचे अश्रू हलू शकले नाहीत. सुरभीच्या घरात अपार वैभव होते. कृष्णकान्त गर्भश्रीमंत होता. त्याच्या आजोबाच्या वेळेपासून त्यांच्या कुटुंबात वैभव नांदत आले होते. त्याच्या वडिलांनी ते राखलं. वाढवलं. कृष्ण- कृष्णकान्तही चांगला शिकला. स्वतःच्या व्यवसायाव्यतिरिक्त साहित्य, कला, राजकारण, समाजसुधारणा अशा सगळ्या विषयात रस घेत होता. त्याने युरोप-अमेरिकेचा प्रवासही केला होता. त्याची चांगल्या चांगल्या युरोपियन अधिकाऱ्यांशी मैत्री होती. जातिपातीचा भेद न पाळणारे युरोपियन हिंदुस्थानात आले की ते स्वतःचीच एक जात निर्माण करतात, हा कदाचित या देशाच्या परिस्थितीचा कमनशिबी परिणाम म्हणावा लागेल. परंतु ते आपल्या समाजात हिंदुस्थानी लोकांना अजिबात मिसळून देत नाहीत हे मात्र खरे. म्हणूनच युरोपियन क्लबचा एकुलता एक हिंदी सभासद होण्याचा मान एकट्या कृष्णकान्तला मिळाला यावरूनच त्याला युरोपियन समाजात केवढा मान होता हे समजून येत होते.

कृष्णकान्तच्या वडिलांचे तर साफ मत होते, की शिक्षणाबद्दल युरोपियन समाजाला जेवढी आस्था होती तेवढी हिंदवासियांना निश्चितच नव्हती. म्हणून त्यांनी आपल्या मुलांना लहानपणापासूनच गव्हर्नेस आणि कँपॅनियन शिक्षक म्हणून युरोपियनांचीच नेमणूक केली. त्यामुळे त्यांची प्रतिष्ठा तर वाढलीच, शिवाय मुलांनाही स्वच्छतेची आणि व्यवस्थितपणाची सवय लागली होती. त्यांच्या आयुष्यात कपड्यांना खास

महत्त्व मिळू लागले. त्यांना इंग्रजी भाषा चांगल्या रीतीने बोलता येऊ लागली.चार-चार सहा-सहा वर्षांच्या छोट्या मुलांचे बोलणे मुळातच गोड असते. त्याच वयात जर त्यांना ग्रॅज्युएटच्या तोंडीची इंग्रजी भाषा बोलता येऊ लागली तर त्यांच्या बोलण्याला आणखीच गोडी येते. 'बाप्पा' किंवा 'बा' असल्या खेडवळ शब्दांऐवजी त्यांच्या तोंडातले पपा, डॅडी, ममा, मा (गुजराती 'मा' नाही, इंग्रजी) असले लडिवाळ इंग्रजी शब्द ऐकले की पित्याचे हृदय आनंदाने उचंबळून येई. छोटा कृष्णकान्त किंवा रंजन 'डान्स लिटिल बेबी' किंवा 'होम, स्वीट होम' सारख्या इंग्रजी कविता अस्सल इंग्रजी उच्चारात म्हणू लागले की त्यांच्या इंग्रजी शिक्षणावर केलेला खर्च सार्थकी लागला अशी त्यांच्या वडिलांची खात्री होई. ही मुले 'गुड मॉर्निंग' पासून सुरुवात करून एखाद्या इंग्रजाशी किंवा इंग्रजाच्या गावठी नकलेशी दहा-दहा, पंधरापंधरा मिनिटे बोलत राहिली की,त्यांच्या वडिलांना आपल्या सात पिढ्यांचा उद्धार झाल्याचा आनंद होई.

या वातावरणात वाढलेले कृष्णकान्त आणि रंजन सगळ्यांचे लक्ष आपल्याकडे वेधून घेत, यात नवल नव्हते. तीन पिढ्यांच्या श्रीमंतीमुळे कृष्णकान्तचे मन उदार बनले होते. त्याच्या औदार्याचा फायदा घेणारे, फायदा करून घेतल्यानंतर मात्र त्याला उधळ्या म्हणत. धन-प्राप्ती बऱ्याच वेळा एखाद्या यंत्रासारखी नियमित आणि साधीसुधी गोष्ट होऊन बसते. सूर्योदय नियमितपणे होण्यासाठी आपल्याला जेवढी मेहनत घ्यावी लागते तेवढीच मेहनत कृष्णकान्तला पैसे मिळविण्यासाठी करावी लागे. आजोबा आणि वडील यांनी चालू करून दिलेले चक्र फिरतच होते. ते काम निर्विघ्न चालू आहे एवढीच काळजी कृष्णकान्तला काही काळ घ्यावी लागे त्यामुळे त्याला समाजात आणि मित्रांच्यात रमायला भरपूर वेळ होता.

कष्ट, कुरबुरी त्याला मुळीच पसंत नव्हत्या. जीवन सुखाने, सरळ घालवायचे, एवढेच त्याचे ध्येय होते. सुरभीशी त्याचे लग्न झाले. यापेक्षा आणखी भाग्य काय असू शकेल, अशी सुरभी आणि तिचे वडील या दोघांचीही त्यावेळी भावना होती. सुरभीचे जीवन अत्यंत सुखाचे आहे अशीच अरुणची कल्पना होती. कारण स्वतःच्या घराबद्दल बोलताना सुरभी नेहमीच उल्हसित असे. अरुणने स्वतःसाठी कष्टमय जीवनाचा स्वीकार केला होता खरा, परंतु स्वतःची लाडकी बहीण सुखासमाधानात राहात आहे या जाणिवेने त्यालाही आनंद होई. म्हणूनच आज सुरभीला अश्रू गाळताना पाहून त्याचे हृदय हेलावले. बहिणीला हा प्रसंग विसरून जायचा होता. पण त्याच्या मनातून

मात्र तो प्रसंग जात नव्हता.

एक नोकर आत आला आणि मोठ्या नम्रपणाने त्याने सांगितले,

'साहेबांनी बाटल्या मागितल्यात.'

'जा, जा. आला मोठा बाटल्या मागणारा. चालता हो अिथून.' एकाएकी चिडून जाऊन सुरभीने नोकराला डाफरले.

हा नोकर म्हणजे भारी पगारावर नेमलेला स्वयंपाकी होता. इंग्रजी पद्धतीचे जेवण बनवून ते वाढायचे असले म्हणजेच त्याच्याकडून काम करवून घेतले जाई. तो तसा महागडा होता. मालकाकडून डाफरवून घ्यायची सवय इतर नोकरांना असली तरी तो एकटा मात्र कधीही असे डाफरवून घेत नसे.

तोंड वाकडे करून नोकर निघून गेला.

'तू अशी चिडकी कधीपासून झालीस ? तू बाटली का नाही दिलीस त्याला ?' अरुणने विचारले. सुरभीचा स्वभाव पूर्वी इतका चिडका नव्हता हे अरुणला माहीत होते.

'भाई, या बाटल्यांची सवय लागलीय ' सुरभीच्या आवाजात व्याकुळता होती.

'कोणाला ?' आश्चर्याने अरुणने विचारले.

'ते समजून घे तूच.'

'कृष्णकान्ताना ?'

सुरभी काहीच बोलली नाही. अरुणही काही न बोलता थोडा वेळ तसाच बसून राहिला. तो मुळात स्वतः निर्व्यसनी होता. जगातल्या दैन्यावस्थेत व्यसनांना जागा असूच नये या मताचा तो होता. अनेक दरिद्री लोक व्यसनात सापडल्याचे तो पाहात होता. तथापि गरीब आणि श्रीमंत यांच्या व्यसनात तो नेहमीच एक मोठा फरक करीत असे. गरिबांच्या व्यसनाची कीव करावी अन् श्रीमंतांच्या व्यसनांचा धिक्कार करावा असे त्याचे मत होते. गरिबाचे पाप हा अजाणता पत्करलेला सुटकारा होता तर श्रीमंतांचे पाप हे जाणूनबुजून अंगीकारलेले दुर्वर्तन होते.

अरुणच्या क्रांतिवादात तलवारीच्या धारीसारखे प्रखर नियमन होते. परंतु त्या नियमनात धर्मभीरुता नव्हती. पाप-पुण्याची व्याख्या कालानुसार बदलत राहाते. 'देवाला आवडत नाही ते पाप ' नसून जगात राहणाऱ्या प्रत्येक मानवाला जे दुःखी करते ते पाप असे त्याचे तत्त्व होते. गांधीवादात पराक्रमहीन दैन्याव्यतिरिक्त धर्माभिमान होता, हे त्याला गांधीवाद न आवडण्याचे एक मुख्य कारण होते. म्हणून

मद्यबंदीची चळवळ समाजाला उपकारक आहे एवढेच त्याने मान्य केले होते. मद्यपी म्हणजे मूर्तिमंत पाप असे तो मानत नसे. माणूस आपल्या इच्छा कुठल्या थरापर्यंत तृप्त करू शकतो या प्रश्नाचा गुंता सोडवत तो बहिणीकडे पाहात राहिला.

तेवढ्यात आपल्याशीच हसत कृष्णकान्त खोलीत आला. सुरभीने तोंड फिरवले. कृष्णकान्त मनाचा चांगला नसता तर आपल्या पत्नीने आपला उघडउघड उपहास केल्याबद्दल त्याने काय केले असते हे, हिंदू समाजातच नव्हे तर, कोणत्याही समाजात, समजणे अवघड नाही. परंतु कृष्णकान्त आत आला आणि चेहऱ्यावर कसलाही फरक न दाखवता त्याने विचारले.

'सुरभी, त्या बाटल्या तूच ठेवल्यास ना ?'

'तुम्हाला कोणी सांगितले ?'

'बटलरने.'

'होय. मीच ठेवल्यात. का ? काय पाहिजे ?'

'आता जरा काढून दे ना त्या. जेवताना हव्या आहेत.'

'एकसुद्धा बाटली काढून देणार नाही मी. हे तुम्ही काय चालवलंय ?'

'डोन्ट बी सिली. (वेडपटपणा करू नकोस.) कलेक्टर आणि कमिशनर येणार आहेत जेवायला. आणि तू बाटल्या देत नाहीस म्हणजे काय ? '

'म्हणजे काहीही असेल पण दारूशिवाय चालणारच नाही असं काही आहे का?'

'हो. .हो. .' कृष्णकान्त पाश्चात्य पद्धतीने थोडे मोठ्यानेच हसला. हसायच्या पण वेगवेगळ्या पद्धती असतात हे विसरून चालणार नाही.

'बघ अरुण, या सुरभीला वाटतं बाटलीत काहीही असलं तरी ती दारूच. तू सांगितलंस तर ऐकेल कदाचित. तिला समजावून सांग की ही दारू नाही. तिला 'लिकर्स ' म्हणतात. लिकर्स म्हणजे जवळजवळ आपलं सरबतच. '

कितीही चांगल्या रीतीने त्या शब्दाचा उच्चार केला तरी त्याचा अर्थ कसा काय बदलतो, हे अरुणच्याही लक्षात आले नाही. सुरा काय, दारू काय आणि लिकर्स काय, या सगळ्या शब्दांचा अर्थ एकच होता. मात्र त्यांच्यामुळे चढणाऱ्या नशेचे प्रमाण कमीजास्त होते. त्यामुळे कित्येक प्रकारच्या मद्याला सभ्य युरोपीय समाजात विरोध होत नाही, हे अरुणलाही माहीत होते.

ते काहीही असो. अरुण मद्याचा जाणकार नव्हता. त्यामुळे जाणकाराला सहज समजावून सांगता येतील असे फरक त्यालाही माहीत नव्हते. मात्र सुरभी करतेय

तो हट्ट अवाजवी आहे एवढे त्याला ठाऊक होते. कारण गुपचुपपणे रात्रभर चालू राहाणाऱ्या इंग्रजी दारू-दुकानातून हवे ते पेय आणण्यासाठी कृष्णकान्तजवळ पैसा, माणसे आणि वाहन यांचा तुटवडा नव्हता. म्हणूनच अरुण म्हणाला, 'दे ना काढून.'

ज्या गोष्टीचा स्वतःला भारी तिटकारा होता त्याच गोष्टी करायला आपला भाऊ सांगतोय हे सुरभीला आवडले नाही. चेहऱ्यावर तिरस्कार दाखवीत सुरभी जरा नाराजीनेच उठली. कपाटाजवळ जाऊ लागली तेव्हा कृष्णकान्तला सुरभीचे डोळे जरा चिडखोर दिसले. पत्नीच्या डोळ्यातून प्रेमाचा वर्षाव व्हावा अशी कृष्णकान्ताची इच्छा होती. म्हणून तो म्हणाला, 'नको, नको. तुला आवडत नसेल तर राहू दे.'

'प्लीज युवर सेल्फ (तुझी मर्जी)' असे म्हणत तो खोलीच्या बाहेर गेला.

वहीण आणि मेहुणा यांच्यात आलेल्या या विनुष्टात दोष कोणाचा याचा विचार करीत असतानाच अरुणचे लक्ष खोलीत भरलेल्या सुवासाकडे गेले. चहूकडे सुवास दरवळीत रंजन आत आली. तिने साधेच कपडे नीटनेटकेपणाने नेसले होते. रंजनच्या हालचालीत अधीरता होती. घाईघाईने ती सुरभीच्या जवळ उभ्या असलेल्या अरुणकडे गेली आणि त्याला म्हणाली, 'चला अरुणभाई, मी तुमची एका मोठ्या साहित्यिकाशी ओळख करून देते.'

'का ग, हे असे कपडे घातलेस ? तुला 'डिनरला' नाही जायचं ?' सुरभीने रंजनला विचारले.

'नाही ग बाई ! मी तुमच्याबरोबरच जेवणार आहे. मला नाही तो गोंधळ आवडत.' रंजन म्हणाली.

रंजनला गडबड-गोंधळ आवडत नाही, ही नवलाची गोष्ट होती. सकाळी उठल्या-पासून ते रात्री झोपेपर्यंत, आणि रात्री झोपेतसुद्धा, रंजनला गडबड गोंधळाशिवाय करमत नसे. रंजनचे हे बोलणे दुसऱ्याच कसल्यातरी गडबड गोंधळाबद्दल चालले असावे असे अरुणला वाटले. श्रीमंतांचा रिकामा वेळ अशा डिनरसारख्या गडबडींनी भरलेला असावा लागतो.

'येता ना ?' रंजनने अरुणला विचारले.

'पण मला साहित्यात फारस गम्य नाही.' अरुणने सांगितले.

'मग काही फारसं बिघडत नाही. साहित्यात फारशी समज असावी लागतेच असं नाही.' रंजन हसत हसत म्हणाली.

'कोण आलंय ग ?' सुरभीने विचारले.

'विमोचन.'

'तो 'डिनर'साठी आला असेल ना ?'

'हो. पण जरा लवकर आलाय तो, मला भेटायला.' रंजनने सांगितले. आणि तिने एक गूढ स्मित केले.

'मग दुसऱ्याला कशाला बोलावतेस ?" रंजनकडे बघत सुरभीने हसत हसत विचारले.

'ते तुम्हाला नाही कळायचं ! चला, अरुणभाई.'

अरुण उठला आणि रंजनच्या मागून जाऊ लागला. रंजन थांबली आणि अरुण-बरोबर चालू लागली. अरुण पुरोगामी विचाराचा असला तरी रंजनबरोबर चालताना त्याला संकोच वाटू लागला.

'इतक्या जवळून चालायची काही गरज आहे का ?' त्याने स्वत:च्याच मनाला विचारले.

# 7. साहित्यिक

**भाषेची ओळख मूर्खाला नाही !**
**रणात जिंकी तो शूर पाही**

**—अखो**

रंजनची खोली रंजनसारखीच अकपक, स्वच्छ आणि शोभिवंत होती. विजेचा मोहवून टाकणारा सुंदर प्रकाश त्या खोलीच्या वातावरणाला स्वर्गीय रूप देत होता. नाटकाच्या रंगमंचावर स्वर्गाचा किंवा परीराज्याचा देखावा पाहिला की नाटचरसिक जसे त्याला 'अहाहा' अशी दाद देतात, तशीच दाद रंजनच्या खोलीतली प्रकाश-व्यवस्था पाहून द्यावीशी वाटे. अरसिक अरुणसुद्धा त्या प्रकाशयोजनेने दिपून गेला.

तिथल्या एका खुर्चीवर विमोचन विचारात गढून गेला होता. पायावर पाय टाकून, खुर्चीच्या पाठीवर रेलून त्याने कपाळाला आपला एक हात लावला होता. रंजनने अरुणशी त्याची ओळख करून दिली.

'हे विमोचन— कवी की साहित्यिक ? काय म्हणू ? रंजनने ओळख करून देताना विमोचनला विचारले.

'काही का म्हणेनास !' विचारातून जागे होत विमोचनने म्हटले. निरभिमानी साहित्यिकांना कवी म्हटले काय नि साहित्यिक म्हटले काय ? त्याना त्याची काही पर्वा नसते. दोन्हीपैकी कोणतीही उपाधी शोभून दिसेल अशा तऱ्हेचा साधेपणा, त्यांच्या अंगी बाणलेला असतो.

अरुणने विमोचनला नमस्कार केला. विमोचनने मोठ्या नम्रपणे त्या नमस्काराचा स्वीकार केला. 'वीत नमे त्याचा हातही नमे' या जुन्या म्हणीचा विद्वानांना कधी विसर पडत नाही. अर्थात, प्रथम भेटीत वीत नमवायलाच हवी.

'तुम्ही यांचं नाव ऐकलं असेलच.' रंजनने अरुणला विचारले. विमोचन

स्वतःशीच हसत होता. त्याचे नाव कोणी ऐकले नाही, असे सहसा होत नसे, असाच त्यास्मिताचा अर्थ होता.

सरस्वतीच्या पूजकांची वाढत जाणारी संख्या लक्षात ठेवणे,एकूण कठीण काम आहे असे म्हणणाऱ्या राष्ट्राला साहित्यिक शोभत नाहीत. अगदी शेवटातला शेवटचा, रूपगुणांनी नव्हे पण कालक्रमानुसार, ठरलेल्या विद्वानाचे नाव माहीत नसलेला मनुष्य प्रवाहाबरोबर वाहात नाही, असे म्हणायला काही प्रत्यवाय नाही. आपण विमोचनचे नाव ऐकले आहे असे अरुणला अर्धवट आठवत होते, परंतु ते कधी, कुठे ऐकले आहे हे त्याला नक्की आठवेना. बँकेतली रोकड पळवणारा कारकून की तुरुंगातून पळून गेलेला कैदी म्हणून की एखाद्या सुंदरीचे नाक कापणारा प्रेमिक म्हणून की वर्तमानपत्रात नेहमीच येणाऱ्या रसभरित बातम्यांपैकी एखाद्या बातमीचा नायक म्हणून विमोचनचे नाव आपण ऐकले आहे, याची अरुणला खात्री नव्हती. मात्र हे नाव आपण कुठल्या तरी एका संघर्षाच्या संबंधात ऐकले आहे, त्यात हे नाव प्रामुख्याने होते, एवढेच त्याला आठवत होते. तो कवी आहे, साहित्यिक आहे, असे रंजनने त्याला सांगितले होते. म्हणूनच तो ठामपणे म्हणू शकला, 'हो तर, मी विमोचनांचे नाव ऐकले आहे.'

विमोचनच्या चेहऱ्यावर आत्मसंतुष्टतेचे स्मित चमकू लागले. रंजनने त्याला विचारले, 'आणि हे अरुणभाई. यांचे नाव तुम्ही ऐकलेच असेल.'

'हे साहेब यायच्या पूर्वीच तुम्ही मला त्यांची सारी हकीकत सांगितली होती. त्यामुळे मी त्यांना ओळखतो.'

'त्याच्या पूर्वी नाही ?'

'नाही. राजकारणात मी फार लक्ष घालत नाही.' विमोचनने सांगितले. साहित्यिकांच्या ओळखी तशा मर्यादितच असतात. साहित्याखेरीज इतर अपवित्र गोष्टींचा स्पर्श झाला की कासव जसे अंग चोरते तशी त्यांची स्मृती संकोच पावते.

अरुण विमोचनकडे रोखून पाहात होता. त्याला काहीतरी बोलायचे होते, पण तो गप्प बसला आहे हे रंजनच्या लक्षात आले.

कवी विमोचन आतापर्यंत आरामात बसला होता. तो आता ताठ उठून बसला. तो हडकुळा होता म्हणून उंच वाटत होता की उंच होता म्हणून हडकुळा वाटत होता हे त्याची उंची आणि जाडी फूटपट्टीने मापल्याशिवाय नक्की सांगता येण्यासारखे नव्हते. साहित्यिकांतसुद्धा वेगवेगळे प्रकार असतात. कोणी उच्च दर्जाचे असतात तर

कोणी कमी दर्जाचे. स्थूल देह, सूक्ष्म देह, योगप्रसिद्ध प्रतीती जसे ते देऊ शकतात, तसेच काव्यातील वीर, रौद्र, हास्य, करुण अशा रसांच्या प्रेरक छटांचेही त्यांच्यात दर्शन घडू शकते. असे असल्यामुळेच एखादे साहित्यिक-संमेलन हे एखाद्या पुष्पगुच्छा-प्रमाणे नयनरम्य आणि मनोहर ठरते.

परंतु रसवर्धक वैविध्य आणि विद्वत्ता यांच्यामध्ये कुठेतरी एक समान दुवा असू शकतो. विद्वान काळा असो की गोरा, उंच असो की खुजा, जागा असो की झोपलेला, हसत असो की भांडत असो, त्याच्या चेहऱ्यावर विद्वत्तेचे तेज नेहमीच चमकत राहणार. आणि त्या तेजामुळेच ' हा पाहा विद्वान ' असे रात्रीच्या अंधारातसुद्धा कोणीही माणूस सांगू शकतो.

' हल्ली राजकीय घटनाच जास्त महत्त्वाच्या ठरतात ' रंजनने बोलणे लांबवण्याच्या हेतूने म्हटले.

' असं वाटतं खरं. परंतु राजकीय घटनाचं महत्त्व अगदीच क्षणभंगुर असतं.' विमोचनने मत मांडले.

' असं कशावरून म्हणता तुम्ही ? ' अरुणला राहावेना.

' यात वादाला कुठे जागाच नाही. हे एक स्वयंसिद्ध सत्य आहे.'

' मला समजलं नाही.'

' शेक्सपियर आजसुद्धा जिवंत आहे. एलिझाबेथ आणि तिच्या काळातलं राजकारण आज आपण घोकलं तरी थोड्या दिवसांनी विसरून जातो. मग सांगा, साहित्याचं आयुष्य दीर्घ आहे की राजकारणाचं ? '

' तुमचे साहित्य-समीक्षकसुद्धा साहित्याला काळाचे खेळणेच मानतात. एलिझाबेथचं युग नसतं तर शेक्सपियर झालाच नसता.'

' या वादाचा शेवट कधीच होणार नाही. काळ महापुरुषांचा असतो की महापुरुष काळाचे असतात ? याचं अंतिम उत्तर कोण देऊ शकणार ? '

' या प्रश्नातच राजकीय प्रश्नाचं चिरंजीव महत्त्व स्पष्ट होतं.'

' राजकीय प्रश्न चिरंजीव ? चिरंजीव काही असेल तर ते फक्त साहित्यिकांचं लेखन. बाकी सगळं अल्पजीवी.'

विद्वत्तापूर्ण युद्धाला कधीच अंत नसतो. हे युद्ध सुरू करणाऱ्याला प्रथम जगाच्या सुखाचा विचार करावा लागतो. रंजनच्याही कदाचित लक्षात आले असावे की या युद्धाचा वडवानळ जगभर पसरण्याची शक्यता आहे. म्हणून तिने विषय बदलण्याचा

प्रयत्न केला आणि विमोचनला विचारले.

'तुमचं नवीन काव्य कोणाला अर्पण केलं तुम्ही ?'

'तुम्हालाच.'

'पण मी तुम्हाला 'नाही' म्हटलं होतं ना ?' रंजनने किंचित कडक स्वरात विचारले.

'म्हणूनच मी मनोमनी ते तुम्हाला अर्पण केलं आहे.'

रंजन हसली. 'तुम्हा कवींना हा मनाचा रस्ता चांगला सापडलाय.'

'आम्ही मनाच्या व्यापारातच जगत असतो.' कवी उत्तरला, आणि रंजनच्या हसऱ्या चेहऱ्याकडे तो बघत राहिला.

'कसलं काव्य आहे ?' टेबलावर पडलेले सुंदर कव्हरचे पुस्तक विमोचनने रंजनला दिले आहे हे कळल्यावर अरुणने विचारले, 'या साहित्यिकाची प्रथम भेट जरा अधिक गोड करायला हवी' असे अरुणला वाटू लागले.

'पुष्पनो प्राण (पुष्पाचा प्राण)', विमोचनने उत्तर दिले. शब्दाच्या उच्चारात कवी साहित्यिकाचा प्राण एकवटला होता.

'मग हा प्राण गेला की आहे अजून ?' न राहवून अरुणने विचारले.

अरुणच्या या प्रश्नावर रंजन मोठ्यांदा हसली. साहित्यिक कवी विमोचनला मात्र आपल्या काव्याबद्दल असले विनोद ऐकायची मुळीच सवय नव्हती. वीररस आपल्याला परिचित नाही असे नाही, असे त्याने आपली भ्रुकुटी वाकडी करून अरुणच्या विनोदाला आपली नापसंती दाखवून स्पष्ट करून दिले.

एखाद्या गर्विष्ठ राजकुमारीने हत्तींची साठमारी पाहून प्रसन्न व्हावे, तशी रंजन या दोन पुरुषांतील शाब्दिक चकमक पाहून प्रसन्न झाली. तिने 'पुष्पनो प्राण' उघडले आणि अरुणला म्हटले, 'ऐका हं. मी यातली एक कविता वाचून दाखवते.'

आजकालची काव्ये गाण्यासाठी नसतात. ती वाचायची असतात. शाळेतल्या शिक्षणक्रमामुळे काव्य वाचायची प्रथा पडली. आणि कवी न्हानालालनी 'गुंजन' या नावाखाली काव्य वाचनाच्या जुन्या प्रथेला मृतप्राय बनवून टाकले. रंजन काव्य वाचू लागली.

सुमन कहूं के कुसुम कहू ?
(सुमन म्हणू की कुसुम म्हणू ?)
परिमलगृह के पुष्प कहू ?

(परिमलगृह की पुष्प म्हणू ?)
ओ फूल। (हे फूल।)
शां मूल (कशाला हे मूल ?)
आय फूल। (हे फूल)
दिल, झुल। (दिल, झुल)
जो पुकारे दर्दी बुलबुल।
(हाकारी जेव्हा दु:खी बुलबुल।)

ही बुलबुलची मधुर गुणगुण आणखीही वाढली असती. परंतु एका माणसाने दारावर टकटक केले. आणि आत येऊन त्याने विमोचनला निरोप दिला,

'साहेब वाट पाहताहेत आपली.'

'बरंय, रंजन. मी जातो. सकाळी भेटूच.' विमोचनने निरोप घेतला.

'सकाळी मी अरुणभाईच्या बरोबर जाणार आहे.'

'कुठे ?'

'जनार्दनच्या आश्रमात. पण संध्याकाळी मी घरीच असेन. आज रात्रीच मी तुमचं काव्य वाचून काढणार आहे.'

'उत्तम. संध्याकाळी तुमचा अभिप्राय ऐकायला येतो मी.' असे म्हणत अरुणकडे न पाहताच विमोचन खोलीबाहेर पडला.

## 8. सामीप्य

**योगियाउरी कंटक हा हसे का ?**
**हा राग त्यागियाउरी वसे का?**
**बुद्धी हा पृथ्वीच्या हृदयीचा झरा का ?**
**पाषाणामधून रोप हे हसे का ?**

**—कलापि**

सकाळी चौघेजण न्याहारी घेत बसले होते. इंग्रजी पद्धतीप्रमाणे नुसताच चहा पीत नाहीत. त्याच्याबरोबर बिस्किटे, टोस्ट, केक, असे पदार्थ असावेच लागतात. ज्याला जसे जमेल तसे बसून हा चहा पिण्याचा विधी होत नाही. त्यासाठी स्वच्छ पांढरा टेबलक्लॉथ अंथरलेल्या टेबलाशी ठेवलेल्या खुर्च्यांवर, खाली पाय सोडून बसावे लागते. बसायचे तेही फार ताठपणे नाही. आणि समोरचे टेबल आरामशीरपणे बसण्यासाठी आहे अशी कल्पना करून घेऊन त्याच्यावर आपले कोपर टेकवायची चूक तर कधीच करायची नसते.

या पद्धतीत चहाचे पेले घरातल्या आतल्या अदृश्य भागातून भरून येत नाहीत. चहा, दूध आणि साखर वेगवेगळी सुशोभित नक्षीच्या काचेच्या ठराविक भांड्यांत भरून टेबलावर ठेवलेली असतात. ज्याला हवे त्याने त्या त्या वस्तू त्या, त्या भांड्या-तून घ्यायच्या. कपाखालची बशी म्हणजे चहा ओतायचे तळे नाही हे प्रथम शिकावे लागते.कप पाची बोटांनी पकडायचा नसतो की त्याची दांडी म्हणजे बोटांनी वाजवायचे कडे नाही, हेही पक्के लक्षात ठेवावे लागते. जवळपासची वीस-पंचवीस घरे उडून जातील अशी ‘फुर्रफुर्र’ करीत चहा प्यायची ज्याला सवय असेल त्याला इंग्रजी पद्धतीने चहा प्यायचा अधिकार नाही, हे आता ठरूनच गेले आहे. कपबशी, चमचा यांच्या किणकिणाशिवाय दुसरा कसलाही आवाज होऊ न देता, रमत गमत एकेक

घोट घेत हा चहा प्यायचा असतो. चहा पीत असताना सतत रसाळ गप्पा सुरुवातीपासून शेवटपर्यंत चालूच ठेवायच्या असतात. पुरुषांनी शक्य तेव्हा युरोपियन पद्धतीचे कपडे किंवा घरी असतील तर अंतर्वस्त्रे घालायची असतात. अलीकडे मात्र हिंदुस्थानात पुरुषांनी देशी पद्धतीचे कपडे घातले तरी चालवून घेण्याइतका देशाभिमान जागा झाला आहे.

मनात असेल त्यावेळेस रंजन रसाळ गप्पा मारू शकत असे. हल्लीच्या काळात बहुश्रुतपणा ही एक अत्यंत जरूरीची बाब बनली आहे. एखाद्यावर छाप पाडायची असेल तर आपल्याला खूप गोष्टी माहीत असाव्या लागतात. त्या सांगाव्या लागतात. रंजन आजही खूप बोलत होती. कृष्णकान्तलाही गप्पांची आवड होतीच. युरोपियन समाजात वावरलेला माणूस त्याच्या निःसंकोच, मोकळ्या स्वभावाची चुणूक दाखवणाऱ्या बोलण्यावरून तावडतोब ओळखू येतो.

'भाई', बोलता बोलता रंजनने कृष्णकान्तला विचारले, 'अरुणभाईची इंग्रजांबद्दलची मत बदलतील, नाही का ?'

'कदाचित नाहीही बदलायची. मला वाटलं होतं की अरुण युरोपचा प्रवास करून आला किंवा इथल्याच युरोपियन समाजात वावरला तर त्याचे विचार बदलतील. त्याच हेतूने मी त्याला इथं घेऊन आलो. पण आता मला जरा शंकाच वाटते आहे.' कृष्णकान्त म्हणाला.

'याचा अर्थ अरुणभाई खरे ठरले आणि तू चूक ठरलास. हो की नाही ?'

'असंही असू शकेल.'

या विषयावर इथे बोलणे होईल अशी अरुणची कल्पना नव्हती. त्याच्या क्रांतिवादाची माहिती कृष्णकान्ताला होती. स्वतः कृष्णकान्त भांडवलदाराचे मूर्तिमंत रूप होता. अरुणला आश्चर्य वाटले, की कृष्णकान्त आपल्या विचाराकडे कसा वळला ? काल रात्रीच त्याने युरोपियन अंमलदारांना जेवण दिले होते. चहा पिता पिता तो थांबला आणि विचारात गढून गेला.

'तुम्ही काहीच खात नाही.' रंजनने अरुणला डिवचले आणि विचारातून जागे केले. अरुणने एक बिस्किट उचलले.

'अरे हो. . . चहाला तुमचा विरोध असेल नाही का ?' रंजनने विचारले.

देशसेवेच्या आदर्शात महात्माजींनी इतके मूलभूत फेरफार केले आहेत की आजकाल प्रत्येक देशसेवक हा परिपूर्ण असावा अशी सगळीच जण अपेक्षा करतात. बारा-पंधरा

वर्षापूर्वी विदेशी वस्त्रे वापरून स्वदेशीचा फायदा समजावून सांगणे शक्य होते. साहेबी कपडे घालून इंग्रजांना मार्मिक कोरडे मारणाराचे भाषण मोठ्या आनंदाने ऐकले जात होते. खास डब्यातून प्रवास करणारा देशसेवक, वकील किंवा लक्षाधीश गिरणीमालक यांना हिंदुस्थानातल्या गरीब बिचाऱ्या खेडुतांचे कारुण्यपूर्ण वर्णन करण्याचा हक्क होता. पण आता तो काळ राहिलेला नाही. देशसेवक म्हणवून घेणाऱ्यांना तलवारीच्या धारेवर रहावे लागते. पांढरी टोपी घालणारा चहा पिऊ लागला तरी लोकांना ते खटकते. तो विडी पिऊ लागला तर त्याच्याबद्दलचा पूज्यभाव कमी होतो. आणि कित्येक वेळा लोक तोंडावर सरळ सरळ विचारतात, ' काय साहेब, पांढरी टोपी घालता अन् चहा-विडी सोडवत नाही ?'

या महापुरुषाची विराट छाया सगळ्या देशावर पसरलेली आहे. देशाच्या उन्नतीची कसलीही चर्चा निघो, हिंदूंच्या बाजूने किंवा इंग्रजांच्या विरोधी बोलणारी व्यक्ती कोणीही असो, तिला गांधीजींचा अनुयायीच समजले जाऊ लागले आहे. पूर्वीचे नेते आता एका बाजूला पडलेत. आणि लोकमान्यता पावलेले सगळे नेते आता गांधीजींचे अनुयायी बनले आहेत. म्हणूनच हातात 'नवजीवन' घेऊन फिरणारा खादीधारी खेडूत किंवा सभा-संमेलने गाजवणारा शहरी पदवीधर हे दोघेही आज गांधीजींची मूर्ती लोकांसमोर उभी करू लागले आहेत.

अरुणला त्या महापुरुषाची ही व्यापक सर्वकषता मान्य नव्हती. गांधीजी एक समर्थ पुरुष आणि त्यागी लोकनेता आहेत हे तो मानत होता. परंतु त्यांचा अहिंसेचा सिद्धान्त आणि संयमाचा अतिरेक म्हणजे जुनाट झालेल्या धर्मभावनांचा पुनरुद्धार करण्याचा प्रयत्न आहे, असे त्याचे मत होते. तो स्वत: देशसेवक होता, परंतु आपण गांधीवादी नाही असे तो वारंवार सांगत असे. आपण गांधीयुगाच्या पुढे गेलेलो एक साम्यवादी आहोत असे तो मानीत असे. गांधीजींना साम्यवादाचे तत्त्वज्ञान नीटपणे आकलन झालेलेच नाही, असे त्याचे मत होते.

'माझा चहाला विरोध आहे, असं का वाटलं तुम्हाला ?'

'बरेच देशसेवक चहा पितात आणि तरीही चहाच्या विरुद्ध प्रचार करतात.'

'मला आरामाची आवड निश्चितच आहे. मी काही गांधीवादी नाही.'

'मग तुम्ही एखादी चांगली नोकरी का नाही करीत ?'

'जोपर्यंत सत्ता आपल्या हाती येत नाही तोपर्यंत आपल्याला पुरेसे सुख मिळणार नाही.'

'पण मग गांधीजींचंसुद्धा असंच मत आहे.'

'माझा आणि त्यांचा मार्गच वेगळा आहे. त्यांचा फक्त स्वत: मरण्यावर विश्वास आहे. आणि मी दुसऱ्याला मारून मग मरण्यावर विश्वास ठेवतो.' बोलता बोलता अरुण अडखळला. गांधीजींच्याबरोबरचा आपला मतभेद स्पष्ट करताना आपण खोटाच अभिमान बाळगत आहोत, असे त्याला वाटू लागले. गांधीजींसारख्या महा-पुरुषाकडे सगळ्या जगाचे लक्ष लागले होते. तो स्वत: अगदीच अल्पजीवी होता. थोडे दिवसच त्याची भलावण होणार होती. त्यानंतर सगळ्यांनाच त्याचा विसर पडणार होता. जोपर्यंत हिंसात्मक क्रांतिवादाचा विजय होत नव्हता तोपर्यंत कोणा-चीही तुलना गांधीजींच्या बरोबर होणे अशक्य होते.

परंतु या अशक्य परिस्थितीतूनच त्याला प्रेरणा आणि शक्ती मिळत असे विजय होणार तो अहिंसेचा नव्हे तर हिंसेचा अशी त्याची पूर्ण खात्री पटली होती.

अरुणचे शब्द ऐकून कृष्णकान्तने त्याच्याकडे पाहिले तो जरा हसला आणि म्हणाला, 'दॅटस् इट– खरय ते.'

या गप्पात सुरभीचे लक्षच नव्हते. जगातला सगळा आनंद संपला गेला आहे अशा तिच्या वृत्तीमुळे अत्यंत सुंदर दृश्येसुद्धा तिच्या मनात उत्साह निर्माण करू शकत नव्हती. तरीही तिला आजच्या गप्पांचे थोडे नवलच वाटले. फक्त युरोपियनांचीच स्तुती करणारा कृष्णकान्त आज तिच्या भावाची प्रशंसा का करीत होता ?

चहा प्यायचा लांबलचक कार्यक्रम आटपला. तेव्हा रजनने जनार्दनकडे जायची वेळ होत आल्याची आठवण अरुणला करून दिली. अरुण तयार होता. प्रत्येक छोट्या-मोठ्या कार्यक्रमासाठी वेगवेगळे कपडे घातले पाहिजेत, असे काही त्याचे मत नव्हते. गांधीयुगामुळे ज्या काही साधेपणाच्या पद्धती सुरू झाल्या होत्या त्यापैकी पोशाखातला साधेपणा ही एक अत्यंत उपयुक्त पद्धत होती. खर्चिक, फॅशनेबल पोशाख ही आता फक्त सरकारी अधिकारी आणि त्यांची नक्कल करणारे माननीय राजभक्त यांच्या-पुरतीच आवश्यकतेची बाब होऊन बसली होती. बाकीच्या साऱ्या प्रजेला आता त्याची आवश्यकता भासत नव्हती. पांढरे धोतर, वर पैरणही पांढरी, डोक्यावर पांढरीच टोपी. एवढीच आजच्या युगाची वस्त्रप्रावरणे बनली होती.

अरुणचा गांधीवादाबरोबरच अहिंसेच्या तत्त्वालाही विरोध होता. तरीसुद्धा या मतातील चांगले मुद्दे स्वीकारायला तो तयार होता. खादीचे त्याला कौतुक नव्हते. टकळी आणि चरखा यांच्या सामर्थ्यावर त्याचा विश्वास नव्हता आणि तरीही परतंत्र

देशातील गरीब प्रजेने स्वीकारलेले गांधीजींचे वस्त्रप्रावरणाचे तत्त्व त्याला मान्य करावेसे वाटले होते. म्हणूनच हिंदुस्थानात दिवसेंदिवस वाढत चाललेल्या खादीधारी मानवसागरातला तोही एक थेंब बनून गेला होता.

अरुणची बाकी सगळी तयारी झाली होती. फक्त डोक्यावर टोपी घालायची होती. पण अनेकदा तो टोपी घालतही नसे. रंजन मात्र चहा पिण्याच्या वेळेचे कपडे घालून बाहेर पडणं शक्यच नव्हते. तिने मोटार तयार करण्याचा हुकूम दिला आणि ती कपडे बदलायला निघून गेली.

ती कपडे बदलून बाहेर आली. अरुण तिच्याकडे पाहातच राहिला. कालच्या भारी रेशमी कपड्यांची मळमळ, तलमपणा आज अरुणला दिसत नव्हता. त्याऐवजी आज तिने पांढराशुभ्र पोशाख घातला होता. कालच्या पोशाखापेक्षा आजचा हा पांढरा पोशाख जास्त संयमी होता. परंतु या साध्यामुध्या पोशाखातसुद्धा काही वैशिष्टय असल्याचे अरुणला जाणवत होते. भारी पोशाखाइतकाच हा साधा पोशाखही तिला शोभून दिसत होता.

'ही शान कशाची? कपड्यांची की शरीराची?' अरुण आज पहिल्यांदाच रंजनला निरखून पाहात होता.

'स्वदेशी गिरण्यांचे कपडे मी अनेकवेळा घालते. पण भाईसाहेब, तुमची ती खादी काही आपल्याला पेलवत नाही हं. अंगाला बोचते ती.' रंजन म्हणाली. आपल्या या साध्या पोशाखाने अरुण दिपून गेलाय हे तिला समजून चुकले होते. शारदोत्सवात जरी-किनखाब, नाटकात रंगीबेरंगी रेशमी कपडे आणि भाषणाच्या व्यासपीठावर पांढरे मलमली सुती कपडे असा तीन प्रकारचा पेहराव करणाऱ्या गर्भश्रीमंत महिला ह्या आजकालच्या सार्वजनिक जीवनाचे एक जिवंत चित्र बनल्या आहेत! – की होत्या?

'पण माझा खादीबद्दल हट्ट नसतोच कधी.' अरुणने सांगितले. 'कपडा स्वदेशी असला की पुरतो मला.'

दोघेही मोटारीत बसले. अरुण मोटारीच्या एका कोपऱ्यात सावला. मोटारी उडवण्याची अरुणची वृत्ती नसली तरी त्याने सुसंस्कृत तेजस्वी तरुणी पाहिल्या होत्या. पण इतक्या जवळून नाही! एकान्तात स्त्रिया भय उत्पन्न करू शकतात हे आजच त्याला पहिल्यांदा समजून आले. त्याने बोलायचा दोन-तीनदा प्रयत्न केला; पण तो निष्फळ ठरला. आपण काहीतरी मूर्खासारखे बडबडून जाऊ अशी त्याला

भीती वाटत होती.

रंजनही गप्पच बसली होती. तिच्या चेहऱ्यावर आत्मविश्वासदर्शक स्मित चमकत होते. सकाळी त्यांना वाटेत फारशी ओळखीची माणसे भेटली नाहीत. तरीसुद्धा तिचा चेहरा हसरा होता. आकाशात जसे तारे चमकतात, तसे रंजनच्या चेहऱ्यावर हसू चमकत आहे, असे अरुणला वाटत होते.

समोरून एक युरोपियन जोडपे पायी येत होते. रंजनने रुमाल काढून हलवला. गोऱ्या जोडप्याने तिकडे पाहिले न पाहिल्यासारखे केले. मोटार हाकणाऱ्याने मोटारीचा वेग कमी केला आणि त्या दोघांच्या जवळ मोटार थांबवली.

'गुड मॉर्निंग' रंजनने त्या युरोपियन जोडप्याला अभिवादन केले.

पुरुषाने तिरसटपणे तिच्याकडे पाहिले, आणि त्या स्त्रीने खोटेखोटे हसू तोंडावर आणून उत्तरादाखल आपले मस्तक किंचित झुकवले. आणि ती दोघेही पुढे चालू लागली.

रंजनच्या चेहऱ्यावरचे हसू मावळले. तिचा चेहरा रागाने लाल झाला. तिचे खेळकर डोळे कठोर बनले. मोटार पुढे निघाली.

'मंकी ब्रॅंड (माकडतोंडे)!' रंजन हळूच पुटपुटली.

'कोण होती ती?' अरुणला बोलायला सुचले.

'इथले कलेक्टर आणि त्यांची मड्डम!'

'मग ते थांबले का नाहीत? कलेक्टर तर काल तुमच्याकडे जेवायला आले होते!'

'त्याची आणि भाईची थोडी बोलाचाली झाली. म्हणून आज ते असा अपमान करून नाराजी व्यक्त करीत आहेत.'

'कशावरून झाली बोलाचाली?'

'तुमच्याचवरून!'

'माझ्यावरून? मी कुठे होतो काल जेवायला त्यांच्यात?'

'तरीसुद्धा तुमचा विषय काल निघालाच होता.'

'तो कसा काय?'

'हसत हसत भाई म्हणाला, सरकारच्या दृष्टीने संशयित असलेल्या एका माणसाला मी आज इथं आणून ठेवलंय.' तेव्हा कलेक्टरनी चौकशी केली. मग भाईनं त्यांना

सगळी हकीकत सांगून टाकली. त्यावर कलेक्टर चटकन म्हणाले, 'तुम्ही अशा संशयिताला ताबडतोब घरातून बाहेर काढा.' त्याला भाईनं नकार दिला. तेव्हा कलेक्टर जरा रागावले. त्याचो कोण पर्वा करतो एवढी ?'

अरुण विचारात पडला. मी स्वतःच आपल्या जवळच्या आप्तांना अडचणीत तर टाकीत नाही ना ?

गुन्हेगार असेल तर त्यालाही तुरुंगात जागा असते. संशयिताला राज्यात राहण्यालाही जागा नसावी ? आणि हा संशय कसला ? तर देशसेवेचा !

योग्य काय ? देशद्रोह की राजद्रोह ?

# 9. अहिंसा

**होईल नाहीसा जगातील अंधार**
**येईल जन्माला एक दैवी तेज**
**उराउरातील तो भंगेल अंधार**
**येईल जन्माला एक दैवी तेज**

**—न्हानालाल**

गाडी थांबली. आणि अरुणची विचारमालिका तुटली.

'आला बघा आश्रम." रंजन म्हणाली.

आश्रमाची इमारत फारशी मोठी नव्हती. छोटचा-छोटचा झोपडचाची एक रांग होती. जवळचे घर मात्र जरा मोठे, ओसरीचे होते. त्यात एक मोठी खोली होती. आश्रमाच्या आवारात छोटचा छोटचा खोल्या आणि काही स्वतंत्र बैठी घरे होती. मागच्या बाजूला छोटेसे मैदान होते. सर्वत्र विखुरलेली फुलझाडे आणि कडुलिंबाची झाडे यांनी आश्रमाच्या आवाराची काहीशी मजेदार आखणी केली होती.

रंजन आणि अरुण समोरच्या ओसरीवर चढले. दोघांना येताना पाहून एका घोंगडीवर बसलेला जनार्दन उठून उभा राहिला. तो फक्त धोतर नेसला होता त्याच्या हातात एक पुस्तक होते.

'या या. तुमचीच वाट पाहात होतो मी.' हातातले पुस्तक जवळच्याच एक छोटचा टेबलावर ठेवून पुढे येत जनार्दनने त्यांचे स्वागत केले.

'थोडा उशीर झाला ना ?' रंजनने नमस्कारासाठी हात जोडीत म्हटले.

'काही हरकत नाही. मी इतका वेळ वाट पाहात होतो की अजून वीज कशी चमकली नाही.'

अरुणने रंजनकडे पाहिले. रंजन हसत हसत उत्तरली. 'जनार्दन मला वीज म्हणतो.'

अरुणला हे टोपणनाव फारच आवडले. त्याने पसंतीदर्शक स्मित केले. आणि जनार्दनने टेबलावर ठेवलेल्या पुस्तकाकडे पाहात विचारले, 'कोणतं पुस्तक वाचत होता ?'

'पुष्पनो प्राण.'

'विमोचनचं ? ते तुमच्याकडे कसं आलं ?'

'आताच मला तो हे पुस्तक देऊन गेला.'

'विमोचन इथे आहे ?'

'होय. आपली संग्रामगीतं शिकवतोय सगळ्यांना' जनार्दनने सांगितले.

स्वतःची गीते दुसऱ्यांच्या तोंडून ऐकली की कवीला आनंद होत नसेल का ? आपले काव्य जगातल्या सगळ्या लोकांना मुखोद्गत झाले आहे, असे सुखस्वप्न न पाहणारा कवी अजून जन्माला यायचा आहे.

'कसं वाटलं हे पुस्तक तुम्हाला ?' रंजनने जनार्दनला विचारले.

कोणत्याही पुस्तकाला वाईट म्हणण्याचे दिवस आता उरले नाहीत. कोणी वाईट म्हटले तरी लेखकाची तशी कधी खात्री पटत नाही. रेल्वेस्टेशनांवर विकली जाणारी 'तोता-मैना' किंवा 'शोकिन शेठाणी' अशा पुस्तकांचेही उत्साही वाचक असतातच. त्यामुळे त्यांच्यावर टीका करणारांकडेही त्यांचे लेखक मोठ्या अभिमानाने मोठमोठे डोळे करून पाहू शकतात. मात्र 'पुष्पनो प्राण' सारख्या उच्च दर्जाच्या पुस्तकाबद्दल दुमत होईलच कसे ?

'पुस्तक चांगलं आहे.' जनार्दन म्हणाला.

'काही उणिवा नाहीत ?'

'ते साहित्यिकच सांगू शकतील.'

जनार्दन जरा अडखळला. विमोचनच्या पुस्तकातल्या उणिवा दाखवल्या तर ते रंजनला आवडेल की नाही याबद्दल त्याला जरा शंका आली. 'आपण अगदी खरं तेच बोलणार,' असे मोठ्या अभिमानाने सांगून समोरच्या माणसाला भाल्यासारखे तीक्ष्ण शब्द ऐकवायचे आणि मग अप्रिय, अस्पृश्य लोकांच्या रांगेत जाऊन बसायचे, ह्याला जनार्दनची तयारी नव्हती. म्हणूनच अडखळत त्याने सांगून टाकले.

'एकूण पुस्तक आशादायक वाटलं. फक्त जरा शब्दांचे घोळ आहेत. शब्द जडजंबाळ वापरलेत आणि वाचकाची पकड घेऊ न शकणारं आहे.'

'हल्लीच्या जवळजवळ सगळ्या कवितांसारखंच नाही का ?' अरुणने सर्वच चालू

काव्यांवर टीका केली.

'हा पाहा, विमोचनच आला. आता तू आणि तो, दोघंहीजणं ते पुस्तक चांगलं समजावून घ्या. मी अरुणला आश्रम दाखवून आणतो.' लांबून विमोचन येताना दिसला, तसे जनार्दनने रंजनला सांगितले. आणि तो अरुणला घेऊन शेजारच्या खोलीत गेला.

विमोचनच्या पाठोपाठ आश्रमातले आणखी काही तरुण येत होते. ते आश्रमाच्या संयमी, सात्त्विक वातावरणात राहात होते. तरीही सुकुमार स्त्रीसौंदर्याला पाहून त्यांनी डोळे मिटून घेतले नाहीत. स्त्री-पुरुषांचं एकमेकांविषयीचे आकर्षण जगाच्या अंतापर्यंत चालूच राहणार आहे. आश्रमातील राहणी आणि त्यातील संयम यांच्या-मुळे ते आकर्षण अधिक उच्च दर्जाचे, अलौकिक आणि अधिक सूक्ष्म होईल, एवढे मात्र खरे. परंतु डोळ्यांतील जादूचे अंजन संपूर्णपणे नाहीसे होण्याची भीती नाही.

'अरुण, आता तुझा काय विचार आहे ?' अरुणला आश्रमातील वेगवेगळे विभाग दाखवीत असताना जनार्दनने अरुणला विचारले.

अरुणने चमकून जनार्दनकडे पाहिले. आश्रम पाहात असताना त्याच्याही मनात आपल्या भविष्याचा विचार चालला होता.

'अजून काहीच नक्की ठरवलं नाही मी. पण मी बनारसला जाईन. तिथून मग कलकत्ता.' अरुणने सांगितले.

'तिकडे जाऊन काय करणार तू ?'

'माझे बरेच मित्र मला तिथे भेटणार आहेत.'

'म्हणजे गुजरात तुला योग्य वाटत नाही, असंच ना ? गुजरातेत बॉंब बनवता येणार नाहीत, असं वाटतंय का तुला ?' जनार्दनने विचारले. जनार्दनचे डोळे तेजाने चमकत होते. अरुणच्या मनाची खोली ते डोळे जोखत होते.

'गांधी गुजरातेत असेपर्यंत ते शक्य नाही.' अरुण सहज बोलून गेला. पण मग लगेच त्याला वाटले, जनार्दनसारख्या पक्क्या अहिंसावादी राजकारणी पुरुषाजवळ गुजरातच्या हिंसावादी असमर्थतेबद्दल बोलणे योग्य नाही. म्हणून विषय बदलीत तो म्हणाला,

'पण मी बॉंब बनवणार आहे असं कशावरून वाटलं तुम्हाला ?'

'मी तुझ्या वयाचा होतो ना तेव्हा मी पण हीच स्वप्नं पाहात होतो.' काहीशा मिष्किलपणे जनार्दन म्हणाला.

'मी कधीच स्वप्नं पाहात नाही.'

'स्वप्नं खरी करून दाखवायचा प्रयत्न करतोस, हो की नाही?'

अरुण काहीच बोलला नाही. जनार्दनने त्याला आश्रमातले छोटेसे परंतु सुसज्ज ग्रंथालय दाखवले.

अरुण बारकाईने तिथली पुस्तके पाहात होता. इतिहास, राजकारण, समाजकारण यावरील किमती पुस्तके त्याला तिथे दिसत होती.

'पुरता अभ्यास केल्याशिवाय मी कोणालाच कोणत्याही विषयावर लिहू-बोलू देत नाही.'

'बरोबर आहे ते.'

जनार्दनने एक नकाशा काढला.

' बघ, हे जर्मन युद्धापूर्वीचं जग, आणि हे त्यानंतरचं. पाहिलंस किती फरक पडलाय तो.'

'पण हा फरक काय अहिंसेमुळे झाला?' नजर फिरवीत अरुणने विचारले.

जनार्दन किंचित हसला. 'अहिंसेने केलेला फेरफार पाह्यचा आहे तुला? तो फेरफार पाहिलास म्हणजे तरी अहिंसेवर विश्वास बसेल का तुझा?'

'माझी खात्री पटल्याखेरीज नाही बसायचा.'

'अर्थातच. तुझी खात्री पटलीच पाहिजे. तुझा भौतिक शास्त्रावर विश्वास असेल. अध्यात्मावर नाही, हो ना?'

'अध्यात्मज्ञानाचा उपयोग होत असेल, परंतु मला मात्र तो अजून दिसला नाही. आत्मा एक आहे, तो अमर आहे, त्याला मारता येत नाही, हे सगळं तत्त्वज्ञान माझ्या दृष्टीने निरुपयोगी आहे. ते माणसाला दुर्बल बनवते.'

'मग आपण ते बाजूला ठेवू या. थांब, मी तुला काही चित्रं दाखवतो.' जनार्दनने एक मोठा चित्रांचा अल्बम काढला. आणि त्यातले एक पान उघडून अरुणला दाखवीत त्याने विचारले, 'हे काय आहे?'

'प्राथमिक अवस्थेतला जंगली माणूस. वानरांचा अंश इथे दिसून येतो.' अरुण किंचित हसत म्हणाला.

'तो काय करीत आहे?'

'तो अहिंसेचे धडे नक्कीच देत नाही! उलट दगडाचे भाले घेऊन तो एका रानटी जनावराच्या पाठीमागे धावतोय. आणि त्या माणसाच्या मागेही एक भयंकर जनावर

लागलंय.'

'हिंसेचा हा प्रत्यक्ष पाठ आहे. नाही का ? आता आपण पान उलटू या. हे कसलं चित्र आहे ?'

'तुमचा तो प्राथमिक माणूस एका जांबुवंतीजवळ बसलाय.'

'या कुरूप बाईला तू हस बघ वाटलं तर. पण ती दोघं एकमेकांना मुळीच कुरूप वाटत नाहीत, हो की नाही ?'

'छे छे, मुळीच नाही. उलट प्रणयप्रधान कादंबरीतल्या नायक-नायिकांसारखे ते प्रेमिक वाटताहेत.'

'आजपासून दहा हजार वर्षांनंतरच्या अतिविकसित मानवांनाही आजच्या काळातील सुधारलेल्या तरुण-तरुणी जांबुवान-जांबुवंतीसारख्याच वाटतील. नाही का ? बरं, इथे तुला काही शस्त्र दिसताहेत का ?'

'ते तिकडे दूर टाकलेलं आहे. जेवण तयार दिसतंय. आणि ते प्रेमिक एकमेकांना जेवू घालायला उत्सुक दिसत आहेत.'

'हे या जगातलं अहिंसेचं पहिलं उदाहरण. स्त्री-पुरुष एकमेकांच्या निकट आले की शस्त्रं टाकून देतात. आता मला सांग, अहिंसेचं पालन झालं नसतं तर हे तिसरं चित्र तयार होऊ शकलं असतं का ?' पान उलटून अरुणला तिसरं चित्र दाखवीत जनार्दनने विचारले.

अरुणला गंमत वाटली. चित्र पाहात तो सांगू लागला, 'हे त्या प्राथमिक मानवाचं कुटुंब दिसतंय.'

'यात कुठे तुला हिंसा दिसत नाही ना ? भाला-तरवारीनं कापून तोडत तर बाल-संगोपन होऊ शकत नाही ना ?'

'तसं झालं तर मुलं वाढतील कशी ?'

'तेव्हा हा अहिंसेचा दुसरा धडा. चल, आपण पुढे पाहू या. ही बघ, आता पुन्हा तुझी हिंसा आली. ह्या दोन टोळ्या पाहिल्यास ?' पुढचे चित्र दाखवीत जनार्दनने अरुणला विचारले, चित्रात एकमेकांशी मारामाऱ्या करणाऱ्या दोन लहान टोळ्या दाखवल्या होत्या. त्यात एक माणूस मृत्यू पावला होता. एकजण शेवटचा श्वास घेताना दिसत होता. आणखी एकजण जखमी होऊन पडला होता. आणि बाकीचे एकमेकांशी हातघाईची लढाई करीत होते.

'हीदेखील अहिंसाच म्हणायची का ?' अरुणने विचारले.

'हाही अहिंसेचाच एक मार्ग. तू समाजशास्त्राचा अभ्यास केला असशील. मग मला सांग ह्या दोन टोळ्या एकमेकांशी कशासाठी लढताहेत ?'

'ह्या चित्राखालीच लिहिलंय की, अन्न आणि स्त्रिया यांच्या प्राप्तीसाठी.'

'एक छोटंसं कुटुंब आपली उपजीविका करतं, तेव्हा संघर्ष निर्माण होत नाही. पण दोन कुटुंबं निर्माण झाली, तेव्हा भांड्याला भांडं लागलं. म्हणजेच ती दोन्ही कुटुंबं हिंसा करायला प्रवृत्त झाली. आता या हिंसेचं निवारण कसं झालं ते दाखवू तुला ? ' अल्बमचे पान उलटीत जनार्दन म्हणाला. नवीन पानावर एक मोठी टोळी दिसत होती. कितीतरी स्त्रिया इकडे तिकडे हिंडत-फिरत होत्या. छोटी छोटी मुले जंगली खेळ खेळत होती. आणि त्यांचे जंगली आईवडील त्यांच्याकडे वात्सल्याने पाहात होते.

'या टोळ्यातल्या युद्धाचा परिणाम म्हणून त्या दोन्ही टोळ्या एक झाल्या. एका टोळीतल्या मुली दुसऱ्या टोळीत जाऊन आया बनल्या. या व्यवहारामुळे दोन्ही टोळ्या एकत्र न येतील तरच नवल. त्यातूनच हा मोठा मानवसमूह निर्माण झाला. हे अहिंसेचं तिसरं उदाहरण.'

अशाच तऱ्हेने त्या चित्रमालेत अहिंसेवर आधारित असलेल्या जगाच्या विकासाचा इतिहास रेखाटलेला होता. जगाच्या इतिहासाची सर्वकष पाहणी केली तर मानव-जातीच्या विकासाचा एक महाप्रवाह आनंदाच्या लहानमोठ्या लाटांबरोबर झोके घेत पुढे पुढे जाताना दिसून येतो. कुटुंबकबिला, गोत्र, जमात, जात आणि शेवटी राज्य किंवा राष्ट्र अशा क्रमाने आस्तेआस्ते वाढत जाणाऱ्या मर्यादा स्वीकारून संस्कार-वर्धनाच्या भौतिक आणि मानसिक साधनांनी अधिकाधिक सज्ज होत मानवजात ऐक्य मिळवीत आली आहे.मानवाने आपले एक कुटुंब बनवले, त्या कुटुंबातून हिंसेला दूर राखले, मग आपला एक गट केला. त्या गटापासून हिंसा बाजूला केली. गोत्र, जमात जात असा वाढत्या श्रेणीचा समुदाय बनवत बनवत मानवाने त्या सर्वांपासून हिंसेला दूर लोटले. मग त्याने राज्य बनवले, राज्यातून राष्ट्र बनले. आणि मग राष्ट्रातूनही हिंसाचाराला बाहेर घालवण्यात आले.एकाच कुटुंबातील घटक व्यक्ती आपापसातील मतभेद मिटवण्यासाठी कधी हिंसेचा आश्रय घेत नाहीत. जो कोणी हिंसा करील तो या कुटुंबाचा गुन्हेगार ठरतो. एकाच राष्ट्राचे प्रजाजन एकमेकांतील मतभेद मिटवण्या-साठी कधी तलवारी उचलीत नाहीत. आणि समजा, कोणी चुकून नकळत तलवार उचललीच तर तो माणूस सगळ्या राष्ट्राचा, त्या राष्ट्रातील प्रजेचा द्रोही ठरतो.

राष्ट्रातून हिंसेला बाहेर काढण्याइतपत आजच्या मानवाने निश्चितच प्रगती केली आहे.

त्या चित्रांच्याद्वारे असे काही सिद्ध करण्याचा प्रयत्न जनार्दन करीत होता. चित्रे आकर्षक होती. त्या चित्रातून अहिंसेचे जे तत्त्वज्ञान सांगायचा प्रयत्न केला होता, ते तत्त्वज्ञान अरुणलाही पटले. मात्र त्यामुळे त्याची अहिंसेवरील श्रद्धा वाढली असे काही म्हणता येणार नाही. अहिंसेची टिंगल करण्याची त्याची वृत्ती अधूनमधून डोकावतच होती.

'राष्ट्रातून हिंसेची हकालपट्टी केली. त्यामुळे जगातील हिंसाचार कमी झाला, असंच ना म्हणायचंय तुम्हाला ? मग मागची चार वर्षे विसरलात की काय तुम्ही ? १९१४ ते १९१८ ?' अरुणने टोमणा हाणला.

'हं ज्यावेळी विद्यार्थिदशेत या युद्धाच्या बातम्या लोकांच्या तोंडून ऐकत होतास आणि गुजराती वर्तमानपत्रातून वाचीत होतास तव्हा मी स्वतः त्या युद्धभूमीत फिरत होतो. ती वर्षं मी कशी विसरणार ?'

'तर मग त्या हिंसेच्या खणखणाटात तुम्ही अहिंसेचे उपासक बनलात की काय ?

'असं झालं तर त्यात चूक काय ? जगात हिंसेचं पोषण करणारी जी तत्त्वं होती ती बहुतेक सगळीच्या सगळीच त्या युद्धात जळून खाक झाली आहेत.'

'मला नाही समजलं.'

ही पुढची चित्रं पाहा. जर्मन-युद्धाचा हा एक परिणाम दिसतोय यात.'

'रशियाचा झार, जर्मनीचा कैसर आणि तुर्कस्तानचा सुलतान अदृश्य झाले.'

'याचा अर्थ तुला समजला ? हिंसेचा पोषक ठरणाऱ्या एकसत्ताधारी राजसत्ता नष्ट झाल्या आहेत. राज्याचा सर्वश्रेष्ठ मालक राजा नसतो हे फार पूर्वीपासून चालत आलेलं तत्त्व आता सिद्ध झालेलं आहे. छत्रपतींच्या नाटकाचा हा शेवटचा अंक.'

'पण त्याचं काय ? इथे अहिंसेचा काय संबंध ?'

पुढचं एक चित्र काढीत जनार्दन म्हणाला, 'हे बघ, अहिंसा इथे आली.'

'हे तर राष्ट्रसंघाचं लीग ऑफ नेशन्सचं चित्र आहे.'

'म्हणजे राष्ट्रधर्म कल्पना खोटी ठरली. हिंसेसाठी सर्व साधनांची जय्यत तयारी ठेवून त्याखाली दबून गेलेल्या राष्ट्रांना विचार, त्यांच्या हिंसेनं काय दिलं त्यांना, ते.

'जिंकलेल्या राष्ट्रांना विजय मिळवून दिले.'

'हे विजयी राष्ट्रांना बोलू दे. त्यांना विजय मिळाला असता तर ही राष्ट्रसंघाची

कल्पनाच प्रत्यक्षात उतरली नसती. दोन व्यक्तीच्या मधला झगडा जसा वाटाघाटी किंवा लवाद करून सोडवता येतो, तसंच राष्ट्राराष्ट्रांमधलं भांडण मिटवायलाही समशेरीची गरज नसते, हा एखाद्या लहान मुलालाही समजण्यासारखा मुद्दा आताशी कुठं राष्ट्रांना पटू लागला आहे. दोन पक्षांमधल्या तक्रारीचा निकाल एक कोर्ट करू शकतं. आणि या कोर्टाच्या चालकांना दोन राष्ट्रांमधील तंटे मिटवण्यासाठी माणसं का वाया घालवावी लागतात ? राष्ट्रांचा वृथा अभिमान आता गळून पडत आहे. त्यांचं परस्पर संघटन आता वाढत आहे. राष्ट्राच्या सीमारेषा ओलांडून ती आता मानव महाराष्ट्र (सबंध मानवजातीचं एक मोठं राष्ट्र) बनवायच्या तयारीला लागली आहेत. आणि या प्रयत्नांतूनच आपण हिंसेला जगातून हद्दपार करून टाकू शकू– आज हे शक्य होणार नाही पण एका शतकानंतर तरी हे होईलच.'

जनार्दनचे डोळे चमकत होते. प्रेरणा देणारं तत्त्वज्ञ किंवा जगातील प्रस्थापित सत्ता तोडून टाकण्याचं वेड बाळगणारी व्यक्ती अशांच्याच डोळ्यात अशी चमक दिसून येते. दोन हजार वर्षांपूर्वी एका वेड्या बुद्धानं ओरडून सांगितलं होतं की, ' अहिंसा हाच परमधर्म आहे.' ही त्याची हाक हिंदुस्थान, चीन, जपान आणि मध्य आशियातील लोकांनी उचलून धरली. असाच एक वेडा गांधी आज सांगू लागला आहे, ' अहिंसा हाच परमधर्म आहे ' अहिंसेचा उपयोग फक्त धर्मापुरताच ठेवायचा का ? नाही गांधीजी म्हणतात 'नाही, निव्वळ धर्मापुरतीच अहिंसा मर्यादित नाही. जीवनाच्या प्रत्येक अंगात अहिंसा तुरली पाहिजे. ' राजकारणातसुद्धा ? हो अवश्य. का नाही ? धर्म म्हणजे निव्वळ कर्मकांड नाही. धर्म म्हणजे संपूर्ण जीवन.

हे दोघे संन्यासी काय वेडे होते ? जगाला कोण हलवू शकते ? शहाणी समजली जाणारी छोटी माणसे की धगधगत्या वेडाने झपाटलेले एखादे विराट तत्त्व ? याचे उत्तर आता सारे जगच देत आहे. वेडेपणा म्हणजेच प्रगती, वाहाते पाणी. शहाणपणा म्हणजे स्थिरता, हालचालीचा अभाव साठलेले पाणी. सुधारलेल्या राष्ट्रांनाही आता थोडे थोडे समजू लागले आहे की हिंसा म्हणजे खोटेपणा. हिंसारहित साधने राष्ट्रातून का वापरली जात नाहीत ? म्हणूनच त्यांनी कळत नकळत अहिंसेच्या विजयाचे निशाण राष्ट्रसंघावर फडकवलेले आहे. राज्यातले आणि राष्ट्रातले झगडे हिंसेशिवाय मिटवण्याचे जाहीर केले आहे. विचार-संस्कृतीला एक नवीन चालना दिली आहे.

अरुणला जनार्दनच्या नजरेतील चमक जाणवली. ज्याच्या डोळ्यांत अशी चमक दिसते तो कसल्याही भीतीमुळे चांगला बनलेला नसतो. हसून उडवून लावावे, असा

जनार्दन नव्हता, नइलाज म्हणून सार्वजनिक जीवनात पडणाऱ्यांपैकीही तो नव्हता. आणि तो दुबळा साधूही नव्हता.

'ही चित्रं कोणी काढली ?' ही नवीन चित्रमाला पाहून खूप झालेल्या अरुणने विचारले.

'रंजन आणि पुष्पा अशा दोघींनी मिळून काढली आहेत ती.' जनार्दनने सांगितले.

अरुण रंजनला ओळखत होता. पण ही पुष्पा कोण ? त्याला विचारावेसे वाटले. गप्पा करताना एखादे नाव उच्चारल्यावर त्या नावाच्या तपशिलाची नोंद करणारी एखादी शक्ती असती तर अनेक चमत्कारिक कल्पना निर्माणच झाल्या नसत्या. पण अशी सोय नव्हती. आणि अनोळखी नावाबद्दल माहिती काढून घेण्याचा प्रयत्न करता येणे शक्य नव्हते– विशेषत: स्त्रियांच्या नावाबद्दल. पुष्पा कोण ? हे विचारायचे अरुणने टाळले.

'चित्रं खूप चांगली आहेत. पण तरीही मला अजून अहिंसा पटलेली नाही. तुम्ही स्वतंत्र राष्ट्रांच्याबद्दल बोलता. परंतु दुसऱ्याच्या अमलाखाली असलेल्या प्रजेला अहिंसेचा काय फायदा होणार ?' अरुणने विचारले.

'आता किती वेळ ही चित्रे पाहात बसणार आहात ?' पाठीमागून रंजनचा आवाज आला. 'आश्रमवासियांना तुमची ओळख करून घ्यायचीय, भेटा की जरा सगळ्यांना.' रंजन हलकेच खोलीत येत म्हणाली. जनार्दनने चित्रांचा अल्बम बंद केला.

'अरुण, बनारसला जायच्या आधी तू इथे राहिलास तर ?'

'बनारसला कशाला जाताय ?' रंजनने आश्चर्याने विचारले.

'त्याला सन्यासी व्हायचय.' जनार्दनने उत्तर दिले.

रंजन काहीच बोलली नाही. मात्र तिने क्षणभर अरुणकडे रोखून पाहिले.

## 10. बदललेली स्थिती

**पुन्हा पुन्हा मी पंख पसरितो तुजपाशी येण्या**
**इच्छा असुनी निर्बल पण ते कुचकामी उडण्या !**
**यत्न करुनिया भानावरती आणिले प्रिय सखीने**
**काळिज माझे कापत गेले तुझिया रुदनाने !**

**—कलापी**

'तुम्ही बनारसला जाणारच आहात ?'

'असा बेत आहे. अजून नक्की नाही.'

'आमच्याबरोबर काश्मीरला चला की ?'

'काश्मीर पाह्यची इच्छा तर आहे.'

'तर मग बनारसला नंतर जा.'

जनार्दनचा आश्रम पाहून, तिथल्या रहिवाशांची ओळख करून घेऊन परत जाताना अरुण आणि रंजन मोटारीत बोलत होते.

अरुण सगळा दिवस विचार करीत होता. शेवटी त्याने बनारसला जायचा विचार आपल्या डोक्यातून काढून टाकला. त्याचे सहकारी अजून विखुरलेलेच होते. त्यांची संघटना आता नामशेष झाली होती. बनारस आणि कलकत्ता या शहरांवर पोलिसांची नेहमीच करडी नजर असे. त्यातून अरुण स्वत: संशयित म्हणूनच मानला जात होता. त्यामुळे त्याच्या हालचालींवर पोलिसांची नजर होतीच. त्यातून तो अशा परिचित गावी जाऊन राहिला तर त्याच्या कामात अडथळे आणल्याशिवाय पोलीस राहिले नसते. तेव्हा सध्या काही महिने स्वस्थ राहून देशातील एकूण वातावरणाचा विचार करून मगच क्रांतीची एखादी परिणामकारक योजना शोधून काढली तर ?

जनार्दनची संस्था इथे चांगलीच रुजली होती. तिच्यापाशी साधने होती, कार्य

करणारे उत्साही सभासद होते, शिवाय संस्थेचे एक माध्यमही होते. त्यांचा उपयोग करून घेतला तर ? अहिंसेच्या भोळ्या-भाबड्या, पौरुषहीन भावनेऐवजी हिंसात्मक बंडाची कल्पना नवीन युगाला जास्त आकर्षक निश्चितच वाटेल. जनार्दनचा प्रभाव कमी करून आपणच सगळ्यांना आपल्या मार्गावर नेऊ शकू. हा फायदा का सोडायचा ?

याबद्दल त्याने चर्चा काही कमी केली नाही. आणि त्यानंतरच जनार्दनच्या संस्थेत सामील होऊन ह्या गावीच राहायचा निश्चय त्याने केला. संध्याकाळी कृष्णकान्तने त्याला आपल्याबरोबर क्लबात बोलावले. पण अरुणने त्याला नकार दिला. युरोपियनांच्या क्लबात जायचे तर त्यांचा खास पोषाख करायला हवा आणि हा नियम अरुणकडून पाळला जाणे शक्य नव्हते. म्हणूनच कृष्णकान्तबरोबर जायच्याऐवजी अरुणने घरात बसून सुरभीबरोबर गप्पा मारणेच पसंत केले.

विलायतेत शिवलेले आणि फ्रान्समधून इस्त्री करून आणलेले कपडे घालून कृष्णकान्त क्लबमध्ये गेला. नेहमी तो जरा उशिराच जाई. वेळ असला तर तो टेनिस खेळे. नंतर बिलियर्डसच्या राजेशाही खेळात रमे.

तो क्लबात गेला की त्याच्याभोवती मित्रांचे कोंडाळे पडे. मोठ्या क्लबात 'ड्रिंक्स' प्यायल्याशिवाय चालणार नाही, असा जणू काय कायदाच बनला असावा. त्यात कृष्णकान्त आपल्या उदार अंतःकरणाचा फायदा सगळ्यांनाच देत असे. अनेक वेळा त्याने सर्वांच्या ' ड्रिंक्स'चा खर्च स्वतःच केला होता. उदार माणसाला नेहमीच मूर्खात काढले जाते. त्याच्या औदार्याचे तोटेही खूप असतात. विनाकारण खर्चिक बनलेल्या उधळ्या माणसाचा पुरा फायदा उठवून नंतर त्याला ' मूर्ख ' म्हणण्यात फारशी चूक नाही. प्रश्न एवढाच आहे की उधळेपणा आणि कंजुषी या दोन अवगुणांतला जास्त वाईट अवगुण कोणता ? स्वतःचे सुख बाजूला ठेऊन, स्वतःचे स्वत्व पणाला लावून दुसऱ्या लोकांना आपलेसे करणारा उधळ्या स्वभाव चांगला की स्वतःच्या साडेतीन हात देहातच स्वतःला गुरफटून टाकणारा कंजूष स्वभाव चांगला ?

यावर मत देणे जरा अवघडच आहे. ज्याला जे आवडेल तेच चांगले. परंतु मानवाच्या विकासाच्या दृष्टीने पाहिले तर मात्र अवगुणांच्या श्रेणीतही फरक पडू शकतो. विकासाला आवश्यक असलेली अनुकूलता, उदारपणा आणि कंजुषी यापैकी कोणत्या गुणाने जास्त मिळू शकते, याचा निर्णय मानसशास्त्रज्ञच देऊ शकेल. जग मात्र उदार माणसावर प्रेम करते, कंजुषावर नाही.

आज उदार अंतःकरणाचा कृष्णकान्त क्लबात पोचला तेव्हा नेहमीप्रमाणे त्याच्या भोवती युरोपियन मित्रांचे कोंडाळे जमले नाही. अनेकजणांनी तर जणू काय आपण त्याला ओळखतच नाही, असे दाखवून आपापले खेळ आणि गप्पा चालूच ठेवल्या. दोनचार जणांनी त्याच्याकडे पाहून अर्धवट ओळखीचे स्मित केले आणि लगेच नजर वळवली. बिलियर्ड मधल्या त्याच्या साथीदाराने खेळातले आपले नाव मागे घेतले. त्याच्यानंतर जी माणसे खेळासाठी नंबर लावून बसली होती त्यांनी आपल्याला आता खेळायचे नाही असे सांगून टाकले.

हा आपला अपमान होतो आहे असे कृष्णकान्ताला वाटले. कृष्णकान्त सरळ, उदार आणि खेळकर वृत्तीचा मानला जात होता. ते काही उगीच नाही. त्याचे कोणाशी तंटा-भांडण क्वचितच कधी झाले असेल. गप्पा करताना किंवा वाद घालताना बोलण्यात थोडाजरी कटुपणाचा अंश जाणवू लागला की तो लगेच चर्चा बंद करीत असे. कोणाचेही मन दुखावलेले त्याला आवडत नसे. त्याच्या या स्वभावामुळेच त्याची सर्वांशी मैत्री जमली होती.

परंतु आजचा हा जाणूनबुजून करण्यात येणारा अपमान त्याला सहन होऊ शकला नाही. क्लबातल्या एकुलत्या एक हिंदी सभासदाला काढून टाकण्यासाठी हा डाव रचण्यात आला आहे, असे त्याच्या लक्षात आले. कृष्णकान्तच्या व्यक्तित्वाबद्दल असा अबोल तिरस्कार व्यक्त करून ही युरोपियन मंडळी कृष्णकान्तचे राजदरबारातील कनिष्ठ स्थान त्याच्या नजरेला आणून देत आहेत, याची त्याला आता जाणीव झाली. सभ्यतेने तिरस्कार करणे, न बोलता अपमान करणे, युरोपियनांना फार चांगल्या रीतीने साधले होते.

कृष्णकान्त संतापला. युरोपियनांच्या सहवासात सतत राहिल्याने त्याचा जसा तोटा झाला होता तसाच फायदाही झाला होता. त्याच्या हिशेबी युरोपियन कधीच देव नव्हते. पूजनीय श्रेष्ठ मानव नव्हते, की सतत मेहेरबानी दाखवण्याला तत्पर असलेले वडीलधारे नव्हते. युरोपियन लोक आपल्यापेक्षा थोडेसुद्धा श्रेष्ठ आहेत. असे स्वप्नातसुद्धा तो कधी मानीत नसे. त्यामुळे त्यांची अशी वागणूक पाहून तो का भडकणार नाही ? तो तसाच सेक्रेटरीकडे गेला. आणि आसपासच्या माणसांना ऐकू जावे म्हणून मुद्दामच मोठ्याने म्हणाला, ' व्हॉट द हेल यू मीन बाय ट्रीटिंग (मी) इन धिस अबोमिनेबल वे ? वॉटस द आयडिया ? (मला असं घृणास्पद रीतीनं वागवण्यात मतलब काय तुमचा ? तुम्ही काय समजता ?')

उत्तरादाखल सेक्रेटरीने खांदे उडवले. हाताने पंजे पालथे करून बोटे उडवली. या अभिनयातून कृष्णकान्तला तो सुचवीत होता की, घडले त्याची जबाबदारी करणारांवर नाही. समोर उभ्या असलेल्या माणसावर (कृष्णकान्तवरच) त्याची जबाबदारी येते. आणि हे कृष्णकान्तने समजून घेतले पाहिजे. त्याचे जे चाळे चालले होते ते चाळे ज्यांनी युरोपियन आणि त्यांची नक्कल करण्याची उत्सुकता असलेला हिंदुस्थानी यांनी ते चाळे करताना पाहिले नसतील त्यांना समजणे शक्यच नव्हते.

आणखी काही उत्तरे-प्रत्युत्तरे झाल्यानंतर कृष्णकान्तला समजून आले की एका राजदरबारातील मंत्र्याला आपण आश्रय दिला म्हणून क्लबातले सगळे सभासद आपल्यावर नाराज झाले आहेत. आणि ही नाराजी व्यक्त करण्याचा हा प्रयोग चालू आहे.

कृष्णकान्तने झटकन एक कागद पुढे ओढला. आणि त्याच्यावर संस्थेच्या सभासदत्वाचा राजीनामा खरडला. सेक्रेटरीने त्याला सांगितले, ' जरा शांत डोक्याने विचार कर, अन मग काय ते कर.' तरीसुद्धा कृष्णकान्तने तो राजीनामा त्याच्या टेबलावर आपटला. कोणाशीही तो काही बोलला नाही की त्याने कुणाकडे पाहिलेही नाही. खुटीवरची स्वतःची हॅट उचलून तो इमारतीच्या बाहेर पडला सगळे त्याच्याकडे पाहात होते, पण त्याला कुणाकडे बघायलाही सवड नव्हती. वरातीसाठी नटावे तसे नटलेल्या, क्लबच्या झगमगीत कपड्यातल्या सेवकांनी त्याला सलाम केला, पण कृष्णकान्तने त्याच्याकडे ढुंकूनही पाहिले नाही. तो बाहेर पडला. मोटारीत बसून त्या मोटारीचे दार खाडदिशी बंद केले आणि चटकन मोटार सुरू केली.

सहसा ज्याला संताप येत नाही त्याला एकदा संताप आला की तो जास्त तीव्र असतो. घरात शिरताना त्याने आपल्या चेहऱ्यावर हसू आणायचा प्रयत्न केला. परंतु तो त्याचा प्रयत्न फारसा यशस्वी झाला नाही. घरी येताच प्रथम तो सुरभीजवळ गेला. सुरभी फिकट पडली होती. आजारी होती. तिला जीवनात काहीच आनंद वाटत नव्हता. पतीबरोबरचे तिचे वागणे एखाद्या यंत्रासारखे झाले होते. कृष्ण-कान्तच्या वागण्यातील सगळे नावीन्य आता संपले होते.

परंतु आज मात्र कृष्णकांतचे वागणे काही निराळेच होते. सुरभीने कृष्णकान्तकडे जरा रोखून पाहिले. त्याच्या सुंदर चेहऱ्याचा रंगच नाहीसा झाला होता. आणि त्याच्या चेहऱ्यावर कसलातरी चमत्कारिक भाव सुरभीला आज दिसत होता. सुरभीच्या निर्जीव डोळ्यांत थोडा जीव आला. कृष्णकान्त नेहमीच्या पद्धतीप्रमाणे

सुरभीच्या जवळ येऊन बसला. नेहमीप्रमाणेच त्याने प्रेमाने सुरभीच्या हातावर आपला हात ठेवला. आणि तिला विचारले, 'आज कसं वाटतंय तुला ?'

सुरभी कृष्णकान्तच्या तोंडाकडे पाहात राहिली. कृष्णकान्त रोज क्लबातून परते तेव्हा त्याच्या तोंडाला थोडासा उग्र परंतु गोड वास येत असे. त्या वासाबद्दल सुरभीच्या मनात चीड निर्माण झाली होती. आज हा अज्ञात गोड वास कुठे अदृश्य झाला होता ? सुरभीच्या हताश जीवनात प्रश्न उभा राहिला. आणि त्या प्रश्नाचे उत्तर शोधण्यासाठी म्हणून की काय सुरभी कृष्णकान्तच्या डोळ्यांत रोखून पाहू लागली.

कृष्णकान्तालाही हा अनुभव नवीनच होता. लग्नाच्या सुरुवातीची नवलाई निघून गेल्यावर नीरस बनलेल्या त्याच्या जीवनात आज पहिल्यांदाच जरा रस निर्माण होत असल्याचे त्याला जाणवले. त्याने पुन्हा विचारले.

'बोलत का नाहीस ? पाहातेस काय माझ्याकडे ? आज कसं वाटतंय तुला ?'

'मला बरं आहे. पण तुमचं कसं आहे ?'

'मला काय झालंय ? '

'आज झालंय काही तरी.'

'तुला भूत-भविष्य समजतं की काय ? अरुण कुठे आहे ?'

'आतापर्यंत इथेच होता. रंजनवन्सं त्याला नवीन चित्रं दाखवायला घेऊन गेल्यात.

'रंजनला कोणी भेटायला पाहिजे. नाही तर ती अरुणचं डोकं खाऊन टाकील. पाहुण्यांना जरा आराम मिळवून द्यावा, हे तिच्या लक्षातच येत नाही.'

गोष्टीवेल्हाळ माणसे एकमेकांच्यात काय शोधत असतात ?

कृष्णकान्तने सुरभीच्या कपाळावरून आपला हात फिरला. आज कितीतरी दिवसांनी त्याने अशा बसलेल्या सुरभीच्या कपाळावरून हात फिरवला होता. त्यामुळे सुरभी आणि कृष्णकान्त या दोघांनाही त्याचे नावीन्य वाटत होते. काही वेगळी अनुभूती जाणवत होती.

लगबगीने आत येणारी रंजन मात्र हे दृश्य पाहून क्षणभर थबकली. पतीपत्नींनी एकमेकांना केलेला स्वाभाविक स्पर्श पाहाण्याची सवय असलेल्या रंजनलासुद्धा या दृश्यामुळे काहीसा संकोच वाटू लागला. ती मागे फिरणार त्या आधीच कृष्णकान्तने तिला विचारले,

'रंजन, अरुण कुठे आहे ?'

'ते येतायत. आजच्या दिवस भेटून घ्या.' रंजन आत येत म्हणाली. मागून हळूहळू अरुण आत आला.

'आजचाच दिवस ?' कृष्णकान्तने आश्चर्याने विचारले.

'उद्यापासून ते आश्रमात राहायला जाणार आहेत.'

'कोणी सांगितलं ?'

'हे आले अरुणभाई. विचारा त्यानाच.'

'काय रे अरुण, ही रंजन काय म्हणतेय ?'

'मी आश्रमात राहायला जाणं हेच आपल्या सर्वांच्या दृष्टीने योग्य ठरेल.' अरुण म्हणाला.

'नॉन्सेन्स !' कृष्णकान्त उद्गारला.

'आपण इथे राहिलो तर तू अडचणीत येशील असं त्यांना वाटतंय.' रंजन म्हणाली.

'माझ्या अडचणी माझ्यापेक्षा त्याला जास्त समजतात होय ?'

'तू आणि कलेक्टरसाहेब यांच्यात यांच्याविषयी काही बोलणं झालं होतं ?'

'साहेब !' कृष्णकान्तने तिरस्काराने तो शब्द उच्चारला. कलेक्टरला जोडलेली ती उपाधी त्याला आज मान्य नसावीसे दिसले. 'याच्या कानांवर कसं आलं ते ?'

'मीच सांगितलं' रंजनने खरे सांगून टाकले.

'तुला राहावलं नाही ना ?' तुला मी बजावलं होतं की ही गोष्ट कोणाला कळता कामा नये. पण तू गप्प राहिलीस तर तुला रंजन कोण म्हणेल, नाही का ?' कृष्णकान्तने रंजनला दटावले. त्या दटावणीतून त्या दोघांचे परस्परांवरील प्रेमच अरुणला जाणवत होते. जशी सुरभी त्याची लाडकी होती तशीच रंजनही कृष्णकान्ताची लाडकी बहीण होती.

'मग काय करू ? मी सांगून टाकलं सारं. सकाळी तुझ्या त्या कलेक्टरनं माझा अपमान केला अरुणभाई तेव्हा माझ्याबरोबरच होते. तेव्हा मग मला राहवलं नाही.'

कृष्णकान्तने रंजनला सकाळची हकीकत विचारली. रंजनने सगळी घटना सांगून टाकली. ते ऐकून कृष्णकान्त चांगलाच संतापला. आपल्याबरोबर ते लोक कसेही वागोत, पण आपल्या बहिणीशी वागतानासुद्धा ते शिष्टाचार पाळू शकले नाहीत !

'मीसुद्धा आज क्लबमधून राजीनामा देऊन आलोय.' त्याने सांगितले.

आता मात्र अरुणचा निश्चय पक्का झाला. युरोपियन समाजात आतापर्यंत मानाने

फिरणाऱ्या त्याच्या मेव्हण्याला त्या समाजाने त्याच्यामुळे वाळीत टाकावे हे त्याला बरे वाटले नाही.

'असं होऊ नये म्हणूनच अरुणभाई आश्रमात राहायला जायचं म्हणताहेत.' रंजनने सांगितले.

'केअर अ, हँग,' (कोण पर्वा करतं त्यांची) असं कोणाच्या तरी बोलण्यावरून पळून जायचं असतं काय ?'

'पण त्यांनी तर पळून जायचा निश्चयच केला आहे. हे नाही तरी दुसरं कारण त्यांनी शोधून काढलंच आहे.'

'कोणतं ?'

'बहिणीच्या घरी भावाला राहाता येत नाही.' रंजन म्हणाली.

'यू ओल्ड इडियट ! सोशॅलिझमच्या गप्पा मारतोस तू आणि अजून या जुनाट कल्पनांना धरून आहेस ?' हसत-हसत कृष्णकान्तने अरुणला टोमणा मारला.

सोशॅलिझममध्येसुद्धा भावा-बहिणींचे नाते असतेच. मानवजातीतील या अत्यंत पवित्र नात्याशी अनेक नाजुक भावना गुफल्या गेल्या आहेत. आर्थिक आणि राजकीय क्षेत्रात कितीही उलथापालथी झाल्या तरी त्यामुळे या नात्यात काही बदल घडून येणे शक्य नाही.

बहिणीच्या घरी भाऊ राहू शकत नाही. पित्याचा संपूर्ण वारसा एकट्या भावावर सोपवून जाणाऱ्या बहिणीचे पर्वताएवढे ऋण भावाला कसे विसरता येईल ? स्वत:चा हक्क सोडून देऊन बहीण भावाकडून एक वंशपरंपरागत हक्क मागून घेत असते. बहीण पूज्य असते, पवित्र असते, वंदनीय असते. आणि एकटी बहीणच नाही तर तिची मुलेसुद्धा. त्यांचे काहीसुद्धा घ्यायचे नाही तर मग बहिणीच्या घरी भावाला राहवेल कसे ?

अरुणला घेऊन कृष्णकान्त हसत हसतच कपडे बदलायला गेला. त्याला अरुणची समजूत काढायची होती— अशा जुनाट भावना जपून ठेवण्याचा वेडेपणा करू नकोस असे तो त्याला सांगत होता.

रंजनही उठून उभी राहिली. जाता-जाता तिने सुरभीचा हात हातात घेतला, आणि ती हसली.

'का हो रंजनवन्सं, हसताय का ?'

'वाहवा वहिनी, तू भलतीच प्रेमात पडलेली दिसतेस !'

'उगीच काहीतरी बोलू नका. मला काही माहीत नाही.'

'मी आत आले तेव्हा काय चाललं होतं तुमचं ? कोणी कपाळावरून हात फिरवला तर खरंच का हो इतकं बरं वाटतं ?'

'चला लबाड कुठल्या. जा इथून.' असे म्हणत सुरभीने रंजनच्या हातावर एक चापटी मारली. रंजन हसत हसतच तिथून बाहेर पळाली.

सुरभी विचार करू लागली, 'काय झालं हे आज ? इतक्या दिवसांनी आज माझं काळीज कशानं धडधडतं आहे ?'

# 11. आश्रमव्यवस्थेतील गुंतागुंत

**पापाचे आमिष मोहवू न शके,**
**मोह-स्नेहाचा फरक जो समजे,**
**काम आणि रसानन्दातील फरक जाणे.**

**—न्हानालाल**

कृष्णकान्तने खूप आग्रह केला. तरीसुद्धा त्याचे न ऐकता अरुण आश्रमात राहायला गेला. महालातील झगमगाट, बंगल्यातील साचेबंद जीवन, यांच्यापेक्षा आश्रमातल्या त्या झोपडीत अरुणला जास्त मोकळे वाटत होते.

हळूहळू अरुण आश्रमातील कार्यात पार बुडून गेला. आश्रमाचे ग्रंथालय त्याने आपलेसे करून टाकले. थोड्या दिवसांतच त्याने ग्रंथालयातली सगळी पुस्तके वाचून काढली. काही महत्त्वाच्या पुस्तकांची त्याने त्रोटक टिपणेही काढली. त्या वाचनावरून त्याला एक स्पष्ट जाणवले की जगातले थोर लेखक आणि विचारवंत यांनाही अहिंसेची नीटशी ओळख अजून पटलेली नाही. त्यामुळे त्याचे वाचनही त्याला हिंसेच्या तत्त्वा-कडेच ओढून नेत होते. महात्मा-गांधींचे लेख आणि जनार्दनशी होणारे त्याचे वादविवाद यामुळेच फक्त त्याला अहिंसेवर विचार करावासा वाटे.

तरुण स्वप्नांचे इमले जेवढ्या घाईघाईने रचतात तेवढ्याच घाईगर्दीने ती स्वप्ने प्रत्यक्षात आणूही शकतात. शहाणपणा, व्यवहार, चिंता, सावधानता, हिशेबी वृत्ती, सुरक्षितता, अशा प्रौढत्वसूचक, छाती दडपून टाकणाऱ्या संकटांनी जर त्यांना अटकाव केला नाही तर तरुण आपले नवीन जग झटपट उभे करू शकतील. दहा वर्षांनंतर हेच तरुण शहाणे-सुरते व्यवहारदक्ष बनतात. स्वतःची स्वप्ने दूर फेकून देतात. कालचा जहाल आजचा मवाळ बनून जातो. टिळकांच्या शब्दाशब्दांना टाळ्या वाजवणारा तरुण पाच-दहा वर्षांतच गांधीजींच्या पुढे नमू लागतो. तरुणांना आपले जग बनवायची

परवानगी दिली तर त्यात काय हरकत आहे ? तरुण चुका करतील ? पण मग म्हातारे कुठे कमी चुका करतात ? आणि तरुणांच्या चुका जगाला पुढे नेऊ शकतात. वृद्धांच्या चुकाप्रमाणेच जगाची गती त्यामुळे खुंटत नाही

हिंदी तरुणांचे आजचे स्वप्न हिंदुस्थानचे स्वातंत्र्य ! हे ध्येय गेल्या चाळीस-एक वर्षांपासून विकास पावत आहे. सुरुवात लहान-मोठ्या अन्यायाकडे सरकारचे लक्ष वेधण्याने झाली. आणि आता हिंदुस्थानची मजल संपूर्ण स्वातंत्र्यावर हक्क सांगण्यापर्यंत गेली आहे. राजकर्त्यांनीही या हक्काला तोंडी मान्यता दिली खरी. परंतु हे संपूर्ण स्वातंत्र्य उपभोगण्याची हिंदवासियांची अजून लायकी नाही असे ते म्हणतात. आणि हिंदवासियांच्या भल्याकरताच ते त्यांना स्वातंत्र्य उपभोगू देत नाहीत. एवढाच या दोघांच्यातला फरक !

हा फरक टाळण्याचे तीन मार्ग आहेत. कायदेशीर लढा, हिंसात्मक लढा आणि अहिंसात्मक लढा. तिन्ही शेवटी लढेच. कायदेशीर लढा वृद्धांच्या हातात गेला. मात्र त्या वृद्धांच्या हातातून देशाचा लगाम निसटून गेला. तरुण– मनाने तरुण असलेले– हिंसेचा आश्रय घेतात. परंतु अहिंसेचा विश्ववंद्य प्रेषित हिंसेवर बहिष्कार टाकायला सांगतो आहे. त्यांनी नवीनच लढा सुरू केला आहे. हा लढा द्वेषाचा नाही, वैराचा नाही हा प्रेमाचा लढा आहे. हा योद्धा देशभर सैनिकांना विचारतो,

'मित्रांनो, तुम्हाला मरता येतं का ?'

काही सैनिक उत्तर देतात, 'नाही बुवा, आम्हाला मारता येतं. मारता मारताच मेलो तर हरकत नाही.' त्या सैनिकांना हा म्हणतो, 'मित्रा, तू पहिल्यांदा मरायला शीक आणि मगच माझ्या सैन्यात ये. मारणाराला माझ्या सैन्यात जागा नाही.'

म्हणून हिंदी तरुण चक्रावून गेला आहे. भांबावून गेला आहे. महात्म्याचा हा सिद्धान्त अजून राजकीय तत्त्वज्ञानात समाविष्ट झालेला नाही. तो अजून नवाच आहे. अहिंसेने एखाद्या देशाला स्वातंत्र्य मिळाल्याचे कधी कोणी ऐकलेय का ? महात्मा म्हणतो :

'पूर्वी ऐकलं नसेल तर आता ऐकाल !'

आणि मग ते एका महान तपश्चर्येचा कार्यक्रम आखतात. हजारो वर्षांच्या पारतंत्र्याचे पाप धुऊन काढण्यासाठी तलवारी-बंदुकींचा उपयोग होणार नाही. ते धुवायचे तर अहिंसा, अस्तेय, अक्रोध (राग येऊ न देणे) या पंचाग्नींची जरुरी आहे. या अग्नीत दुसऱ्याला जाळायचे नसते, स्वतःच जळायचे असते. जेवढ्या त्वरेने

हे पाप जाळले जाईल तेवढया लवकर हिंदुस्थानला स्वराज्य मिळेल. जीवनमुक्तीचा हा प्रयोग स्वदेशमुक्तीसाठी का नाही उपयोगात आणू ?

हा महात्मा धुनी पेटवूनच बसला आहे. घाबरलेले, संकोचून गेलेले अनुयायी त्याच्या आसपास पसरले आहेत. पाप जळून जाते आणि मग विशुद्धीचे प्रमाण वाढले की, जीवन स्वतंत्र बनते हे त्यांना आता अर्धवट पटायला लागले आहे.

पण अग्नीत समिधेसारखे जळत राहाणे हे मरण्यापेक्षा फार अवघड आहे. महात्म्याच्या यज्ञकुंडाचे निरीक्षण करून इतरही आपापले अग्नी प्रज्वलित करायचा प्रयत्न करीत आहेत. परंतु आत्मविशुद्धीच्या यज्ञात स्वतःची आहुती देण्याऐवजी वाटेल तसा अग्नी प्रज्वलित करून त्यात आपल्या विरोधकांना जाळून टाकण्याचे कामच त्यांना अधिक सोपे वाटते.

जनार्दनचा आश्रम अहिंसा आणि हिंसा या तत्त्वांच्यामध्ये हिंदकळू लागला. जनार्दनची स्वतःची अहिंसेवर संपूर्ण श्रद्धा होती. त्याने हिंसेचा इतिहास अभ्यासिला होता. पाशवी बळाच्या आधारावर एखाद्या प्रश्नाचा निकाल लावला तर तो निर्णय खोटा आणि अल्पजीवी ठरतो, हे त्याला समजत होते. ' बळी तो कान पिळी ' हेच हिंसेच्या तत्त्वज्ञानाचे थोडक्यात सार. हा सिध्दान्त एके काळी व्यक्तीनुसार खरा ठरतही होता. परंतु आज मात्र व्यक्तिपरत्वे तो खरा ठरत नाही. हे तत्त्व आज खरे मानले तर पहिलवान, डाकू आणि खुनी आजच्या सत्याचे अधिकारी ठरतील. एकदा का श्रेष्ठता पाशवी बलावर ठरत नाही असे व्यक्तिपरत्वे स्वीकारले की, मग सर्वसामान्य जनतेच्या श्रेष्ठतेचे प्रमाण तरी पाशवी बलावर कसे काय ठरवता येईल ?

आश्रमातील सदस्यांची राहाणी अत्यंत साधी असावी याबद्दल जनार्दन अत्यंत दक्ष होता. खेडयापाडयांतून राजकीय जागृती घडवून आणावी या हेतूने त्याने आपल्या सहकाऱ्यांना जवळपासच्या खेडयापाडयांत केंद्रे उघडून दिली होती. मात्र अशी राजकीय जागृती करताना अराजकता आणि गोऱ्यांबद्दलचा तिरस्कार निर्माण होणार नाही याची काळजी घ्यायच्या सूचना त्याने आपल्या कार्यकर्त्यांना दिलेल्या होत्या. इंग्रजी सत्तेमध्ये हिंदुस्थानवासियांची बुध्दी खुंटली गेली होती. त्यांच्या आशा-आकांक्षा अपूर्णच राहात होत्या. आणि त्यांची आर्थिक लूट तर अखंड चालूच होती. या सर्व बाबींवर त्याच्या पत्रातून कडक टीका असे. मात्र त्याचबरोबर स्पृश्यास्पृश्यता, हिंदु-मुस्लीम संघर्ष, विवाह आणि मृत्युविधींवरील खर्च, स्त्रियांची गुलामी, या हिंदू समाजातील लहानमोठया उणिवांबाबतही तो हिंदी बांधवावर कडक कोरडे ओढीत असे.

त्याची सारी कटुता संस्था, सत्ता आणि रीतिरिवाज यांच्याविषयी होती. व्यक्तिगत टीका मात्र त्याने कधीच केली नाही.

अरुणने जनार्दनचा बराचसा भार हलका केला होता. अरुणचे लिखाण आता उच्च दर्जाचे गणले जाऊ लागले होते. त्याची व्याख्याने प्रभावी ठरत होती. त्याच्या योजना यशस्वी होत होत्या. हळूहळू जनार्दन अरुणवर आश्रमाची अधिकाधिक जबाबदारी सोपवू लागला होता. मात्र हिंसा, वैर, द्वेष वाढणार नाही याबद्दल जनार्दन काळजी घेत होता. अरुणकडून कळत-नकळत असे काही घडले तर तो अरुणला बेधडक रोखत होता. अरुणची श्रद्धा अजून अहिंसेवर पूर्णतया बसली नव्हती. तरीसुद्धा जनार्दन-साठी म्हणून तो स्वत:चा हिंसात्मक क्रांतिवाद पुढे ढकलत नव्हता.

तरीही त्याच्या लिखाणात, व्याख्यानात, विचारात निर्भेळ अहिंसा अजून आली नव्हती. जे अरुणचे तेच इतरांचेही झाले होते. संस्था आणि तत्त्वे यांच्याविरुद्ध बेदिली उत्पन्न करायची झाली तर व्यक्ती आणि तिचे कार्य यांच्याबद्दलही तिरस्कार उत्पन्न होतो. अंमलदारशाहीची बदनामी करता करता अंमलदार राक्षस चित्रिले जातात. अहिंसा पालनाची शिकवण देण्याऐवजी गर्भित रीतीने हिंसेची वृत्ती जागृत केली जाते.

पाप आणि पुण्याच्या रेषा निश्चितपणे आखून देणे अवघड आहे. एका अबलेवर अत्याचार होत असताना तो थोपविण्यासाठी एखाद्या तलवारबहादुराने खून केला तर ते पाप की पुण्य ? एक अस्पृश्य मंदिरात चाललेला पाहून त्याचे डोके लाकडाने फोडणारा उच्चवर्णीय हिंदू पुण्य जोडतो की पाप करतो ? हिंसेचे रूपांतर अहिंसात कधी होते आणि अहिंसा उग्र हिंसेचे रूप कधी घेते, हे ताबडतोब समजून येत नाही. आश्रमाच्या अहिंसेलाही हिंसेचे अनेक डाग लागलेले जनार्दनने पाहिले होते. त्याला बऱ्याच अंशी अरुण कारणीभूत होता. ते पाहून जनार्दनला दु:ख होई. तो अरुणला समजावी, मना करी, रागावी. तरीसुद्धा अरुणची कर्तव्यभावना, देशसेवा करण्या-बाबतची उत्सुकता इतकी उच्च दर्जाची आणि विशुद्ध होती की जनार्दनच्या कलाप्रमाणे वागून त्याने जनार्दनलाही प्रसन्न ठेवले होते. आणि दोन-तीन महिन्यांतच सगळ्या मंडळाचे सचिवपद (नेतेपण) सर्वांच्या संमतीने मिळविले होते.

अरुण आल्यापासून आश्रमाचे वातावरण धारदार बनले होते. आश्रमाच्या कामकाजात पूर्वीपेक्षा निराळी जागृती दिसून येत होती. पूर्वी जनार्दनचा रंजन आणि पुष्पा यांच्याशी कामानिमित्त संबंध येत असे. अरुण आल्यानंतर हा परिचय जास्तच वाढला. थोड्या दिवसांनंतर आश्रमात एक स्वतंत्र स्त्री-विभागही उघडण्यात आला.

आणि रंजनच्या नेतृत्वाखाली कित्येक स्त्रिया आता देशसेवेचे थोडेबहुत काम करायला तयार झाल्या होत्या.

जिथे स्त्री-पुरुषांचा समुदाय एकत्र येतो, तिथे धोका असतो असे जग मानीत असते. जगाल्लाही याबाबत काही जुने अनुभव आलेले आहेत. त्यामुळे ही समजूत अगदीच चुकीची आहे असे मानणे जरा अवघडच आहे. परंतु केवळ तेवढयाचसाठी स्त्री-पुरुषांनी एकत्र यण्याला बंदी घालणे, त्यांना एकत्र काम करण्याला प्रतिबंध करणे योग्य नाही. मानवी मन कमकुवत असते हे खरे. तरीसुद्धा स्त्री-पुरुषांनी एकत्र काम केल्याने जगाचे कल्याण होण्याचा फारमोठा संभव असतो. आणि म्हणूनच सर्व धोका पत्करूनही स्त्री-पुरुष एकत्र येण्याचा हा प्रयोग चालूच राहिलेला आहे. जग डोळे मिचकावील, उघड-उघड चेष्टा करील, जबरदस्त बदनामी करील, आणि त्यासाठी अस्सल पुरावाही कदाचित सादर करील. तरीसुद्धा सार्वजनिक जीवनात स्त्रिया आता पुरुषांच्या बरोबरीने काम करायला लागल्या आहेत, त्या आता थांबणार नाहीत. प्रभात फेरी-मध्ये एक तरुण व एक तरुणी प्रेमाचे चाळे करताना सापडले असा लोकापवाद पसरला तरी प्रभात फेरीचे महत्त्व कमी मानायची गरज नाही.

अरुण आणि विमोचन यांच्यामधला झगडा वाढतच होता. रंजन अरुणबरोबर फिरते हे विमोचनला मुळीच आवडत नसे. विमोचनचे रंजनवर प्रेम होते. विचित्र, चंचल रंजनलाही विमोचनच्या परिचयाचे इतके कौतुक होते की जग त्यांच्याकडे एक भवी युगुल या भावनेनच पाहात होते. प्रेम ही चीज फार अनुदार आणि कंजुष आहे. त्याला जे हवेसे वाटते ते एखाद्या कंजुषामारखे जपून ठेवायचा ते प्रयत्न करते. रंजनला चेष्टा करायची फार सवय होती. विमोचनचे आपल्यावर प्रेम आहे, हे तिला माहीत होते. सुंदर स्त्रियांवर प्रेम करणारांचा जगात तुटवडा नसतो. परंतु प्रेमाला निव्वळ साहित्यिकत्वाचा आधार पुरेसा असतो की नाही याचा अचूक अंदाज करायचा प्रयत्न ही हसरी, हसवणारी, उच्छृंखल वाटणारी मुलगी करून पाहात होती का?

अरुण तिच्या भावजयीचा भाऊ. मागे कधीतरी तिने त्याला पाहिल्याचे तिला आठवत होते. त्याच्यावर मध्यंतरी जो खटला झाला त्यामुळे रंजनला त्याच्या-बद्दल एकप्रकारचा आदर आणि सहानुभूती निर्माण झाली होती. कुठलेही कष्ट करावे न लागता सुखाचे, साधेसीधे आयुष्य जगणारांना चमत्कारिक कष्ट सहन करावे लागणारांबद्दल एक प्रकारचे कुतूहल निर्माण होते. त्याच अरुणला असे अचानक भेटल्यानंतर साहजिकच त्याची ओळख करून घ्यावेसे रंजनला वाटू लागले. परिचय

करून घेणे रंजनच्या दृष्टीने अवघड नव्हते. तिची-त्याची ओळख आता वाढली होती. विमोचनच्या आपल्याबद्दलच्या नाजुक भावना लक्षात घेऊनच तिने त्याला चिडवण्यासाठी आपल्या व अरुणच्या ओळखीचा बराच गाजावाजा केला होता.

साहित्यिक विमोचनचे लेख स्वीकारण्यासाठी वर्तमानपत्रे आणि मासिके टपून असत. एक उदयोन्मुख कवी म्हणून विमोचनचे नाव सर्वतोमुखी झाले होते. त्याचा चेहराही फारसा आकर्षक नव्हता. लहानपणापासूनच त्याचा साहित्याशी संबंध आला होता. तो काहीसा जड विद्वान झाला होता. ह्या विद्वत्तेचा भार त्याच्या डोळ्यांत, वाणीत आणि वागणुकीत दिसत असे. त्याला आतापर्यंत कोणीही विरोध केला नव्हता. त्यामुळे विद्वत्तेचा हा भार हे त्याच्या व्यक्तिमत्त्वाचे एक अंग होऊन गेले होते.

अरुणबद्दल सुरुवातीपासून त्याच्या मनात नावड निर्माण झाली होती. त्यातच रंजनचा आणि त्याचा सहवास वाढत होता. त्यामुळे अरुणने आपला फार अक्षम्य गुन्हा केला आहे असेच तो साहित्यिक मानत होता. हळहळू त्याने अरुणचे लेख आणि त्याची मते यांच्याविरुद्ध वर्तमानपत्रातून कडक टीका करायला सुरुवात केली. तो जनार्दनच्या कार्याची आपल्या लेखातून प्रशस्ती करी. मात्र नवीन आलेल्या या क्रांतिवाद्यामुळे जनार्दनने सुरू केलेल्या चांगल्या कार्याला हरताळ फासला जात आहे असे आपल्या लिखाणातून सिद्ध करण्याचा तो प्रयत्न करी. त्यामुळे जनार्दन आणि त्याचा आश्रम यांच्याशी असलेले आपले संबंध कायम ठेवून अरुणचे दोष दाखवून देणाचे काम त्याने चालू ठेवले होते.

कडक टीकेचे उत्तरही कडक शब्दातच दिले जाणे स्वाभाविक आहे. आघात-प्रत्याघाताच्या नियमाप्रमाणेच हेही अनिवार्य आहे. अरुण त्याच्या टीकेला रोखठोक उत्तर देई. इंग्रजी राज्य वाईट हे एक वेळ पक्के ठरले होते. मग पायात काटा बोचला तरी तो इंग्रजी राज्याच्या वाईट प्रभावाचा परिणाम आहे अशीच समजूत आपण करून घेऊ पाहातो. असहकारितावाले फालतू प्रसिद्धीच्या मागे असतात असा एकदा समज करून घेतला की, अहिंसेप्रीत्यर्थ गोळीला सामोरा जाणाऱ्या असहकारितावाद्यालासुद्धा मरताना टाळ्यांचे कडकडाटच ऐकू येत असतील असे सांगण्यापर्यंत मग मजल जाते. टीका करणे हे जितके स्वाभाविक तितकेच त्या टीकेचे उत्तर देणेही स्वाभाविक आणि त्यामुळेच विशेष मनोरंजक ठरते.

जनार्दनचे दडपण असूनही टीकेची कटुता वाढतच होती. त्याचा परिणाम होऊन हिंसावृत्ती जागृत झाली नसती तरच नवल. विमोचनच्या कानावर शब्द येऊ लागले. 'ए दीडशहाण्या, तुला ठोकून काढावं लागेल.' आणि अरुणला धमकी मिळे, 'ए बढाईखोरा, सांभाळ हं. एखाद दिवशी रंगून निघशील.'

जनार्दनने शेवटी अहिंसेचे वातावरण पुन्हा प्रस्थापित करायचा निश्चय केला. आश्रमवासियांना जाहीररीत्या अहिंसेचे व्रत घ्यायला लावायचे. तसे करताना कितीही कष्ट पडले तरी अहिंसेखातर ते सगळे सहन करायचे.

त्याने दिवस निश्चित केला. अरुणने, असे व्रत घेणे आपल्याला शक्य नाही, असे सांगून टाकले. जनार्दनला त्याचे वाईट वाटले, दुख झाले. त्याने अरुणला पुन्हा समजावले. परंतु अरुणने शपथ घ्यायची तयारी दाखवली नाही. अरुणसारख्या सहकाऱ्याला मुकावे लागले तरी अहिंसेची प्रतिष्ठापना करणे आवश्यक आहे असे जनार्दनचे ठाम मत झाले होते. जनार्दनसारख्या पवित्र सत्पुरुषाचा संबंध सोडावा लागेल या विचाराने अरुणही खिन्न झाला होता.

अरुण आश्रमात राह्यला आला आहे हे त्याच्या वडलांना समजले तेव्हा त्यांनी अेका भल्यामोठ्या रकमेची एक मनिऑर्डर त्याच्या नावावर पाठवून दिली होती. मुलाला दोष दिल्यामुळे त्याच्या पित्याला वाईट वाटत होते. पुत्राबाबतचे आपले कर्तव्य बजावायचे अजून राहिले आहे, अशीच त्यांची भावना होती. परंतु मुलाने ती मनिऑर्डर परत पाठवून दिली. आणि अत्यंत नम्रतेने त्यांना लिहिले, 'तुम्ही माझी वाजवीपेक्षा जास्त काळजी आतापर्यंत घेतली आहे. सध्या मला पैशाची आवश्यकता नाही. योग्य वेळेला आपल्या पायाशी मी हजर होईन.'

आश्रमातून जायचे म्हटले तर पैशाचा प्रश्न उभा राहणार होता. त्याच्याजवळ तर आता फुटकी कवडीही नव्हती. क्षणभर त्याला हा विचार बेचैन करून गेला. पण फकिराला पैशाची कसली पर्वा? त्याच्या फकिरीने विजय मिळवला आणि अहिंसेचे व्रत न घेण्यामुळे ज्या ज्या अडचणी येतील त्या साऱ्या सहन करायचा निश्चय त्याने केला.

शपथ घ्यायचा दिवस येऊन ठेपला. आश्रमवासीय आणि जनार्दन यांच्या स्नेहावर तिलांजली ठेवण्याचा प्रसंग आला. 'अहिंसेचा प्रयोग करून पहिला तर ?' मनात विचार येऊन तो किंचित हसला. आपण दुर्बल बनत आहोत असे त्याला वाटले. परंतु हिंसा तरी देशाला स्वातंत्र्य देऊ शकेल काय? जनार्दनशी केलेल्या वादविवादात

अरुणला हिंसेच्या मर्यादाही स्पष्ट समजून आल्या होत्या.

'शपथ घेण्याबाबत तुम्ही काय निश्चय केला आहे?' असे जेव्हा रंजनने अरुणला विचारले, तेव्हा त्याने सांगितले, 'जे होईल ते खरं. उद्या मनात येईल तसं करणार मी.'

'एखाद्या वर्षापुरतंच तुम्ही हे व्रत घेतलंत तर? आजच्या आज रक्ताचा सडा पडला तरी हिंदुस्थान स्वतंत्र होत नाही ना!' रंजनने विचारले.

'पाहू या. रात्री विचार करतो.'

# 12. धना भगत

देव गेले डोंगरावर
पीर गेला मक्के
इंग्रजी या राज्यात
धेड मारतो धक्के ।।

—लोकोक्ती

जनार्दनने ध्वजवंदनाचा एक कार्यक्रम ठरवला. आणि सगळ्या आश्रमवासियांना अहिंसेची शपथ घेण्याचा आग्रह केला. अरुण मात्र ही शपथ घेणार नाही, उलट आश्रम सोडून जाईल. अशी जनार्दनला भीती वाटत होती. पण अरुण ध्वजवंदनात सामील झाला. अहिंसात्मक लढ्याशी संबंधित एक गाणे म्हटले जात असतना त्यानेही आपला सूर त्यात मिसळला. परंतु शपथ घ्यायची स्वतःची पाळी आली तेव्हा मात्र तो जरा अडखळला. शपथ घ्यायची ? पण शपथ घ्यायची तर कायमची शपथ घेण्याइतपत त्याची अहिंसेवर अजून श्रद्धा बसली नव्हती. जनार्दनने त्याला साहजिकच उत्तेजन दिले. परंतु प्रतिज्ञा पाळण्याबाबतची स्वतःची असमर्थता अरुणला समजत होती. एक आवाज एकदा त्याच्या कानात गुणगुणत होता. तोच आवाज आताही त्याच्या कानात गुणगुणू लागला.

'एखाद्या वर्षापुरतीच अशी शपथ तुम्ही घेतली तर ?'

हा प्रश्न कालच रात्री रंजनने त्याला विचारला होता. आज पुन्हा तोच आवाज त्याच्या कानात घुमत होता. अरुणने पाऊल पुढे टाकले. ध्वजाला प्रणाम केला आणि इतर सर्वांना आनंदाश्चर्यात बुडवून टाकीत तो प्रतिज्ञा उच्चारू लागला.

'मी या ध्वजाला साक्षी ठेवून अशी प्रतिज्ञा करतो की, मी एक वर्षभर अहिंसेचे काटेकोरपणे पालन करीन.'

रंजन सकाळच्या प्रहरीच आश्रमात आली होती. खरे म्हणजे बायकांनी ही शपथ घ्यायची नव्हती. पण अशी शपथ कोणी कोणी घेतली नाही, हे जाणून घेण्याची तिला इतकी उत्सुकता लागून राहिली होती की, तिला आल्यावाचून राहावेना. ती आश्रमात आली खरी. परंतु अरुण शपथ घेईल की नाही, याबद्दल तिला खात्री नव्हती. त्यामुळे तो ध्वजासमोर आली नाही. काहीतरी लिहीत बाहेरच बसून राहिली. परंतु तिने लिहायला सुरुवातही केली नसेल तेवढ्यात पोलीस अंमलदार नृसिंहलाल आश्रमात येऊन पोचला होता.

कोणतीही चळवळ सुरू झाली की सुरुवातीला विरोधक तिच्याकडे जरा सौम्य नजरेनेच पाहातात. नृसिंहलालनेही आल्या-आल्या फार गडबड केली नाही. त्याने तीन-चार पुस्तके आणि आश्रमवासियांच्या नावाची एक यादी एवढ्याच गोष्टी घेतल्या. आश्रमाचा चिटणीस या नात्याने अत्यावश्यक प्रश्नांना उत्तरे देण्यासाठी नृसिंहलाल-बरोबर अरुणने जावे असे ठरले. आणि रंजन आपणहूनच परवानगी घेऊन नृसिह-लालच्या मोटारीत जाऊन बसली, याचे सर्वांनाच आश्चर्य वाटले. तिला वाटेत सुशीलेच्या घराजवळ उतरायचे होते.

जनार्दनला जरा आश्चर्यच वाटले. अरुणने प्रतिज्ञा घेतली त्याबद्दल रंजनचे आभार मानायला हवेत हे आता त्याला कळून आले. रंजनजवळ राह्यला मिळते आहे हा मोहच तर या शपथेच्या मुळाशी नाही ना? तरुण-तरुणींच्या मीलनामुळे स्वतःच्या कार्याला अनपेक्षित दिशा तर मिळणार नाही ना? परंतु हे जग तरुण आणि तरुणी, म्हणजेच स्त्री आणि पुरुष यांच्यातूनच निर्माण झालेले आहे. त्यांच्याचमुळे जगात अेवढ्या घटना घडत असतात. त्यांचाच साधन म्हणून उपयोग केला जातो. स्त्री आणि पुरुष नसतील तर अेकतरी घटना घडू शकली असती का?

मोटारीत कोणीच कोणाशी बोलत नव्हते. नृसिंहलाल, रंजन आणि अरुण या दोघां-नाही ओळखत होता. त्याच्या मनात विचार येत होते, एका चांगल्या अधिकाऱ्याचा मुलगा अरुण आणि एका सुखी गर्भश्रीमंत सुसंस्कृत भावाची बहीण रंजन हे या खडतर मार्गाकडे का वळले असावेत? आपला स्वतःचाही मुलगा याच मार्गाकडे का आकृष्ट झाला? तारुण्य म्हणजे वेडेपणाच नव्हे की काय? एखादा पक्व विचारांचा, प्रौढ, अनुभवी पुरुष या अशा स्वप्नासारख्या कल्पना मनाशी बाळगील तरी का? हिंदुस्थाना-तल्या लोकांना असे काय मोठे दुःख होत आहे? की त्यांना सरकारच्या विरुद्ध उठावेसे वाटावे. लोक मजेत राहात आहेत, खात आहेत, पित आहेत. स्वतःचा धंदारोजगार करीत आहेत. पोलिसांच्या मार्फत सरकार लोकांचे रक्षण करीत आहे. रेल्वे गाड्या

सुरू करून लोकांना प्रवासाच्या सोयी करून दिल्या आहेत. नाही एखाद्या परदेशी आक्रमणाचा धोका की चोरी दरवडयाची भीती. एखाद्याच्या नशिबात जेवढे लिहिले आहे तेवढे त्याला कष्ट न करता मिळते आहे. तो स्वतःच सध्या हंगामी डेप्युटी इन्स्पेक्टर ऑफ पोलीस म्हणून मोठ्या हुद्द्यावर काम करीत आहे. काही दिवसांनी तो त्या जागेवर कायम झाला असता. सध्याही तो मोटार बाळगून होता. या इंग्रजी राज्यात असे काय दुःख सोसावे लागते की, लोकांना चळवळ करावीशी वाटते! तारुण्यातील बेचैनी याशिवाय तर नृसिंहलालला त्याचे दुसरे काही कारण सापडेना.

'तो लोकांचा घोळका उभा आहे ना तिथे जरा मोटार थांबवा.' रंजनच्या या विनंतीने नृसिंहलाल आपल्या विचारातून जागा झाला.

'हे एवढे लोक कशाला गोळा झालेत इथे?' नृसिंहलालने विचारले. जमाव म्हणजे पोलिसांची स्फूर्ती. एका मोठ्याशा घराजवळ दोन-तीनशे माणसे गोळा झाली होती, आणखी माणसे येतच होती. तिथून पुढे एक मोठे मैदान होते.

'आता तुम्ही त्या घरात कशा जाणार? हे एवढे लोक जमलेत तिथे! मी येऊ का बरोबर?' अरुणने विचारले.

सुशीलेचे घर आले होते. तिच्या घराच्या एका बाजूलाच लोक जमले होते. ही एवढी माणसे तिथे कशाला जमली होती, ते कोणाला समजले नाही. एक पोलीस अंमलदार या नात्याने नृसिंहलालही खाली उतरला. तिघेही जण गर्दीपाशी आले. गर्दीच्या पलीकडच्या बाजूने दोन-तीन पोलीस शिपाई अगदी शांतपणे लोकांना तिथून निघून जायला सांगत होते. ज्यासाठी गर्दी जमा होते ते कारण दूर करण्याऐवजी पोलीस त्या गर्दीलाच हटवायचा प्रयत्न नेहमी करीत असतात. त्यामुळेच ते अयशस्वी ठरतात.

मागच्या उभ्या असलेल्या एका माणसाला नृसिंहलालने विचारले, 'काय झालंय हो?'

'गारुडयाचा खेळ असेल बहुधा.'

'एवढी गर्दी?'

त्यावर तो माणूस काहीच बोलला नाही. गर्दीत काय चालले आहे याची त्यालाच काही कल्पना नव्हती. तेवढ्यात अरुण थेट गर्दीत घुसला.

नृसिंहलाल रंजनला घेऊन हळूहळू रस्ता काढीत चालला होता. त्याचा रुबाबदार चेहरा आणि आवाज ऐकून सगळीजणं त्यांना रस्ता देत होती.

'का हो, एवढे सगळे कशासाठी जमला आहात?' आणखी दोघांतिघांना नृसिंह

लालने विचारले. पण त्यांच्यापैकी प्रत्येकजण काहीच उत्तर न देता बाजूला झाले. गर्दीत जमलेल्या अनेकांना आपण इथे कशाला जमलोत हेच माहीत नव्हते.

'चोर, चोर.'

'मारा, मारा. ठोका.'

'पकडो, पकडो.'

गुंड दिसणाऱ्या दोन-तीन तरुणांनी गर्दीत शिरून आरडा-ओरडा करायला सुरुवात केली. पण चोर कोण ? कशाला मारायचे ? कोणाला पकडायचे ? या प्रश्नांचे उत्तर द्यायला ते बांधलेले नव्हते. कारण असो-नसो. मारायच-ठोकायची वृत्ती अनेकांच्यात बघता बघता जागृत होते.

'कोणाला मारायचं आहे ?' त्यातल्याच एका तरुणाला घट्ट पकडून नृसिंहलालने विचारले. तो माणूस नृसिंहलालला ओळखत असावासे दिसले. गुंडांना काहीही कारण नसताना मारामारी करण्यात मजा वाटणाऱ्या वर्गाला– पोलिसांची फार चांगली ओळख असते. त्या माणसाने नृसिंहलालला सलाम ठोकीत म्हटले,

'साहेब, कोणी लुच्चा माणूस दिसतोय.'

'छट्. कोणाचा तरी खिसा कापलाय. खिसेकापू दिसतोय.' दुसऱ्या एका बघ्याने त्या गुंडाचे म्हणणे खोडून काढले. लुच्चा आणि खिसेकापू ह्या दोन वेगवेगळ्या व्यक्ती असतात, असे त्या वर्गीकरणप्रिय बघ्याला वाटले.

त्या तीन गुंडांनी लोकांना धक्के मारून साहेबांच्यासाठी जागा करायला सुरुवात केली. अतिशय कोलाहल माजला होता. प्रत्येकजण काहीतरी बोलत होता. कोणी हसत होता. कोणी ओरडत होता, कोणी धक्काबुक्की करीत पुढे सरकत होता, तर कोणी धक्के मारीत बाहेर पडायला बघत होता. त्या गर्दीत घुसलेले नृसिंहलाल आणि रंजन यांना पाहाताच समोरच्या बाजूला बंदोबस्त ठेवणारे शिपाई एकदम हुश्शार बनले.

'चला, चला मेहरबान, चालू लागा.' शिपाई मोठमोठ्याने ओरडू लागले. जमावाला तिथून निघून जायला ते मोठ्या सौजन्याने सांगत होते खरे, पण प्रत्यक्षात इतक्या जोरात धक्के मारीत होते की, त्यात कुठेही सभ्यता जाणवत नव्हती. जमा झालेली गर्दीही या वागणुकीला अगदीच अपात्र होती, असे म्हणता येणार नाही. कारण एका जागेवर धक्का खाल्ला की गर्दी दुसरीकडे वळे. असे इकडून तिकडे तिकडून इकडे जायचे कारण काय हेच गर्दीला नक्की माहीत नव्हते.

तेवढ्यात नृसिंहलालला आडव्या आलेल्या एका माणसाने माहिती पुरवली, 'त्यांनी

एका धेडाला (महाराला) मारलं.'

लोकांना पहिल्यांदा वाटले होते की गारुड्याचा खेळ आहे. मग गारुड्याचा चोर झाला, चोराचा लुच्चा आणि लुच्च्याचा खिसेकापू झाला. आतापर्यंतची ही मालिका सामान्याला पटेल अशीच होती. परंतु खिसेकापूतून धेड कसा बाहेर आला हे समजणे जरा अवघडच होते.

नृसिंहलाल आता गर्दीच्या भर मध्यावर पोचला होता. अरुण चौदा-पंधरा वर्षांच्या एका मुलाला धरून उभा होता. त्या मुलाला मारायला धावणाऱ्या दोन माणसांना त्याने अडवून धरले होते. आणि त्यांच्याशी तो मोठमोठ्याने वाद घालीत होता. त्याने आपला राग आवरून धरला आहे हे त्याच्या चेहऱ्यावरून स्पष्ट दिसत होते. त्या मुलाच्या चेहऱ्यावर राग मावत नव्हता. तो रडत होता आणि रडता रडताच काही बडबडत होता. पण त्याला धड बोलताही येत नव्हते. जवळच बसलेल्या एका म्हाताऱ्याकडे तो सारखा हात दाखवीत होता.

गुंड आणि शिपाई यांनी मिळून साहेबांच्या आजूबाजूची जागा रिकामी केली. नृसिंहलाला आणि रंजन जिथे जिथे जात तिथे तिथे लोकमतेचा प्रभाव मान्य करीत. त्या मुलाला मारायला धावणाऱ्या दोन माणसांचे बोलणे ऐकायचे प्रयत्न करणाऱ्या नृसिंहलालला भाषेतले जास्तीत जास्त प्रभावी शब्द ऐकायला मिळाले. शरीरात जसे बळ तशा भाषेत शिव्या. शिव्यांचे आपल्या जीवनातले महत्त्व विसरणे अशक्य आहे.

'साला धेड, हरामखोर! मला शिवतो, मला विटाळ करतो आणि परत समोर उभा राहातो. चामडीच लोळवीन त्याची!' एक माणूस ओरडत होता. आता त्याच्या संतापाचे कारण आपल्याला बरोबर कळले हे पटवण्यासाठी नृसिंहलालने खेकसून हुकूम साडला, 'चला, या सगळ्याना हटवा इथून.'

दोन्ही शिपाई आणि ते तीन गुंड यांनी मिळून लोकांना हाकलून दिले. मवाल्यांनी धक्काबुक्की करायची आपली हौस फेडून घेतली. त्यांनी कित्येकांना चापटचा मारल्या, काहींना ठोसे दिले, काहीजणांना कोपरे मारली. पोलिसांनी हाकलून द्यायचे अगदी मनावरच घेतलेले पाहून लोकही चिमण्यासारखे उडून गेले. बघता-बघता त्या पाच माणसांनी तीनशे लोकांना उधळून लावले.

अरुण गर्दीत शिरला, तो कसलीही पूसतपास न करता सरळ जिथे मारामारी चालली होती, तिथे जाऊन पोचला. तिथे दोन माणसे एका मुलाला फटाफट चापटचा आणि ठोण मारताना त्याला दिसली. त्या लहान बालकासारख्या मुलाला मार सहन झाला

नाही. आणि भान विसरून तो ताडकन उठून त्यांच्यासमोर उभा राहिला. परिणामाची पर्वा न करता त्याने सरळ मारणाराचा हात पकडला आणि त्या हाताला तो कडकडून चावला. त्या चाव्यामुळे झालेली वेदना सहन होईना तेव्हा त्या माणसाने ओरडायला सुरुवात केली. आणि त्याचा हात त्या पोराने सोडावा म्हणून त्या पोराला दुसरा माणूस आणखी जोरजोरात मारू लागला. त्याच वेळी अरुण आत शिरून मध्ये पडला. सगळी ताकद एकवटून त्याने दोघांना सोडवले. एवढ्या छोट्या मुलाला वेतालपणे मारहाण करणाऱ्या त्या दोन क्रूर राक्षसांची डोकी धरून दगडावर आपटावीत असा मोह क्षणभर अरुणला झाला. सगाशीच घेतलेली शपथ जर त्याला अचानक आठवली नसती तर त्याने निश्तिच मनातला विचार प्रत्यक्षात आणून स्वत: आनंद मिळवला असता.

त्याने मनाला सावध करून त्याला आवर घातला. मुलाला सोडवून त्याने आपल्याजवळ घेतले, एका हाताने त्याला धरून ठेवले. रागाने लाल झालेल्या त्या दोन माणसांना त्या मुलाला सोडवणाऱ्या या नव्या माणसालाही झोडून काढायची इच्छा झाली. मुलाला त्याच्याकडून ओढून घेण्यासाठी त्यांनी अरुणवर हल्ला केला. परंतु अरुणने त्यांना थोपवले. राग आल्याशिवाय मार द्यायची ताकद येत नाही खरी. परंतु राग येऊ न देता मार खाता येतो हे मात्र अरुणने आजच प्रथम अनुभवले. दोघांही माणसांना धरून वडवून पिटाळून लावण्याइतकी ताकद अरुणच्यात निश्चितच होती. परंतु त्या ताकदीचा त्याने आज उपयोग केला नाही. त्याने त्या मुलाला घट्ट पकडून धरले आणि त्याला मारायला धावणाऱ्या दोघांनाही थोपवले होते. त्या प्रयत्नात त्यालाही एकदोन गुद्दे, दोन-चार ठोसे खावे लागलेच. परंतु राग येऊ न देण्याचा निश्चय केलेला असल्याने त्याला तो मार इतका क्षुल्लक आणि हास्यास्पद वाटला की त्याच्या मनाचा तोल ढळला नाही. त्याला न घाबरता समोर उभा ठाकलेला पाहून ते दोघेजण थबकले. त्यांनी मारणे थांबवले आणि शिव्यांचा आश्रय घेतला. राग न येऊ देण्याचा अहिंसेचा हा पहिलाच अनुभव अरुणला मोठा नवलाईचा वाटला.

तेवढ्यात रंजन आणि नृसिंहलालनी अरुणला पाहिले. त्या शिव्या देणाऱ्यानी माणसाचे बोलणे नीट ऐकता यावे म्हणून नृसिंहलालने सगळ्या जमावाला हटवले आणि मोठ्या आवाजात विचारले, 'काय रे ए भामट्या, शिव्या कशाला देतोस ? प्यायलाय-बियलायस की काय ?'

नृसिंहलालच्या पोषाखावरून त्याचा अधिकार स्पष्ट होत होता. त्यामुळेच ती दोन्ही माणसे घाबरली. शिव्या देता देताच एकाने उत्तर दिले.

'अहो साहेब, आम्ही ब्राह्मण आहोत, ब्राह्मण !'

आपल्यावर दारू प्याल्याची नसती तोहमत येऊ नये म्हणून त्यांनी आपले ब्राह्मणत्व जाहीर करून टाकले. ब्राह्मण कधीच 'प्यालेले' नसतात हा समज खोटा ठरण्यास। रखे प्रयत्न ब्राह्मणांकडून अनेकवार होत असतात. तरीसुद्धा जग स्वतःची धारणा सोडत नाही. ब्राह्मणांनी निर्व्यसनी असावे अशीच जगाची इच्छा असते.

'ब्राह्मण असाल तर भीक मागा.' पोलिसांच्या जिभेवर शिव्यांचे भांडार भरलेले असते, नृसिंहलालसारखा सुधारलेला आणि पोलीसखात्यात राहूनही चांगला समजला जाणारा अधिकारीसुद्धा आपल्याला वाटेल तेव्हा या अपशब्दांचे भांडार उघडे करू शकतो. त्याने ब्राह्मणांना त्यांचा धर्म दाखवला. आणि त्याची मुदर भाषा पुढे बोलू लागली.

'अशी मवाल्यांसारखी भर रस्त्यात मारामारी कशाला करता ?'

'हा धेड का शिवला आम्हाला ?' धेड शिवला हे कारण मारामारी करायला पुरेसे आहे असे त्या ब्राह्मणाचे म्हणणे होते.

'इतका रुबाब आहे तर घरी जाऊन आंघोळ करा. अशी रस्त्यात कशाला हुल्लड माजवताय ? तुम्हाला अटकेत टाकावं लागेल.'

अटकेची भीती भयंकर असते. अटकेचे भय टाळायचे असेल तर अटकेची सवय करायला पाहिजे. घाबरून जाऊन तो ब्राह्मण म्हणाला, 'साहेब, आमची काहीच चूक नव्हती बघा साहेब, एक तर हाच आम्हाला शिवला, आम्हाला विटाळ केला. आणि आम्ही सांगायला गेलो तर तोच आमच्या हाताला चावला. धेडाचा हा अपराध लहान आहे का ?'

'कुठे आहे तो धेड ?' फिर्यादी आणि आरोपी या दोघांनाही मुळीच पक्षपात न करता शिव्या देण्याची सवय लागलेल्या नृसिंहलालने धेडाचीही खबर घ्यायचे ठरवले. अरुणने हातात घट्ट धरून ठेवलेल्या, हुंदके देणाऱ्या त्या पोराकडे त्या दोन ब्राह्मणांनी बोट दाखवले. नृसिंहलाल विचारात पडला. मुलाचा पोशाख पांढराशुभ्र काही नव्हता. परंतु अस्पृश्य वर्गाची वैशिष्ट्ये दाखवणारी कोणतीच निशाणी त्याच्या पोशाखात नव्हती. अस्पृश्य जमातीतसुद्धा अत्यंत सुंदर स्त्रिया, पुरुष आणि मुले कोणी पाहिली नव्हती थोडीच ? तरीही स्वच्छतेचा अभाव, कपडे आणि राहाणीतील गलिच्छपणा, हलकेपणाबद्दलची जन्मसिद्ध जाणीव यामुळे अस्पृश्य जातीला सहज अळखता येते. तरीसुद्धा अत्यंत स्वच्छ चेहऱ्याचे अनेक अस्पृश्य आजही पाहाणाऱ्याला दिसू शकतात.

'काय रे ए पोरा ? काय झालं ?' त्या रडणाऱ्या मुलाला नृसिंहलालने विचारले.

मुलगा रागावला होता आणि रडतही होता. तो धड बोलूही शकत नव्हता. तसाच अडखळत तो मांगू लागला, 'माझ्या . . . माझ्या आजाला . . . त्यांनी पाडलं . . . मला मारलं . . . . मी त्यांना . . . मुद्दाम . . . कुठे शिवलो ?'

'हरामखोर ! खोटं बोलतोस ? मला तू मुद्दाम शिवलास आणि मागायला गेलो तर चावलास ! पाहा साहेब !' आपला दुसरा हात नृसिंहलालला दाखवत तो वीर म्हणाला.

'कुठे आहे तुझा आजा ? नृसिंहलालने त्या मुलाला विचारले.

'हा मी इथं आहे, मायबाप. पोराची चूक झाली असेल तर त्याच्यावतीने मी पाया पडतो यांच्या. लहान आहे. त्याला काय समजतंय ?' आतापर्यंत रस्त्यावर बसून राहिलेला एक म्हातारा काठीच्या आधाराने जागचा उठत म्हणाला. नृसिंहलालने त्याच्याकडे पाहिले. त्या म्हाताऱ्याला डोळ्यांनी दिसत नव्हते.

'अरे. हा तर धना भगत ! अरे, तुला लागलं-बिगलं तर नाही ना ?' नृसिंहलाल त्या म्हाताऱ्याला ओळखून म्हणाला.

'काही नाही मायबाप. लागल असलं तरी होईल बरं. पण माझ्या या पोराला मात्र ढोरागत मारलं यांनी. आमची जात हलकी पडली मायबाप ! आम्हाला मार खायची सवय पडलीय. काही नाही.' धना भगत बोलून गेला. आपल्याला लागले त्यापेक्षा आपल्या या लहान पोराला मार बसला याचे त्याच्या मनाला जास्त दुःख झाले होते.

'तुला फिर्याद करायचीय ?' नृसिंहलालने विचारले.

'नाही हो साहेब, मुळीचं नाही. आम्ही गरीब कसली फिर्याद करणार ? या रावसाहेबांचा असा समज झाला, तेव्हा खाल्ल्या दोन चापटया, त्यात काय ? ईश्वरा सगळ्यांचं भलं कर ! माझी कसली आलीय फिर्याद !'

'चला, चालते व्हा इथून. या म्हाताऱ्या सूरदासाला त्रास देताना लाज वाटली नाही तुम्हाला ?' त्या अस्पृश्याच्या स्पर्शामुळे ओवळया झालेल्या ब्राह्मणावर नृसिंहलाल खेकसला.

'चला, चालते व्हा !' एक पोलीस शिपाई जोरात ओरडला.

'आरं जा ना.' एक गुंड शिपायांच्या मदतीला धावला. जुगारात किंवा मारामारीत एखाद्या दिवशी कधी पकडलो गेलो तर डेप्युटीसाहेब आपल्यावर मेहरबानी करतील या आशेने सगाचपासून त्यांची खुषामत करणारे ते गुंड साहेबांचा प्रत्येक शब्द झेलायला तयार होते.

दोघेही ब्राह्मण तिथून निघून गेले.

अरुण त्या म्हाताऱ्याचे बोलणे ऐकून आश्चर्यचकित झाला होता. स्वतःला मारणाऱ्याचे पण हित चिंतणारा हा धेड खरा ब्राह्मण की निव्वळ स्पर्शामुळे अपवित्र झालो असे मानून एका आंधळ्या म्हाताऱ्याला आणि एका लहान पोराला मरेस्तोवर मारणारे ब्राह्मण अस्सल ब्राह्मण ?'

'बेटा, गप्प रहा आता. आता यापुढे ऐकायचं जास्त. आपल्याला शिवले की ओवळे होतात त्यांना आपण कशाला शिवायचं ? ते त्यांच्या रस्त्यानं, आपण आपल्या ! चल, घे ती काठी.' धना भगतने आपली काठी उचलली. त्या काठीचे दुसरे टोक धरून तो लहान मुलगा त्याला घेऊन जात असे.

'मुला, तुझं नाव काय ?' रंजनने विचारले.

'माझं नाव किसन.' मुलगा उत्तरला.

'हे घे, थोडे पैसे.' पाच रुपयाची नोट त्याला देत रंजन म्हणाली. मुलाने हात तर पुढे केलाच नाही, आपल्या आजोबांची काठी धरली. आणि तो रंजनला म्हणाला, 'नाही माय ! आम्ही काय भिकारी नाही.'

रंजन ऐकतच राहिली. अस्पृश्य मानल्या जाणाऱ्या जातीतसुद्धा स्वाभिमान होता तर. आणि अशा अस्पृश्यांना शिवायचे नाही ?

धना भगतला धरून किसन पुढे जाऊ लागला.

'भगवन्ता, माझ्या देवा, सगळ्यांचं चांगलं कर रे ओश्वरा.' चालता चालता धना भगत प्रार्थना करीत होता. त्याच्या मनातले दुःख, कष्ट आता नाहीसे झाले होते. आपल्या नातवाला मारणाऱ्या ब्राह्मणांच्याबद्दल क्षणभरच त्याच्या मनात कटुता निर्माण झाली होती. ती नाहीशी करण्यासाठी तो स्वतःलाच उद्देशून चालता चालता गाऊ लागला.

नाही तू वैष्णव ! नाही तू हरिजन !
व्यर्थ करिसी रे गुमान...
पाहून हरिजन हृदय न हरखे
हरिगुण गाणे ज्याला न रुचले
मन वैभवातुनि न निघाले
रागाने डोळे भरले !! नाही तू वैष्णव...
संगे तव कोणी वैष्णव बनला
तर तू खराच वैष्णव
संगे तव कोणी रंगू न शकला

नोवरी तूही खोटा ।। नाही तू वैष्णव . . .
पाहुनी परदुःख हृदय न पोळे
परनिंदा करिता भीती न वाटे
प्रेम नमता विठ्ठला काय खरे.
हट्ट धरी अहंकारे ।।
नाही तू वैष्णव . . .

(कवी – दयाराम)

रंजनला सुशीलेच्या घरी पोचवेपर्यंत अरुणच्या कानावर धना भगतचे हळूहळू अस्पष्ट होत जाणारे भजन ऐकू येत होते. नंतर नृसिंहलाल आणि अरुण मोटारीत बसून तिथून निघाले. अरुण धना भगतने केलेल्या वैष्णवाच्या व्याख्येवर विचार करीत होता.

मध्येच नृसिंहलाल म्हणाला,

'हे धेड लोकपण भारी मस्तवाल झालेत. दुसऱ्यांना शिवायचं त्यांना काय कारण पडलंय ?'

स्पृश्यास्पृश्यतेची भावना आपल्या हृदयात इतकी खोलवर रुजून बसली आहे की अस्पृश्यता ही अनैसर्गिक आहे असे मानले तरी अस्पृश्याचा स्पर्श झाला तरी आपल्याला कमीपणाच होतो. नोकरीच्या निमित्ताने नृसिंहलालच्या स्पृश्यास्पृश्यतेच्या, पावित्र्याच्या भावना फार कमी झाल्या होत्या. तरीपण एका अस्पृश्याने इतरांना शिवायचा प्रयत्न करावा, माणसा-माणसात ममता स्थापन करण्याचा प्रयत्न करावा, हे त्याच्या दृष्टीने मर्यादेचे उल्लंघन होते.

अरुणने स्मित केले. त्याच्या कानात अजूनही धना भगतचे शब्द घुमत होते.

'संगे तव कोणी वैष्णव बनला
तर तू खराच वैष्णव
संगे तव कोणी रंगू न शकला
नोवरी तू ही खोटा '

आचारातील लहानशा तपशिलातही पावित्र्य निर्माण करण्याचा प्रयत्न करणारे ब्राह्मण आणि वैष्णव, आचरणातील तपशिलांची एक अभेद्य भिंत उभी करतात. यात त्यांची काही चूक नाही का ? जिथे एकमेकांच्या संगतीत रंगून जायचे तिथेच देहा-देहाला वेगवेगळे करून अलग करण्यात आले तर कसे रंगून जाता येईल ? दिवसातून शंभर वेळा आंघोळ करणारा सभ्य आणि मारणाऱ्यांचेही भले चिंतिणारा धना भगत यांच्यातला श्रेष्ठ वैष्णव कोण ?

## 13. प्रवाहांचा प्रथम संघर्ष

**संध्यासमयी वस्त्र पृथ्वीचे फाडुनी**
**अंधाराची माला विखरून पडे त्यातुनी**
**सरोवराचे तट तद्वत फोडुनी**
**तुफान उसळे उधाणलेले पाणी !**

**—न्हानालाल**

रंजन सुशीलेजवळ गेली तेव्हा सुशीला रडत होती. पुष्पा तिच्याजवळ बसली होती. रंजनला येताना पाहून सुशीला डोळे पुसू लागली. डोळे पुसत असताना सुशीलच्या कपाळाला लावलेले गोपीचंदनही पुसले जाऊ लागले. एका खाटेवर काश्मिरी भरतकाम केलेली लोकरीची चादर पसरून सुशीला त्याच्यावर बसली होती. तिच्याजवळ तीनचार पुस्तके होती. जवळच पूजेचे सामानही होते.

तिच्यासमोर एका पाटावर पुष्पा बसली होती. रंजन जाऊन पुष्पाच्या शेजारी तिच्याच पाटावर तिला चिकटून बसली. असे एवढयाशा जागेत बसणे स्त्रियांनाच जमते. पुष्पा आणि रंजन जवळजवळ एकाच वयाच्या. दोघींची मैत्रीही खूप दाट होती. रंजनने हळूच पुष्पाचा पाय दाबला आणि तिला खुणेनेच सुशीलेच्या रडण्याचे कारण विचारले.

'त्या धना भगतला आणि किसनला लोकांनी मारलं ना, ते पाहून ताई केव्हापासून रडत बसलीय.' पुष्पाने सांगितले. समोरच्या खिडकीतून रस्त्यावरचे सगळे दिसत होते. पुष्पाचे शब्द ऐकून सुशीलेचे डोळे पुन्हा भरून आले. स्फुंदत स्फुंदत सुशीला म्हणाली, 'मेले लोक राक्षसच आहेत ! भगतला डोळयांनी दिसत नाही तरी त्याला मारलं. आणि तो बिचारा फुलासारखा किसन.' सुशीलेला पुढे बोलवेना.

'बाई, तू कुठून त्या गर्दीत आलीस ? तू पण अगदी भारी आहेस' पुष्पा रंजनला

म्हणाली.

'मी इकडे आले नसते तर ती मारामारी थांबलीच नसती मुळी.' रंजन म्हणाली.

'तू कुठून सगळ्यांना घेऊन आलीस ? त्यातला एक तर पोलीस अधिकारी होता. कधीकधी आपल्या घरीही आलेला पाहिलाय मी. पण मग तो दुसरा माणूस कोण होता ? कोणी कॉलेज-युवक होता की काय ? तो नसता तर मात्र त्या किसनला सगळ्यांनी मिळून बडवलं असतं.' सुशीला आता जरा शांत झाली होती.

'तेच ते अरुणभाई. मी तुला त्यांच्याबद्दल दोन-तीनदा सांगितलं नव्हतं का ? पुष्पाने मोठ्या उत्साहाने अरुणबद्दल माहिती पुरवली. पण पुष्पाचा हा उत्साह सुशीलेला मुळीच आवडला नाही. बिनओळखीच्या तरुणांच्या सहवासात तरुणींनी वारंवार आलेले मुळीच योग्य नाही असे सुशीलेचे स्पष्ट मत बनले होते. मध्यम आणि उच्च वर्गातील मुलींना शाळेत पाठवावे लागते. शाळेच्या बाबतची मोकळीक पसंत नसली तरी सहन करावी लागते, आणि शिक्षणातील दोष काढीत-काढीत शिक्षण द्यावेच लागे. पोरी वहकतात. घरात टिकत नाहीत. चापून चोपून कपडे करायला शिकतात. मोठ्यांचा मान राखत नाहीत अशा तक्रारी करूनसुद्धा आई-वडील आता मुलींना शिकायला पाठवू लागले आहेत. आणि शिक्षणावर टीका केली तरीसुद्धा आपली मुलगी इंग्रजी वाचते, चांगली चित्रे काढते, चागले भरतकाम करते किंवा गरबा उत्तम नाचते, याबद्दल तिच्या आईला आनद झाल्यावाचून राहात नाही.

अशा दोन विरोधी विचारांच्या ओढाताणीत सुशीलाने आपली धाकटी सावत्र बहीण पुष्पाला शिकवले होते. रंजन आणि पुष्पाची शाळेपासूनची मैत्री होती. रंजनचे वडील आणि सुशीला-पुष्पाचे वडील हे दोघेही शहरातील श्रीमंत गणले जात. आणि दोघांचीही परस्परांशी चांगली ओळख होती. सुशीलेचे वडील कर्मठ धार्मिक वृत्तीचे होते; तर रंजनचे वडील एकदम सुधारक मताचे होते. त्यामुळे दोघांच्या राहाण्या-वागण्यात खूपच तफावत होती. पुष्पा जसजशी मोठी होत होती तसतसे तिला शाळेतून काढून टाकायचे बेत रोजच केले जात होते. तरीसुद्धा सुशीलेने तिला पुढे शिकू दिले होते. त्याबरोबर पुष्पा आणि रंजनची मैत्रीही वाढत होती. मात्र रंजनइतकी हिंडा-फिरायची मोकळीक पुष्पाला नव्हती. तरीसुद्धा रंजनच्या संगतीचे थोडेफार गुण पुष्पाला लागल्याशिवाय राहिले नाहीत. पुष्पाला सगळ्याच सभा-मेळाव्यांना जायची परवानगी नव्हती. तरीही आपल्या ताईला कधी समजावून, कधी विनवून, तिच्यावर

थोडे रुसल्याचे नाटक करून पुष्पा अनेकदा तिच्याकडून सभा-मेळाव्यांना जायची परवानगी मिळवी. रंजनबरोबर सगळीकडेच फिरायची पुष्पाला परवानगी नसे. परंतु रंजनला आपल्या घरी आणायची आणि स्वत: रंजनकडे जायची पूर्ण परवानगी तिला सुशीलेने दिली होती.

सुशीलेलाही रंजनबद्दल प्रेम वाटे. रंजन भारी बोलकी, हसरी आणि मनमोकळी मुलगी होती. स्वतंत्र वातावरणात ती वाढली होती, आणि तरीसुद्धा त्या वातावरणातील भयानक दोषांपासून ती दूर असावी असे सुशीलेला तिच्या मोकळ्या स्वभावामुळे वाटे. ती अनेकदा रंजनला बोलाव म्हणून स्वत:च पुष्पाला आग्रह करीत असे. रंजनला मुळीच गर्व नव्हता, हे तिच्याबाबतचे खास आकर्षण होते. ती सर्वांबरोबर मोकळेपणे मिळे-मिसळे, हास्यविनोद करी. आपल्या रंगीबेरंगी पोशाखामुळे आणि विनोदी स्वभावामुळे ती सर्वांना भारी आवडत असे. तरुणांबरोबर वावरतानाही तिला संकोच वाटत नसे, हे सुशीलेला ठाऊक होते. त्याचा पुढे वाईट परिणाम होऊ शकेल हेही तिला चांगले समजत होते. आणि म्हणूनच तिने पुष्पावर संस्कार करून आणि अनेक वेळा थोडीफार तंबी देऊनही तिला तरुणांच्या सहवासात फारसे जाऊ दिले नव्हते. सुशीलेच्या कडक आणि चांगल्या शिकवणुकीमुळे पुष्पा थोडी अबोल, गंभीर, मानी आणि हातचे राखणारी बनली होती. पण एकदा का रंजन भेटली की, तिचे मन सगळी बंधने झुगारून देत असे.

पुष्पाला चित्रकलेचा भारी नाद होता. शाळेत असताना चित्रकला शिकायची तिला संधीही मिळाली होती. संगीत शिकणे म्हणजे स्वच्छंदी बनणे ही जुनी समजूत आता नाहीशी झाली आहे. सतार किंवा दिलरुबा वाजवणारी तरुणी आता सर्वांनाच आवडते. परंतु आपली पत्नी किंवा मुलगी यांनी संगीत शिकावे, याबद्दल मात्र लोक अजूनही जरा उदासीनच आहेत. म्हणूनच सुशीलेने पुष्पाच्या संगीताच्या छंदाला फारसे प्रोत्साहन दिले नाही. पण पुष्पाच्या कलासक्त मनाने संगीताऐवजी चित्रकलेचा आधार घेतला. भावनांचा मधुर आविष्कार जसा संगीतात होऊ शकतो तसाच तो चित्रकलेतही साध्य करता येतो. परंतु संगीतातील मनोरम धूसरता चित्रकलेत चालत नाही. चित्रकलेला सर्व रूपे स्पष्ट लागतात, तशीच ती निर्माणही करते. पुष्पाच्या मनात जेव्हा मूर्ती उभ्या राहात तेव्हा रंजनचे हृदय संगीताच्या रुपेरी चांदण्यात तरंगत असे. म्हणूनच पुष्पाला तरुणांपासून लांब ठेवले गेले तरी तिच्या मनात तरुणांची रंगीबेरंगी काल्पनिक चित्रे काही कमी चितारली गेली नव्हती.

जनार्दनचे कृष्णकान्तच्या घरी येणे-जाणे कमीच होते. गिरणी-मजुरांची चळवळ आणि इतर सामाजिक कार्याच्या निमित्ताने त्यांची ओळख वाढली होती. कृष्णकान्त एकदा साहेब बनला होता खरा. पण त्याचा सालस स्वभाव जनार्दनला फार आवडला होता. जनार्दनच्या आश्रमाला कृष्णकान्त थोडीफार आर्थिक मदत करतो असेही लोक म्हणत. साहेबी कृष्णकान्त आणि जनार्दन यांचा हा परिचय अजून लोकांना, आणि विशेष करून कृष्णकान्ताच्या युरोपियन मित्रांना फारसा ठाऊक झाला नव्हता. मजुरांना चिथावणारा एक चळवळ्या आणि एक गिरणीमालक यांच्यामध्ये असू शकतो तेवढाच संबंध या दोघांच्यात आहे, असेच सर्वांना वाटत होते.

या ओळखीतूनच जनार्दनची रंजन आणि पुष्पा यांच्याशी ओळख झाली होती. रंजन आणि पुष्पा यांच्या चित्रकलेच्या आवडीचा फायदा जनार्दन स्वतःच्या कार्यासाठी करून घेत होता का कोण जाणे, परंतु पुष्पाने आश्रमाशी जोडलेल्या संबंधाविरुद्ध मात्र सुशीलेने कधीही आक्षेप घेतला नाही. कदाचित तिला तो आश्रम म्हणजे एक धार्मिक संस्था वाटली असावी !

मात्र तिथेही पुष्पा वारंवार जाऊ शकत नव्हती. इतर संस्था किंवा सभांना जायला सुशीला पुष्पाला जेवढा कडक विरोध करी तेवढा कडक विरोध ती पुष्पाला आश्रमात जाण्याला करीत नसे. तिथेच पुष्पाची अरुणशी ओळख झाली होती. त्याबद्दल जेव्हा एक-दोनदा पुष्पाने सुशीलेला सांगितले तेव्हा सुशीलेने तिला मुळीच उत्तेजन दिले नाही. एकदा अरुणला आपल्या घरी बोलावण्यासाठी बहिणीची परवानगी पुष्पाने मागितली, तर तीही सुशीलेने तिला दिली नाही.

आजचा अरुण तो हाच अशी आता सुशीलेला ओळख पटली. अरुणची माहिती सांगताना पुष्पा फार उत्साहाने बोलत आहे असे सुशीलेला जाणवले. मुलींची ही सवय तिला मुळीच पसत नव्हती. यातूनच अनर्थ उद्‌भवतात असे तिचे मत होते. तिला पुष्पाचा अरुणबद्दलचा उत्साह आवडला नाही खरा. परंतु तिला स्वतःलाच अरुणबद्दल एक अनाकलनीय आपुलकी वाटत असल्याचे जाणवत होते. त्यानेच धना भगत आणि त्याच्या किसनला सोडवले होते. मुलगा नक्कीच चांगला असला पाहिजे !

'तू त्या अरुणला इथे घेऊन यायला हवं होतंस ' सुशीलेने दोष दिला.

आपली अशीच एक मागणी यापूर्वी सुशीलेने धुडकावली होती, ह्याची आठवण पुष्पाने तिला दिली नाही. मात्र ही संधी साधून पुढेमागे अरुणला बोलवायची परवानगी तिने मिळवून ठेवली.

'तुला चालत असेल तर एक दिवस आपण अरुणभाईला बोलवू. काय ग रंजन?' पुष्पाने रंजनची संमती घेतली.

'ते इथून गेले असते तर नसते येऊ शकले. पण आता एक वर्षभर ते इथेच राहाणार आहेत. तेव्हा आता वाटेल तेव्हा येऊ शकतील ते.' रंजन म्हणाली.

सुशीलेने आपली पोथी वाचायला सुरुवात केली. पुष्पा आणि रंजन थोडा वेळ तिथेच बसून राहिल्या.

## 14. धेडवाडा

**घेऊन बऱ्या-वाइटाला**
**गंगा आपली वाहतेच आहे !**

**—कलापी**

'अरुण, ह्यातलं काहीच तू मला सांगितलं नाहीस ! तू पोलिसांना काय काय सांगितलंस हे ऐकण्यापेक्षाही तू त्या गर्दीत आणि पोलीस ठाण्यावरही अहिंसा पाळलीस हेच जास्त महत्त्वाचं आहे, माझ्या दृष्टीनं.'

नृसिंहलालबरोबर जाताना वाटेत उच्चवर्णीय हिंदू जमाव धना भगत आणि किसन यांना मारीत होता, ही हकीकत अरुणने जनार्दनला दोन-चार दिवसांनंतर सांगितली. राग येण्यासारख्या घटना घडूनही आपण आपला राग दाबून शांत राहिलो, आणि त्यामुळे आपल्याला अवर्णनीय अशी मानसिक शांतता कशी अनुभवता आली, याचे प्रामाणिक वर्णन अरुणने जनार्दनजवळ केले. ते ऐकून जनार्दनने अरुणला वरील वाक्य ऐकवले होते.

'आपल्याला मारणारांचंही भलं इच्छिणाऱ्या धना भगतला पाहून तर मला त्या अस्पृश्याला गुरूच करावंसं वाटू लागलं आहे.' अरुणने सांगितले.

'तुझ्या गुरूला आपल्या मिरवणुकीच्या आघाडीवरच ठेवू या ना.' जनार्दन हसत हसत म्हणाला.

'पण तो बिचारा आंधळा आहे.'

'तू चालव त्याला.'

'पण तो कसा तयार होईल याला ? त्याला राजकीय विषयात गम्य असेल तरी का ?'

'मी भगतला ओळखतो. तू यायच्या आधी मी मधून-मधून धेडवाड्यात जात

होतो. तेव्हा त्याची भजनं ऐकलीत मी. अस्पृश्यांच्या सुधारणेबाबत मी त्याच्याशी चर्चाही केली होती. परंतु तो त्याच्या भक्तीत गढून गेलेला असतो. त्याला दुसऱ्या कशाचीच आवड नाही. आणि समजा, त्याला आवड असली तरी डोळ्यांनी लाचार असलेल्या त्या बिचाऱ्याला आपण कसं काय पुढे करू शकू ?' जनार्दनच्या मनातील राजकीय कप्प्याला अशा अंध, म्हाताऱ्या, अस्पृश्याला मिरवणुकीच्या आघाडीवर ठेवून लोकांना आपल्या चळवळीकडे खेचून घेण्याचा मोह पडत होता, तर त्याचे प्रामाणिक मन असे करू नये असे सांगत होते.

'आपली ही मिरवणूक पोलीस नक्कीच अडवणार, अरुण. आज मला कलेक्टरांनी बोलावलं होतं. आपल्या मिरवणुकीबद्दल आपण आपल्या पत्रकातून लिहिलंच आहे. म्हणून मला त्यांनी धमकी दिली. पोलिसांना बळाचा वापर करण्याचा अधिकार आहे. ते धक्काबुक्की करतील, लाठीमार करतील, किंवा गोळ्याही चालवतील. या सर्व प्रसंगी आपण अहिंसा राखली तरच तो आपला विजय ठरेल. अहिंसेमुळे गर्दीच्या मानसशास्त्रात—मॉब सायकॉलॉजी— फार अद्‌भुत फरक पडत असतो.'

'आपण सगळ्यांनाच सावध केलं पाहिजे. विमोचनने तर या मिरवणुकीची टिंगल उडवणारे लेख लिहायला सुरुवात केली आहे.'

'त्याची इच्छा. आपण हसून उडवून देण्याजोगा हा प्रसंग नाही. निर्माल्य म्हणून आतापर्यंत अनेकांनी धना भगतची टर उडवली आहे. पण तो जर निर्माल्य असता तर त्यानं तिघांना शिव्या दिल्या असत्या. परंतु मारणाराला आशीर्वाद देणाऱ्याचं मानसिक सामर्थ्य आपणा सर्वांपेक्षा जास्त असतं.'

'आज जाऊ या ? आपण भगतला घेऊन येऊ. मला त्याला पुन्हा भेटायची इच्छा आहे. त्या मुलाचंही कसं आहे ते पाहायला हवं.'

'आज दुसरं काहीच काम नाही. चल, जायचंय तर.'

दोघेही धना भगतकडे जायला निघाले. बाकीचे आश्रमवासीय आपापल्या कामात गर्क होते. वेगवेगळ्या वेळी वेगवेगळे कपडे घालायची सवय त्यांना नव्हतीच. दोघेही आश्रमाच्या दरवाजाबाहेर पडले. तेवढ्यात समोरून रंजन आणि पुष्पा एका मोटारी-तून आल्या.

'कुठेही जा, रंजन आपल्याला सामोरी येणारच !' जनार्दन हसतच म्हणाला. अरुण काहीच बोलला नाही. मोटार थांबली.

'कुठं चाललात ?' रंजनने विचारले.

'जिथं चाललो आहोत तिथं यशच येणार आम्हाला. फार चांगला शकुन झाला ना.'

जनार्दन म्हणाला.

'कशावरून ?'

'समोरच दोन कुमारिका भेटल्या, आता आणखी काय पाहिजे ?'

तरुण मनाचे शुद्ध भाव आणि त्याचे निरागस प्रेम ज्याच्या दृष्टीला पडते त्यांना ते पवित्र बनवते. हेच मन सगळ्यात जास्त उपभोग देऊ शकते. मनात हा कौमार्याचा उदार अंश नसेल तर लग्नाचे साहस कसे केले जाईल ?

'आम्ही तुला अडवायला आलो आहोत.' रंजन म्हणाली.

'कशासाठी ?'

'आम्हीसुद्धा येणार तुमच्या मिरवणुकीत. पंचवीस-तीस स्त्रिया तयार आहेत.'

'काय म्हणतेस काय ?' गरबा किंवा लग्न अशा प्रसंगीसुद्धा पुरुषांच्या आधाराशिवाय बाहेर न पडणारी गुजराथीण आता मिरवणुकीसारख्या झंझावाती राजकीय निदर्शनात स्वत: होऊन भाग घ्यायला तयार झाली ही काही साधीसुधी घटना नव्हती.

'मी खरं तेच सांगतेय. चेष्टा नाही करीत.' हे वाक्य मात्र रंजन हसत-हसत म्हणाली.

'नाही रे बाबा. या जोखमीत मी नाही तुम्हाला सामील होऊ देणार. बहुतकरून कलेक्टर ही मिरवणूक अडवतील. उगीच कोणाला काही लागलं-बिगलं तर ?'

'आम्हाला लागलं तर आम्ही आमची व्यवस्था करू. आणि तुम्हाला काही लागलं तर तुमची सेवा करायलाही आम्ही मदत करू की.'

'अं हं. हे बघ रंजन, तू या कामात पडलीस तर कृष्णकान्तला अडचणीत टाकशील. आणि पुष्पा, तुझे वडील तुला यायची परवानगी देणारच नाहीत. त्यांचा आमच्या कामावर विश्वास नाही. तेव्हा मी तुला मिरवणुकीत येऊ देणार नाही.' जनार्दनने स्वच्छ सांगून टाकले.

'मग आम्ही आमची वेगळी मिरवणूक काढू. देशाची सेवा काय फक्त पुरुषांनाच करता येते ?'

'फक्त मिरवणुका काढल्यानेच देशसेवा होते का ?'

'मग तुम्ही कशाला मिरवणुका काढता ?'

'त्यात ध्वज उभारायच्या परवानगीचे तत्त्व समाविष्ट आहे. आमचा ध्वज अहिंसेचा आहे. सरकार तो फडकवायला नकार देत असेल तर आम्ही ते कसं मान्य करणार ?'

'अगदी बरोबर. पण मग त्या तत्त्वासाठी फक्त पुरुषच का म्हणून लढा देणार ?'

'ही रंजन भारी वस्ताद मुलगी आहे बुवा. हे बघ बाई, अजून पुरुषच या लढ्या-

साठी तयार झाले नाहीत. मग स्त्रियांना कशाला घ्यायचं त्यात ?'

'पुरुषांची तयारी नसेल तर त्यांनी बाजूला व्हावं. स्त्रियांची तयारी झाली आहे. त्या त्यांना वाट दाखवतील.'

'तुझ्याबरोबर वाद घालण्यात काही अर्थ नाही. अजूनमध्ये तीन दिवस आहेत. अरुण, तू या मुलीच्यासाठी काही योजना तयार कर.'

'कुठं चाललात ? पाहिजे असेल तर मी ही गाडी पाठवते.' रंजनने सांगितले.

'आम्ही धना भगतच्या घरी चाललो आहोत. अरुणला त्याचा शिष्य व्हायचं आहे. जनार्दनने हसत सांगितले.

'कुठं राहातो तो ?' रंजनने विचारले.

'मला माहीत आहे तो कुठं राहातो ते.' पुष्पाने आता पहिल्यांदाच बोलायला तोंड उघडले. रंजन आणि जनार्दन यांच्या बोलाचालीत अरुण आणि पुष्पा दोघेही काही न बोलता एकमेकांकडे पाहात होते.

'तू आमच्याबरोबर आलीस तर नंतर तुला आंघोळ करावी लागेल हं. सुशीला-ताई तुला घरात नाही घेणार.'

रंजनने पुष्पाला तिच्या घरच्या धार्मिक वातावरणाची आठवण करून दिली.

'त्यात काय झालं ! न घेईना !'

जनार्दनला स्वतःला ते घर माहीत होते. परंतु पुष्पासारख्या कट्टर वैष्णवाच्या मुलीला एका धेडाचे घर माहीत आहे या विचारानेच जनार्दनला आश्चर्य वाटले.

अरुण मोटारीत पुढे बसला. जनार्दन पुष्पाबरोबर मागे बसला. सगळे गाव ओलांडल्यानंतर गाडी गावाच्या एका टोकाला एका गरीब मोहोल्ल्यात येऊन पोचली.

या वस्तीतील घरे लहान-लहान होती. परंतु आमोरा-समोरच्या घरांच्यामध्ये बरीच जागा होती. या जागेच्या बऱ्याच भागात सुतळीच्या लांबलचक दोरीने बांधलेल्या लाकडी तट्ट्या जमिनीत पुरल्या होत्या. घराची अंगणे स्वच्छ सारवलेली होती. उच्चवर्णीय ब्राह्मण-वाण्यांची घरे असलेल्या वस्तीमध्ये नजरेला पडणारा कचरा, जागोजाग तुंबलेले पाणी, यातले काहीही या वस्तीत दिसत नव्हते. प्रत्येक घर विटेचे, रंगवलेले होते. त्यात राहाणाऱ्यांच्या आर्थिक सुबत्तेची कल्पना येत होती. अनेक घरांच्या समोर तुळस लावलेली दिसत होती.

'हा भाग चांगला दिसतोय.' रंजन बोलून गेली. क्वचित कधी शहराच्या गल्ली-बोळातून जायचे झाले तर भलताच त्रास होत असे. म्हणूनच तिला हा भाग फार आवडला.

'इथेच राहातो धना भगत.' पुष्पाने सांगितले.

मोटार आता सावकाश जाऊ लागली. मोटारीमागे लहान-लहान मुले धावत येत होती. त्यातल्या अनेक मुलांनी अंगात काहीही घातले नव्हते. तर काहींच्या कमरेला गुंडाळलेले चिंधीवजा वस्त्र त्यांच्या गुडघ्यापर्यंतही पोचत नव्हते. काहींनी आपल्या डोक्यावर फक्त एक टोपी नाहीतर फेटा गुंडाळलेला होता. बाकी त्यांच्या अंगावर दुसरे कोणतेही वस्त्र नव्हते. त्यांची शरीरे काळी पडली होती. धुळीने भरली होती. असले दृश्य पाहिल्यावर रंजनला हसू आले नसते तरच नवल. हसता हसता तिच्या सौंदर्यदृष्टीने एवढे टिपले की, या अर्धनग्न, पूर्णनग्न मुलांच्यातल्या अनेकांचे चेहरे कुरूप तर मुळीच नव्हते. उलट त्यांना जर एक तासभर साबूच्या पाण्यात बुडवून ठेवले तर त्यांच्या शरीराचा मूळ गहूवर्ण बाहेर पडू शकेल.

'धना भगत इथे राहातो, हे तुला कसं माहीत ?' रंजनने पुष्पाला विचारले.

'मी दोन-तीनदा येऊन गेलेय इथे.' किंचित अडखळत पुष्पा म्हणाली.

'तू आली होतीस ? आणि ती कशाला ?' जनार्दनची उत्सुकता जागी झाली, आणि त्याने विचारले.

'एकदा लागोपाठ पंधरा दिवस धना भगत कुठे दिसला नाही, म्हणून चौकशी करायला मला यावं लागलं होतं. एकदा किसन खूप आजारी पडला होता. तेव्हा ताईनेच मला डॉक्टर घेऊन इथं पाठवलं होतं.'

अरुण आणि जनार्दन सगळे ऐकत होते. पुष्पाची सुशीलाताई इतकी कट्टर धार्मिक मानली जात होती, की स्वतःच्या वहिणीला ती अशा एखाद्या अस्पृश्याची खुशाली काढायला पाठवील हे रंजनलाही फार आश्चर्यकारक वाटले. जुन्या विचारांच्या, रात्रंदिवस आंघोळ करून पूजापाठ आणि देवदेव करणाऱ्या स्त्री-पुरुषांच्यातही इतकी उदारता असू शकते हे त्यांना आजपर्यंत पटले नव्हते.

वस्तीच्या अगदी टोकाला एक साधारणसे घर आले, तेव्हा पुष्पाने मोटार थांबवायला सांगितली. घरासमोर, तुळशीवृंदावनाजवळच एक मोठा मातीने सारवलेला ओटा होता. त्या ओट्यावर बसून धना भगत भजन गात होता. त्याच्या हातात एकतारी होती. त्याचे डोळे बंद होते, जगाकडे न पाहाताही मनात काहीतरी शोधीत असावेत, असे वाटत होते.

चौघेजण खाली उतरले, आणि पाय न वाजवता जाऊन ओट्यावर बसले.

# 15. देवभक्त आणि राष्ट्रभक्त

**देवा तुझ्या कृपे मुकेही बोलती**
**तुझ्याच कृपेने पंगू पर्वत चढती ।।**

**—भोलानाथ**

घुमट बांधला आभाळाचा
खाली धरती अंथरली
शून्य शिखर हे झाले आसन !
तेजोमय ज्योतीवर बसलो
तळपू लागलो जणू प्रकाशच
नजर तोकडी जरी माझी !
सागरपाणी खळबळते अन्
धुऊनि जाती पाय तुझे
माथ्यावरती मेघ वर्षती !
ओंजळीत या पाणी धरुनि
उभा मी पामर.
स्पर्श करील का चरणांना, ते पाणी माझ्या !
सूर्य चंद्र या अखंड ज्योती
दिवे लावले नभी
तारे चमकती, नवलाखाची दीपमाळ की नभी !
दिवा ठेविला लहानसा कोनाड्यात हारीने
छोटी असुनी ज्योत तयाची
देते मज आधार परी !

वनात फुलती फुले
दरवळे वास चंदनाचा
कुठे न काही रिते ठेवतो स्वामी विश्वाचा !
तुळशीची पाने घेऊनी
बसलो आळवाया तुज
कृपाप्रवाह तव वाहू दे स्वामी !

भजनाच्या तंद्रीत धना भगतला आसपासच्या जगाचे भानच उरले नव्हते. हातातली एकतारी झंकारत होती, भगतच्या आवाजात सूर मिसळत होती आणि भजनाच्या गर्भित अर्थाकडे सर्वांचे लक्ष वेधून घेत होती. धना भगतचा आवाज किंचित मोठा पण गोड होता. भक्तिभावाने ओतप्रोत भरलेली भजनाची धून ऐकली की, नास्तिकांच्या मनातसुद्धा भक्ती निर्माण होते. अगम्य परंतु माधे, तत्त्वज्ञानाने भरलेले परंतु सोपे, कोणतेही अलंकार नसूनही मनाला आल्हाद देणारे भजन म्हणजे आपली कधीही न संपणारी आध्यात्मिक कमाई आहे. ब्राह्मणांनी शूद्राला वेद शिकायची परवानगी दिली नसेल, पण आपले वेदवेदान्त हे शूद्रांनी गायलेल्या भजनात उतरलेले आढळतात. जात-पात, धंदा-व्यवसाय अशा अनेकविध कारणांमुळे हिंदु-समाजात जे भेदाभेद निर्माण झाले आहेत त्यामुळे हिंदू धर्मावर टीका केली जाते. स्वतःचे दोष पाहू शकणे यासारखा उन्नतीचा दुसरा मार्ग नाही. परंतु या सामाजिक किंवा धार्मिक भेदभावांच्या भिंती ओलांडून ज्ञान आणि भक्तीची किरणे आपल्या समाजाच्या कानाकोपऱ्यातून पोचलेली असतील तर एकतारी, टाळ आणि झांजांचा आवाज ऐकला तरी पुरे. प्रत्येक जातीत कोणी ना कोणीतरी भजनी असतो. तशी भजन मंडळीही असते. आणि शास्त्रीय संगीताबाबत अवास्तव गर्व बाळगणाऱ्या काही थोड्या उच्च जाती सोडल्या तर इतर जातीत ही भजनी मंडळे आजही जिवंत आहेत.

त्यांची ही भजने म्हणजे आपला सार्वजनिक ऐवज आहे. भजनी मंडळी अस्पृश्य असोत, कोळी असोत, पाटीदार असोत की वाणी असोत त्यांची भजने सगळ्या जातीचे लोक म्हणू शकतात. इतकेच काय पण एखाद्या मुसलमान फकीर किंवा साईंच्या तोंडूनसुद्धा ही भजने ऐकायला मिळू शकतात. अलीकडे हिंदू-मुस्लिम प्रश्नांवर ज्यांनी वाद उत्पन्न केले त्यांनी लक्षात ठेवण्यासारखी एक गोष्ट म्हणजे कबीर किंवा मीराबाई यांची अनेक भावपूर्ण आणि ज्ञानपूर्ण भजने मुसलमान फकीर नमाज पढताना मोठ्या आदराने गात असतात. अल्लख, निरंजन, इडा, पिंगळा, ध्यान, अतींद्रिय अशा गूढ परंतु समाजाच्या शेवटच्या थरापर्यंत पोचलेल्या शब्दांचे अर्थ हे मुस्लिम भजने फार

रसाळपणे फोड करून सांगतात. हिंदूंनाही मुसलमानांच्या जीवनात एवढेच खोलवर शिरायची जरूरी नाही का ? कित्येक हिंदूसुद्धा सूफीपंथी असतात.

गाता गाता धना भगतचे डोळे पाण्याने भरून येत होते. ज्या परमतत्त्वाला उद्देशून तो भजन म्हणत होता ते परमतत्त्व पाह्यचा प्रयत्न त्याला करावा लागत नाही, असे त्याच्या चेहऱ्यावरील भावांवरून वाटत होते. हे तत्त्व पाह्यचे तर त्यासाठी आपल्याला आपले डोळे बंद करावे लागतात. परंतु धना भगतचे डोळे तर आपोआपच बंद झालेले होते. परमात्म्याला पाहाता यावे म्हणून तर ही सोय नव्हती ? अरुणला गीतेतील एक वचन आठवले,

'दिव्यं ददामि ते चक्षुः'

'आजोबा, सगळेच आलेत बघा.' आसपासच्या जगाची जाणीव विसरलेल्या भगतला किसनने सांगितले म्हणून ठीक, नाहीतर त्याचा आजा अजूनही भजनात रंगून गेला असता.

'या, या, भाई, या. तुम्ही आलात फार बरं झालं भगतचे डोळे गेले, त्याला काही दिसत नाही.' सगळ्यांचे स्वागत करता करता धना भगतने आपल्या असहाय्य स्थितीबद्दल त्यांची क्षमा मागितली.

'या पुष्पाताई आहेत. आणि त्यांच्याबरोबर आपल्याला त्या दिवशी ज्यांनी सोडवलं ना तेही आलेत.' त्याला जेवढ्यांना ओळखता आले त्या सर्वांची ओळख करून देत किसन म्हणाला.

'पुष्पाताई मोठ्या देवभक्त. मोठ्या ताई काय करतायत ? माझ्याच्यानं बाहेर पडणं झालं नाही. या किसनला त्या दिवशी मार बसला तेव्हापासून तो जरा तापट बनला आहे.' धना भगत म्हणाला.

'तापट बनला नसता तरच आश्चर्य. मलासुद्धा एवढा राग आला होता.' रंजन म्हणाली.

'या कोण आहेत ?'

'ही माझी मैत्रीण. फार शिकलेली आहे हं.'

'ठीक ! ठीक ! सुखी असा ताई ! माझ्या गरिबाकडे कसे आलात तुम्ही ?'

'तुम्ही तर भक्त ! फार ज्ञानी आहात. आमच्या आश्रमात का नाही येत तुम्ही ?' जनार्दनने विचारले.

'मला कसलं आलंय ज्ञान ? मी तर ज्ञानियांची पायधूळ आहे. मी तिथं येऊन काय करू?'

'अलीकडच्यांना तुम्ही ओळखलं नाही. दोन भजनं तुम्ही म्हणाल तर सगळे पावन होऊन जातील.'

'अरे बाप रे! हे काय भलतंच बोलता तुम्ही? आमची जात हलकी. फारच झालं तर लांब बसून भजनं गाऊ. बाकी आमचं काही नाही म्हणणं.'

किसन त्याच्या आजोबाकडे पाहात होता. आजा स्वतःच आपल्या जातीला हलकी का म्हणवून घेतो तेच त्याला समजत नव्हते. एक काळ होता, की त्यावेळी अस्पृश्यांना स्वतः अस्पृश्यत्व अप्रिय वाटत नव्हते. अरुण आणि जनार्दन किसनकडे रोखून पाहात होते. अरुणने त्याला विचारले, 'किसन, तुझे आजोबा म्हणतात ते तुला पटत नाही, खरं ना?'

'अहो, तो तर केव्हाच ख्रिश्चन बनणार होता.' धना भगत मध्येच म्हणाला.

सगळ्यांनाच ह्या हकीकतीचे आश्चर्य वाटले. ज्या दिवशी किसन आणि धना भगत यांना त्या ब्राह्मणांनी मारले त्या दिवसापासून दोन ख्रिस्ती धर्मगुरू त्या सर्वांना हिंदू धर्म सोडून देण्याचा उपदेश करू लागले होते. धना भगतला या उपदेशाची जरूर नव्हती. लहानपणी आणि मोठेपणीसुद्धा त्याने अनेक पाद्र्यांचा उपदेश ऐकला होता. अनेक अस्पृश्य ख्रिस्ती बनताना त्याने पाहिले होते. धना भगत जातीने धेड असला तरी त्याच्या भजनामुळे उच्चवर्णीय हिंदूही, त्याला बाजूला बसवून का होईना त्याचा चागला मान राखीत. त्यामुळे त्याच्यावर ख्रिस्ती उपदेशाचा परिणाम होणे शक्यच नव्हते. हे त्या दोन पाद्र्यांनीही ओळखले होते. आणि म्हणूनच त्यांनी किसनला मोह पाडायचा प्रयत्न चालवला होता.

'बघ, बघ, तू अजून हिंदू राहिलास त्याचा तुला काही फायदा मिळतो का? तुला कोणी शिवत नाही. आणि चुकून तुझा कोणाला स्पर्श झाला तर त्याबद्दल तुला आणि तुझ्या आज्याला मार खावा लागला. तुझ्या जागी एखादा ख्रिश्चन असता तर? ब्राह्मणांनी त्याला नमस्कार केला असता, त्याचे हात हातात घेतले असते.'

किसनला त्यांचे म्हणणे पटत होते. साहेबी टोपी घातलेल्या तिन्ही ख्रिश्चनांना हिंदूंनी नमस्कार केलेला त्याने पाहिला होता.

'तू ख्रिस्ती बनलास तर तुला चांगले कपडे घालायला मिळतील. खायप्यायला भरपूर मिळेल—चहा, कॉफी, सोडा-लेमन, जे तुला वाटेल ते तू घेऊ शकशील. राहायला झकास बंगला मिळेल. साहेबलोक तुला शिकवतील. तू परीक्षा पास झालास की एकदम तुला चांगली नोकरी लावून देतील. मग तुला बसायला गाडी-घोडा मिळेल. वेळ आली की तुझं एखाद्या मडमेशी लग्न लावून दिलं जाईल. हिंदू राहिलास तर तुला

काय मिळणार आहे ? एकतर तुला कोणी शिकू देणार नाही. आणि शिकलास तर धेड म्हणून तुला बाजूलाच ठेवणार. साधी नोकरी पण तुला कोणी देणार नाही.'

हे मात्र अगदी खरे होते. किसन शिकत होता तो मोठ्या अडचणीतच. प्राथमिक शिक्षण त्याने शाळेबाहेरच्या ओट्यावर बसून घेतले होते. इंग्रजी शाळेतही त्याला एकदम शेवटच्या बाकावर एकटेच बसावे लागत होते. शिक्षकही त्याची फारशी दखल घेत नसत. अस्पृश्याला शाळेत मित्र कोण मिळणार ? आणि ख्रिस्ती बनल्याशिवाय धेडाला चांगल्या हुद्द्याची नोकरी तरी कशी मिळणार ?

'आज कोणाचं राज्य आहे ? ख्रिस्त्यांचं. जगातील सगळ्यात मोठी सत्ता कोणाची आहे ? जर्मनी, इंग्लंड, फ्रान्स आणि रशिया जगातल्या मोठ्या भागावर सत्ता चालवतात, ते ती राष्ट्रं ख्रिश्चन आहेत म्हणूनच ! हे देश कसे चांगल्या स्थितीत आहेत ? अशी परिस्थिती जर एखाद्या देशाला मिळवायची असेल तर त्याला ख्रिश्चन बनणं आवश्यकच आहे. जपान आणि चीनमधले कितीतरी लोक ख्रिस्ती बनले आहेत. आतून आतून सगळेच ख्रिस्ती आहेत. तुला तुझ्या जमातीचं आणि देशाचं हित साधायचं असेल तर तुम्ही सगळ्यांनी ख्रिस्ती व्हायला पाहिजे.'

किसनला थोडाफार इतिहास येत होता. या पाद्र्यांनी त्याच्या इतिहासाच्या ज्ञानाला पुष्टीच दिली होती.

'येशू ख्रिस्त फार दयाळू आहे. सगळ्या दुनियेच्या पापाबद्दलची शिक्षा त्यानं एकट्यानं भोगली. आणि देव-पित्याकडून त्यानं सगळ्या ख्रिस्त्यांच्या पापाची माफी मिळवली. जो ख्रिस्ती असेल त्यालाच फक्त मेल्यानंतर स्वर्ग मिळेल, इतरांना मिळणार नाही.'

या जगातील आणि या जगापलीकडच्या जगातील सुखे मिळवायची तर ख्रिस्ती धर्म स्वीकारायलाच हवा, ह्या मुद्द्यात किसनला बरेच तथ्य वाटू लागले. हिंदू धर्मात राह्यचे म्हणजे अपमान सहन करायचा हे तर निर्विवाद सत्य होते. निव्वळ 'हिंदू' म्हणवून घेण्यापलीकडे अस्पृश्यांना काय मिळणार होते ? हिंदू समाजाबद्दलचा त्याचा द्वेष उफाळून येऊ लागला. एक दिवस तर त्याने आवेशात येऊन येशू ख्रिस्ताची प्रार्थना केली, 'लवकरच तू मला तुझ्या चरणी घे.'

परंतु किसनची एक मोठी अडचण होती. त्याचा त्याच्या आज्यावर फार विश्वास होता. त्याला विचारल्याशिवाय आपण काहीही करायचे नाही, असे त्याने पहिल्यापासूनच ठरवलेले होते. त्याने आपल्या मनात चाललेले वादळ भगतच्या समोर उघडे केले.

'आजोबा, आपण ख्रिस्ती झालो तर काय होईल हो?'

'नुसतं ख्रिस्ती म्हटल्यानं थोडंच ख्रिस्ती होता येतं? हा विचार कसा आला तुझ्या डोक्यात?'

'हिंदू आपल्याला शिवतसुद्धा नाहीत. मारतात, हलकं मानतात. त्यांच्यात राहून आपल्याला काय मिळायचंय?'

'तुला असं वाटत, बेटा, पण असं बघ, ज्याला प्रत्यक्ष भगवान दिसतो त्याला धेड आणि ब्राह्मण यांच्यात काहीच फरक दिसत नाही. नरसिह महेतांना नाही का नागरांच्या वस्तीपेक्षा धेडवाड्यात राह्यलाच जास्त आवडत होतं?'

'पण सगळेच कुठं असं करतात?'

'पोरा, धर्म बदलण्यानं काही मोठेपणा मिळत नाही. सगळ्या धर्मात एकच सांगितलंय. 'भगवताचं भजन करा आणि चांगलं वागा.' बारा-पंधरा वर्षांपूर्वी ह्याच ख्रिस्ती जमातीत भाडण लागली आणि त्यांनी अशी कापाकापी सुरू केली की खुद्द येशूही त्यांच्या नावानं हमदसा रडला असेल. हे बघ पोरा, मी सुखात राहावं असं तुला वाटत असेल तर तू असं काही बोलू नकोस. मी मेल्यानंतर मग तुला काय ख्रिस्ती व्हायचं असेल तर हो!'

धना भगतच्या या बोलण्यावर किसन काहीच बोलू शकला नाही. प्राण गेला तरी चालेल पण आजोबाला दुःख होईल असं काही करायचं नाही, अशी त्याची भावना होती. तेव्हा ख्रिस्ती बनण्याचा प्रश्नच उरला नाही. किसनने ती गोष्टच डोक्यातून तात्पुरती काढून टाकली.

ही सगळी हकीकत धना भगतने स्वतःच साध्या सरळ रीतीने सगळ्यांना सांगितली. अरुणला धना भगतचा हा मिथ्या धर्माभिमान जरा खटकलाच. श्रीमंत आणि धर्मवेडे हे जगावर जबरदस्त जुलूम करतात ही त्याची भावना पुन्हा दृढ झाली.

जनार्दनने किसनला आश्रमात पाठविण्याविषयी धना भगतला सांगितले. तेव्हा धना भगत म्हणाला,

'किसनची इच्छा असेल तर येईल तो.'

'माझ्या आजोबाला सोडून मी कुठेही जाणार नाही.' किसनने सांगून टाकले.

जनार्दनने अस्पृश्यांच्यातल्या जागृतीविषयी चौकशी केली. पण धना भगतला इतरांच्या जागृतीबद्दल फारच कमी माहिती होती. स्वराज्याची भावना अस्पृश्यांच्या-पर्यंत पोचली की नाही याविषयी जनार्दनला अस्पृश्यांच्यात फिरताना बरीच माहिती मिळाली होती. या वर्गाने अहिंसात्मक राजकीय लढ्यात उतरावे असे त्याला फार

वाटत होते. परंतु त्याने याबाबतीत केलेले प्रयत्न फारसे सफल झाले नव्हते. म्हणूनच आज धना भगतसारख्या एका पावन अस्पृश्याला याबद्दल विचारावेसे त्याला वाटले, हे अगदी स्वाभाविक होते.

पण धना भगत तर राजकारण्यांना आवडणार नाही, असेच बोलू लागला.

'भाऊसाहेब, स्वराज्य असो की परराज्य, कोणाची सत्ता कायम नसते. आपली राज्यं होती ती तर केव्हाच गेली. गोऱ्यांचं राज्य सध्या आहे खरं. पण त्याची वेळ आली की तेही नाहीसं होईल. मला एकाही राज्याचा मोह नाही. खरं राज्य त्या माझ्या भगवंताचं, त्यातच सगळ्यांचं कल्याण होईल.'

सगळ्यांचेच हित साधू शकणारी सत्ता जोपर्यंत मानव स्थापन करू शकत नाही तोपर्यंत राज्यचक्रे बदलतच राहाणार. परंतु धना भगतची राजकीय मते दुनियेतील सगळ्याच राज्यांना नालायक ठरवीत होती.

धना भगतचा निरोप घेऊन सगळे मोटारीत बसायला निघाले, तेव्हा जनार्दनने अरुणला विचारले, 'अरुण देशभक्ती श्रेष्ठ की देवभक्ती?'

'पुरावा तुमच्याजवळ आहे. देशभक्ती 'जनार्दन' तयार करते, तर देवभक्तीतून धना भगत निर्माण होतात. एक तयार वस्तू– फिनिश्ड प्रॉडक्ट– आहे, तर दुसरी जरा ओबडधोबड वस्तू आहे. एक आत्मविकासवादी आहे तर दुसरा परंपरागत समजुतीतून तयार झालेला ओबडधोबड पुतळा आहे. आता तुम्हीच सांगा यात श्रेष्ठ कोण?'

'चुकतोयस तू, अरुण. देशभक्तापेक्षा ईश्वरभक्त नेहमीच श्रेष्ठ असतो. देशभक्तीला मर्यादा असतात. देवभक्ती म्हणजे साऱ्या जगावरचं प्रेम– निरविधा भक्ती. देशभक्तीच्या या मर्यादा ओळखूनच गांधीजींनी स्वराज्याला रामराज्य नाव दिलं. देवभक्तीला देशभक्तीची जोड दिली तर काही अडचण येत नाही. फक्त देशभक्तीची अपुरी व्याख्या करणाऱ्यालाच त्यात अडचण वाटते. देशभक्तीत मात्र ईश्वरभक्तीचा समावेश कधी केला जात नाही, म्हणूनच जनार्दनपेक्षा धना भगतच श्रेष्ठ! जनार्दनने सांगितले.

अनेकदा गप्पा मारता मारताच खोल चिंतनात गढून जायची जनार्दनची सवय अरुणला माहीत झाली होती. 'या चिंतकांची भूमिका आपल्याला पूर्णपणे समजावून घेता येत नाही म्हणून मग आपण त्यांना गाढ चिंतक मानायला तयार होतो.' अरुणने उत्तर दिले.

'हे मला मान्य नाही.'

'एक दिवस पटेल तुम्हाला.'

हा वाद चालू असताना रंजन आणि पुष्पा अरुणकडे पाहात होत्या. दोघींनाही आपण एकमेकींना पकडले असे वाटले. शंका काढून टाकण्यासाठी पुष्पाने विचारले, 'रंजन, किसनचा चेहरा कोणामारखा वाटला तुला ?'

'तुझ्यासारखा.' रंजन हसून म्हणाली.

'चल, उगीच काहीतरी मला जनार्दनसारखा वाटला तो.'

'तुझ्या मते अरुणभाईसारखा कोणी असूच शकणार नाही, हो की नाही ?'

'तुला चेष्टा करण्याशिवाय दुसरा उद्योग काय आहे ?'

मगळे मोटारीत बसून अस्पृश्य वस्तीतून मोठ्या रस्त्यावर आले आणि वर्तमानपत्रे विकणाऱ्यांचा ओरडा त्यांच्या कानावर आला—

'लक्षाधीश नादार ! कृष्णकान्तचे दिवाळे !'

## 16. संस्कार आणि व्यापार

**आत्म्यात जनांच्या वसो जीवन वा भावमयता,**
**अरे, ते केवी न लुटे लुटता भावमयता ?**

**—न्हानालाल**

'कृष्णकान्त दिवाळखोर ! स्वराज्याचा मंत्र. एकेक आणा !' पोरांच्या आरोळ्या चालूच होत्या. एखाद्या विद्वान वेदान्त्याच्या स्थितप्रज्ञतेने फेरीवाले एका आण्यात स्वराज्याचा मंत्र आणि कृष्णकान्ताची नादारी जाहीर करीत होते. वर्तमान जीवनातील तटस्थतेचा तो एक उत्तम नमुना होता.

मात्र मोटारीत बसलेल्या चारीजणांपैकी एकालाही अशी स्थितप्रज्ञता राखणे शक्य नव्हते. सगळे रंजनकडे पाहू लागले. रंजनच्या चेहऱ्यावर काहीही माहीत नसल्याचे भाव स्पष्ट दिसून येत होते. ती बोलून गेली,

'मला काहीच माहीत नाही.'

संपत्ती ही एक अनर्थ उत्पन्न करणारी संस्था आहे असे अरुण आणि जनार्दन या दोघांचेही मत होते. तरीसुद्धा ही बातमी ऐकून त्यांना आनंद झाला नाही. उलट त्यांचे चेहरे क्षुब्ध बनले. माणसाचे व्यक्तिगत संबंध त्यांची मते वेळप्रसंगी कसे बदलतात हे यावरून सहज समजून येत होते. मोटार थांबवण्यात आली आणि अरुणने पोऱ्याकडून वर्तमानपत्र विकत घेतले.

वर्तमानपत्राच्या पहिल्याच पानावर ठळक अक्षरात लिहिले होते—

कृष्णकान्तचे दिवाळे

---

बाजारात आज अगदी खात्री-
लायकरीत्या असे समजून येते

की, प्रख्यात लक्षाधीश कृष्णकान्त
यांच्याकडे आज धनकोंची भारी
गर्दी उडाली आहे. सगळ्याच
घेणेकऱ्यांचे देणे देऊन टाकणे अवघड
आहे असे जाणकार सावकारांचे
म्हणणे आहे. असे जर खरोखरच
घडले तर या प्रख्यात लक्षाधिशाला
नादारी घ्यावी लागेल.

खळबळजनक बातम्या द्यायच्या खुमखुमीने वर्तमानपत्रे माणूस आजारी असला तरी मरायला टेकला आहे असे सरळ ठोकून देतात. 'वारा आला आणि कौल पडले' या आपल्या प्रसिद्ध ओळी अखाने मुख्यत्वे वर्तमानपत्रांना उद्देशून लिहिल्या नसतील ना ? वेदान्ती अखा त्रिकालज्ञानी होता, आणि या ओळी त्याने लिहिल्या तेव्हा त्याच्या डोळ्यांसमोर विसाव्या शतकातली वर्तमानपत्रेच दिसत होती, असे कोणी म्हटले तर त्याच्याशी वाद घालणे अवघड आहे. नादार बनण्याची शक्यता असलेला कृष्णकान्त सगळ्या गावात आधीच नादार म्हणून गणला जाऊ लागला, ही करामत या वर्तमान-पत्रांच्या रसाळ मथळ्यांची, आणि ती विकणाऱ्यांच्या रसिक जिभेची !

कृष्णकान्ताच्या मित्रांना मात्र ह्या निव्वळ संभाव्यतेच्या सूचनेमुळे धीर येणे शक्यच नव्हते. मोटार वेगाने कृष्णकान्तच्या महालाकडे निघाली. आता संध्याकाळ झाली होती. कृष्णकान्तच्या बंगल्यात नेहमीप्रमाणे दिवे होते.

चौघेही घाईघाईने खाली उतरून बंगल्यात शिरले. दिवाणखान्यातल्या सोफा-खुर्च्यांवर पन्नासएक माणसे बसली होती. उत्सुकतेने आपापसात बोलत होती. चार नवीन माणसे आलेली पाहून त्यांनी वळून त्यांच्याकडे पाहिले. परंतु कृष्णकान्त त्यात नाही असे पाहिल्यावर कृष्णकान्तची वाट पाहाणारे घेणेकरी पुन्हा गप्पात रगून गेले.

दिवाणखान्यात पाहिले तेव्हा त्यांना कृष्णकान्त तिथे दिसला नाही. म्हणून जनार्दन, अरुण वगैरे घरात गेले. कृष्णकान्तच्या खाजगी खोलीच्या दारावर रंजनने टकटक केले.

'कोण आहे ? आत या !' कृष्णकान्तचा आतून आवाज आला. ताबडतोब चौघेही आत शिरले. कृष्णकान्त आरामात हातात महागडी सिगार घेऊन बसला होता. समोरच हातावर गाल टेकवून चिंताग्रस्त सुरभी बसली होती.

'अरे व्वा ! काही हल्लाच दिसतोय ! मागणारे नाहीत नशीब ! ही चारजणं

कुठून घुसली ?' सिगारमधली राख बोटाने झाडीत कृष्णकान्त हसत हसत म्हणाला,

'हे पेपरवाले काय म्हणतात ?' रजनने घाबऱ्या घाबऱ्या विचारले.

'तू वाचलंस ना ?' कृष्णकान्तने हसऱ्या चेहऱ्याने विचारले.

'हो. पण हे खरं आहे ?'

'खरं आहे.'

'आता काय होईल ?'

'मागणारांना पैसे देऊन टाकावे लागतील !'

'पण हे असं एकाएकी कसं झालं ?'

'एकाएकी नाही झालं हे, गेले सहा महिने हे प्रकरण चालू होतं. कलेक्टरांच्या-बरोबरचा बेबनाव म्हणजे सगळ्याच गोऱ्यांच्याबरोबरचा बेबनाव ठरेल असं मला वाटलं नव्हतं. आपल्या गोऱ्या मॅनेजरनं दगा दिला. पंधरा लाखाचा खोटा हिशेब दाखवला ! आणि दहा लाखांची यंत्रं नवी मागवली, त्याच्यात घोटाळा केला.'

'त्याला पकडलं ना ?'

'तो सापडेल तेव्हा ना. महिन्यापूर्वीच तो आपली नोकरी सोडून गेलाय. त्यानंतर मला पत्ता लागला.'

'मग आता काय करायचं ?'

'काही नाही. जमेल तितका लोकांचा पैसा फेडून टाकू. मग तुझ्या घरात भाड्यानं राहू. तू दिलीस तर तुझी मोटार वापरू.' कृष्णकान्त हसत हसत म्हणाला. सिगार तोंडात ठेवून त्यानं त्याच्या धुरातून हवेत वलयं करायला सुरुवात केली.

'असं काय बोलतोस भाई ? कुठलं माझं घर आणि कुठली माझी गाडी? जे तुझं नाही असं काहीच माझं नाही.'

कृष्णकान्त त्यावर काही बोलला नाही. अरुण आणि जनार्दन विचारात गढून गेले होते. त्यांच्याबरोबर कृष्णकान्तने संबंध ठेवलेले गोऱ्या कलेक्टरला सहन झाले नाहीत. ते संबंध तोडायचा त्याने दिलेला सल्ला कृष्णकान्तने ठामपणे धुडकावून लावल्यामुळे त्याने कृष्णकान्तलाच गोऱ्या समाजातून बाहेर हाकलले.

ज्यांनी स्वकष्टाने संपत्ती मिळवलेली नसते त्यांना संपत्तीची किंमतच नसते. पिढीजात वैभव ज्यांना प्राप्त होते ते ते वैभव हा एक सहजप्राप्त हक्क आहे, असेच मानीत असतात. सूर्य नेहमी उगवतो. तो आपला ठरलेला हक्कच आहे असे आपण मानतो. त्यात काही विशेष घडते आहे, असे आपल्याला कधी जाणवतच नाही. सूर्य उद्या उगवेल की नाही अशी शंकासुद्धा आपल्या मनात कधी येत नाही. धनाढ्य

पित्याच्या मुलांनाही आपले वैभव सूर्यासारखेच शाश्वत आहे असे वाटत असते. हे वैभव एखादे वेळी नाहीसे होईल, अशी कल्पनासुद्धा त्यांच्या मनाला कधी शिवत नाही. त्यांचे औदार्य मग उधळेपणाचे स्वरूप घेते. आपले सगळे नोकर अगदी प्रामाणिक आहेत, असेच कृष्णकान्त समजून चालला होता. त्यामुळे धंद्याच्या कामात फार खोलात जाऊन व्यवहार पाहाण्याची त्याला फारशी गरज भासली नव्हती.

स्वकष्टाने पैसा मिळवला असेल त्याला मात्र त्या प्रत्येक पैशामागे त्याच्या कमाई-साठी घ्याव्या लागलेल्या कष्टांची भिंत उभी राहिलेली जाणवत असते. जवळ पैसाही नसताना त्यांनी संपत्ती उभी केलेली असते. त्यामुळे पैशाचे तात्कालिक स्वरूप त्यांना पक्के ठाऊक असते. म्हणून कंजूषीचा आरोप सहन करूनही ते संपत्तीची पुरेपूर काळजी घ्यायला प्रवृत्त होतात. कृष्णकान्तच्या वडिलांनी मोठ्या कष्टाने ही संपत्ती मिळवली होती. ते सुधारक विचारांचे होते. म्हणून त्यांनी आपल्या मुलांना पाश्चात्य पद्धतीने वाढवले होते. तरीसुद्धा त्यांना स्वकष्टार्जित आणि परप्रयत्नांनी मिळवलेल्या संपत्तीतील फरक स्पष्ट जाणवला होता. त्यामुळे त्यांनी आपल्या मुलांच्या संपत्तीचा पक्का बंदोबस्त केला होता. त्यांनी रंजन आणि कृष्णकान्त यांना संपत्ती वाटून दिली होती. त्याशिवाय आपली सून सुरभी हिच्यासाठीही त्यांनी स्वतंत्र मिळकतीची व्यवस्था करून ठेवलेली होती. त्यांच्या व्यापारी विचारसरणीला व्यापारात खोट बसण्याची शक्यता दिसू शकत होती. म्हणूनच त्यांनी प्रत्येक मुलाच्या नावे स्वतंत्र इस्टेट राखून ठेवली होती. हेतू हा की, व्यापारात खोट आलीच तर देण्यापायी सगळीच इस्टेट एका रकमेने खर्ची पडू नये. म्हणून त्यांनी काही इस्टेट कृष्णकान्तच्या नावे, काही रंजनच्या आणि काही सुरभीच्या, अशी विभागून ठेवली होती. याचा अर्थ असा नाही की, कृष्णकान्तच्या पात्रतेबद्दल त्यांना विश्वास नव्हता. मुलामुलींवर साहेबी थाटाचे संस्कार करण्याचा आणि त्यांना उच्च शिक्षण देण्याचा कटाक्ष त्यांनी पाळला होता. तरीसुद्धा सुदैवाने त्यांच्या व्यापारी शहाणपणाने त्यांना ही व्यवस्था सुचवली होती.

वडलांनी चालू केलेली कार्यपद्धती व्यवस्थित काम देत आहे हे पाहिल्यावर कृष्णकान्तने व्यापाराच्या बारीक-सारीक गोष्टीत फारसे मन घातले नाही. मिनिटा-मिनिटाला हिशेब तपासायचा, नोकरांनी सांगितलेल्या एकमेकांच्या कागाळ्या, चहाड्या-चुगल्या ऐकायच्या, गुमास्तांच्यावर अविश्वास दाखवायचा, कामगारांवर सक्त नजर ठेवायची, हे सगळे व्यापारी– व्यवहारी शहाणपण कृष्णकान्तला निरर्थक आणि असंस्कृतपणाचे वाटत होते. इंग्रजी पुस्तके वाचणे, युरोपियन कलांचा शोक करणे, युरोपियन लोकांच्याबरोबर समानतेने, सन्मानतेने मैत्री करणे, यात तो जीवन व्यतीत

करीत होता. त्याला कष्ट, भांडणे, श्रम, कुरबुरी अशा अडचणी मुळीच आवडत नसत. कोणाचेही वाईट चिंतण्याइतका दुष्टपणा त्याच्यात नव्हता. वर्षाभराचा नफातोटचाचा हिशेब होई, तेव्हा आपल्या गिरणीत काम करणाऱ्या मजुरांना जास्तीत जास्त फायदा कसा मिळवून देता येईल, याचीच काळजी तो नेहमी करीत असे.

कामगारांच्या सुखसोयी वाढवण्यासाठी युरोपमध्ये योजण्यात येणारे सर्व उपाय त्याच्या परिचयाचे होते. आपल्या कामगारांना युरोपियन आदर्शाप्रमाणे सुखी ठेवायला त्याला फार आवडे. मिळणाऱ्या नफ्यातून फक्त आपल्या शेअरहोल्डरांचा फायदा करून देणे त्याला मान्य नव्हते. म्हणून तो आपल्या एजंटच्या हुद्द्याचा फायदा घेऊन कामगारांना त्या फायद्यातून जास्तीत जास्त सुखसोयी मिळवून देत असे. त्याने मजुरांच्या चाळी सुधारल्या होत्या. चाळीच्या मधूनमधून त्याने त्यांच्यासाठी बागा आणि मोकळी मैदाने केली होती. मजुरांसाठी दवाखाने, एक प्रसूतिगृह आणि शाळाही त्याने सुरू केली होती. कामगारांना दिला जाणारा 'बोनस' त्याने जास्त आकर्षक केला होता. त्याच्या योजनांमुळेच त्याची आणि जनार्दनची जास्त ओळख झाली होती. कृष्णकान्त स्वतः अत्याधुनिक पद्धतीने राहात असला तरी त्याचे मन कलुषित नव्हते. त्याच्यापेक्षा वेगळ्या पद्धतीने राहाणाऱ्याचा तो तिरस्कार करीत नसे.

युरोपियन क्लबचा राजीनामा दिल्यानंतर कृष्णकान्तने अरुण आणि जनार्दनशी असलेले आपले संबंध आणखीनच वाढवले. बऱ्याच वेळा तो आश्रमात जाई. आश्रमाला उघड-उघड सहाय्य करी. राजकीय चळवळीत त्याला फारसा रस नव्हता. परंतु इंग्रजांचे मिजासखोर मोठेपणा मान्य करायचा नाही, असे तो आता म्हणू लागला होता.

कृष्णकान्तने क्लब सोडून दिला तरी त्याच्या प्रतिष्ठेला जरासुद्धा धक्का लागला नव्हता. सभा-संमेलने, मेजवान्या, पार्ट्या या सगळ्यांना त्याला कायम आमंत्रण असे. अशा प्रसंगी तो खास देशी पद्धतीचे, आणि शक्यतोवर गांधीथाटाचे कपडे वापरीत असे. कृष्णकान्त शौकिन होता. कुठलेही कपडे त्याने घातले तरी तो ते इतके व्यवस्थित घालीत असे,की त्या कपड्यातही तो उठून दिसत असे. कलेक्टर, कमिशनर किंवा इतर गोरे अंमलदार, किंवा व्यापारी अशा एखाद्या संमेलनात हजर असले तर तो त्यांच्याकडे जाणूनबुजून दुर्लक्ष करी. त्याला मिळणाऱ्या सन्मानामुळे क्वचित त्याला त्यांच्याबरोबर एकाच टेबलावर बसावे लागे. अशा वेळी युरोपियनांचा कमीपणा सिद्ध करणाऱ्या हकीकती आणि विनोद सांगत असे. आपला गोऱ्यांशी झालेला मतभेद तो असा जाणूनबुजून जगजाहीर करीत असे.

निव्वळ कारकून बनवावेत या हेतूने हिंदुस्थानात इंग्रजी शिक्षण सुरू करणाऱ्या अधिकाऱ्यांच्या कधी स्वप्नात पण आले नसेल, की त्याच शिक्षणाच्या संस्कारामुळे हिंदुस्थानी लोक इंग्रजांची बरोबरी करायला बघतील. इंग्रजी शिक्षणाचे अनेक गैर-फायदे सांगता येतील. तरीसुद्धा राजकीय क्षेत्रात हे शिक्षण म्हणजे मेलेल्या माणसाला मिळालेली संजीवनी ठरली आहे. हे विसरता कामा नये.

कृष्णकान्तच्या गिरणीमध्ये दोन-तीन युरोपियन अधिकारी कामावर होते. अनेक युरोपियन व्यापाऱ्याशी त्याचा धंद्यामुळे घनिष्ठ संबंध होता. सर्वसाधारणपणे असा आपल्या लोकांचा एक समज झाला आहे, की युरोपियनांसारखी नैतिक श्रेष्ठता आणि कार्यक्षमता हिंदी लोकांच्यात फारच क्वचित आढळते. त्यांच्या सत्तेचा दबदबा, कष्ट, शिस्त, नियमितपणा, दुसऱ्यावर प्रभाव पाडण्याची कला आणि वाक्चातुर्य यांच्यामुळे थक्क होऊन हिंदवासीय त्यांच्यासारखी श्रेष्ठ नैतिकता अंगी बाणण्याला अयोग्य बनलेला, लालचावलेला असावा यात काहीच आश्चर्य नाही. इंग्रजांचे कित्येक गुण हिंदवासियांना आपल्या अंगी बाणण्याची अत्यंत आवश्यकता आहे. त्यांची काम करण्याची ताकद, त्यांचा नियमितपणा आणि काही मर्यादेपर्यंतची सचोटी हे अनुकरणीय गुण आहेत निश्चित. परंतु ते नैतिक चुका करीतच नाहीत असे मात्र कोणी मानू नये. अमीचंदाची फसवणूक झाली तेव्हापासून सुरू झालेली कंपनी सरकारच्या राज्याची लाचमालिका अजून थांबलेली नाही. याची खात्री करून घ्यायची असेल तर कित्येक कलेक्टर, त्यांचे चिटणीस, काही पोलिटिकल एजंट्स आणि त्यांचे दप्तरदार यांच्याशी संबंध आलेल्या लोकांच्या गप्पा ऐकायला हव्यात.

कृष्णकान्तचा युरोपियन सचोटीवर भलताच विश्वास होता. त्याच्या कारखान्यात अनेक युरोपियन नोकर अनेक वर्षे काम करीत होते. कामगार-कल्याणाच्या कृष्णकान्तच्या योजना ही सर्व मंडळी फार विचारांती प्रत्यक्षात उतरवीत असत. गिरणीचा मॅनेजर आणि दुय्यम मॅनेजर, दोघेही युरोपियनच होते. एक दिवस दुय्यम मॅनेजरने कृष्णकान्तला येऊन सांगितले,

'तुम्ही स्वतः एकदा हिशेब तपासाल तर बरं होईल.'

'पण मग ऑडिटर्स काय करतात ?' कृष्णकान्तने विचारले.

'ते यंत्रासारखे हिशेब तपासतात. तेवढ्याने होत नाही. एखाद्या देशी तज्ज्ञाकडून तपासून घ्या.'

कृष्णकान्त हसला. 'युरोपियन असूनही तुम्ही देशी तज्ज्ञ कसे काय पसंत करता ?'

'मी खरं तेच सांगतोय.'

'ठीक आहे. करतो मी व्यवस्था.'

दुसऱ्या दिवशी कृष्णकांतने मॅनेजरला बोलावले. बोलता बोलता तो म्हणाला, 'आपले हिशेब दुसऱ्या एखाद्या ऑडिटरकडून तपासून घेतले तर चालेल काय?'

तोंड वाकडे करीत मॅनेजर म्हणाला, 'तुमच्या मर्जीवर आहे. पण उगीच फालतू खर्च करायची गरज मला तरी भासत नाही.'

'चूक तरी राहणार नाही.'

'इतके दिवस मी नोकरी करतोय. पण एवढीही चूक कधी केली नाही. तुम्हाला युरोपियनांबद्दल संशय आला आहे हे मला समजलं आहे. उत्तम उपाय म्हणजे आम्ही नोकरी सोडून देतो.'

'वॉट डू यू मीन (काय म्हणायचय तुम्हाला?) मला धमकी देता?'

'आज कित्येक दिवस मी ऐकतो आहे, 'देशी अधिकारी घ्यावेत. देशी हिशेब तपासणाऱ्याला बोलवावं.' 'अशा संशयी वातावरणात मला काम करणं शक्य नाही.'

'चुकता आहात तुम्ही. माझा माझ्या युरोपियन अधिकाऱ्यावर पूर्ण विश्वास आहे. परंतु देशी हिशेब तपासनिसाकडून हिशेब तपासायची कल्पना एका युरोपियन अधिकाऱ्यानंच मांडली असेल तर?'

'तो कोण आहे हेही मला माहीत आहे, मि. कृष्णकान्त या असिस्टंटबरोबर काम करणं मला आता शक्य नाही.' मॅनेजर आणि त्याचा सहाय्यक या दोघांच्यामध्ये अनेक हिशेबांबाबत कुरबुरी चालू होत्या. त्यामुळे आपल्या असिस्टंटनेच आपल्याविरुद्ध कृष्णकान्तला भरवून दिले असणार हे मॅनेजरला सहज समजू शकले.

कृष्णकान्तने त्याला समजवायचा खूप प्रयत्न केला. त्याचा परिणाम मात्र उलटा झाला. मॅनेजर आणि त्याचा असिस्टंट या दोघांनीही राजीनामे देऊन टाकले. मॅनेजरने तर नोकरी सोडण्याबाबत इतकी उत्सुकता दाखवली की शेवटी त्याला बक्षीस देऊन नोकरीतून मोकळे करावे लागले. ज्या दिवशी तो नोकरीतून मुक्त झाला त्याच दिवसापासून तो गायब झाला होता. दुसऱ्याच दिवशी असिस्टंट मॅनेजरने हिशेबाचे घोटाळे कृष्णकान्तच्या नजरेला आणून दिले. दहा लाखाची नवीन मशिनरी मागवताना मॅनेजरने आपल्याला ठकवल्याचे कृष्णकान्तला समजून चुकले.

कृष्णकान्त चांगलाच हादरला. एजंट या नात्याने त्याने केलेल्या व्यवहारात त्याला पंचवीस लाखाची खोट आल्याचे आढळले. अर्थात लबाडी दुसऱ्याने केली असली तरी तिला अटकाव करण्याची नैतिक जबाबदारी कृष्णकान्तचीच होती. कायद्याप्रमाणे त्याबद्दल काही झाले तरी त्यातून कृष्णकान्त सुटू शकला असता. परंतु कृष्णकान्तने

स्वतःच या तोटयाची सर्व नैतिक जबाबदारी आपल्या शिरावर घेतली. आणि देणेकरी व भागीदार यांची एक सभा बोलावली.

सभेत त्याने सगळी हकीकत अगदी स्पष्टपणे सांगून टाकली. मॅनेजर, हिशेब लिहिणारा, हिशेब तपासणारा, या सर्वांच्या कटाचा इतिहास स्पष्ट सांगितला. आपल्या एका नातेवाइकाच्या राजकीय विचारप्रणालीमुळे युरोपियन समाजाने आपल्यावर बहिष्कार कसा टाकला, गिरणीशी संबंधित असलेल्या युरोपियन व्यापाऱ्यांनी आपल्यापुढे कशा अडचणी उभ्या केल्या हेही त्याने सांगून टाकले. आणि शेवटी आपली नैतिक जबाबदारी मान्य करून आपल्या वैयक्तिक मिळकतीतून यातला अर्धा तोटा भरून काढण्याची आपली योजनाही त्याने सांगितली. उरलेला तोटा भरून काढण्याची ताकद त्याच्याकडे नव्हती. आणि म्हणून आपली स्थावर मालमत्ता कारखान्याकडे गहाण ठेवून आपण हळूहळू उरलेला तोटाही भरून काढू, असे आश्वासन दिले.

अनेक युरोपियन धनको आणि त्याच्या दडपणाखाली असलेले देशी व्यापारी यांनी असल्या बेदरकार एजटाला तावडतोब त्याच्या जागेवरून खाली खेचावे, अशी मागणी केली. परंतु कारखान्यातील कर्मचारी आणि कामगार यांनी जाहीर करून टाकले, 'कृष्णकान्तला काढून टाकले तर आम्ही संपावर जाऊ. इतकेच नव्हे तर जरूर पडली तर सहा महिने आम्ही बिनपगारी काम करू आणि आमच्या उदार मनाच्या मालकाला आलेला तोटा भरून काढू, असेही ' त्या कृतज्ञ कामगारांनी सांगितले होते.

ही बातमी त्याच दिवशी सगळ्या गावात पसरली. पेपराना पाहिजे होता तो मालमसाला मिळाला. मग त्यांनी संध्याकाळी आपल्या विक्रेत्यांमार्फत या बातमीचा डांगोरा सगळ्या गावभर पिटवला.

आपण सादर केलेल्या योजनेवर विचार करून अंतिम निर्णय घेण्यासाठी म्हणून कृष्णकान्तने सगळ्यांना आपल्या घरी बोलावले होते. एकाने कारखान्याचे दिवाळे काढून राहिलेल्या मिळकतीतून देणे भागवण्याची सूचना केली. पण त्यावर कृष्णकान्तने स्पष्ट बजावले की, ही सूचना सर्वांना मान्य झाली तर तो आपली वैयक्तिक जबाबदारी साफ नाकारील.

# 17. मित्रमंडळी

**सहृदयाचे हे उत्तम सारे अंश मृदु-मधुर**
**सदा वर्षती अनुकूल अन् उत्तम या धरेवर ।**

**—कलापी**

कृष्णकान्तने सगळ्यांना भेटण्यासाठी आठ वाजण्याची वेळ ठरवली होती. पण सगळेजण त्या पूर्वीच त्याच्या घरी जमा झाले होते. इंग्रजी नियमितपणाची सवय असलेला कृष्णकान्त ठरल्या वेळेपूर्वी कोणाला भेटणे शक्यच नव्हते. आपली पत्नी सुरभी हिला त्याने संध्याकाळीच सगळी हकीकत सांगितली होती. संकटाची ही बातमी ऐकताच सुरभीची शुद्धबुद्धच हरपून गेली. चिंता संपत्तीची नव्हती. पण संपत्तीच्या मालकाबद्दलच्या काळजीने तिच्या मनाचा ठावच सुटला. व्यसनी पतीबद्दलची बेफिकिरी आणि नाराजी कुठच्याकुठे उडून गेली. तिच्या मनाच्या एकेका पाकळीने पतीच्या शरीराच्या भोवताली एक कोट रचला आणि पतीच्या रक्षणासाठी एक भलेभक्कम कवच तयार केले.

‘सगळीच्या सगळी रक्कम मला आजच्या आज उभी करता येत नाही, याचंच मला वाईट वाटतंय.’ कृष्णकान्त म्हणाला. युरोपियन राहाणीचा प्रभाव असला तरी कृष्णकान्तचा गृहस्थधर्म मात्र कुठे कमी झाला नव्हता.

‘माझ्याजवळ थोडे पैसे आहेत. माझे दागिने आहेत, शिवाय भाईसाठी माझ्या वडिलांनी जे पैसे पाठवले आहेत तेसुद्धा तुम्ही वापरू शकता.’ सुरभी म्हणाली.

‘तुझे किंवा तुझ्या भावाचे पैसे माझ्याने घेववतील ?’

‘का नाही ? भाईचे पैसे नंतर परत करू !’

‘आणि तुझे ?’

‘मला काय करायचेत ते पैसे ? माझे आणि तुमचे काय वेगवेगळे आहेत ?’

'माझ्यासारखा व्यसनी पती...'

पण कृष्णकान्तला आपले वाक्य पुरे करता आले नाही. सुरभीने आपला हात त्याच्या तोंडावर ठेवला. तेवढयात दारावर टकटक ऐकू आली. सुरभी जाऊन समोर बसली. कृष्णकान्तने वाजवणाराला आत यायला सांगितले. रंजन, पुष्पा, अरुण आणि जनार्दन आत येऊन थडकले. रंजनने सगळी हकीकत विचारली, तेव्हा कृष्णकान्तने गमतीने रंजनच्या घरात भाड्याने राहाण्याचा विषय काढला, तेव्हा सुरभीला खूपच वाईट वाटले.

रंजनने विचारले, 'असं का बोलतोस भाई? कुठलं माझं घर अन् कुठली माझी मोटार? जे तुझं नाही असं काहीच माझं नाही.'

कृष्णकान्त यावर काहीच बोलला नाही. गाढ विचारात गर्क झालेल्या अरुण आणि जनार्दनला मात्र बहीण-भावांच्या या विशुद्ध प्रेमाने चकित केले. इंग्रजी शिक्षण आणि राहणी यांच्यामुळे जन्मसिद्ध आर्यभावना नाहीशा होत नाहीत, हे त्यांना कळून चुकले. इंग्रजांच्या शरीरातसुद्धा आर्यांचे रक्त वाहात नाही, असे थोडेच आहे?

अरुण रंजनकडे पाहात होता. पहिल्याच भेटीत रंजन त्याला उथळ पण काहीशी रंगेल वाटली होती. पण ह्या तरुणीच्या ह्या वेगवेगळ्या स्वरूपात एक वेगळेच हृद्य मन लपलेले होते, असे त्याला आता जाणवले. काळ्या ढगांच्यावर सोनेरी-रुपेरी रांगोळी रेखीत लपून राहिलेल्या चंद्राचे तोंड क्षणभरच दिसावे, म्हणजे मग रसिक माणूस जसा तिकडे पाहातच राहातो तसाच अरुणही आजूबाजूचे भान विसरून रंजनकडेच पाहात राहिला.

पुष्पाने अरुणवर खिळलेली आपली नजर काढली आणि माथ्यावरचा पदर व्यवस्थित असूनसुद्धा तिने तो पुन्हा व्यवस्थित केला.

तेवढयात जवळच्या टेलिफोनची घंटा वाजली. खुर्ची जरा सरकवून कृष्णकान्तने रिसीव्हर हातात घेतला आणि तो बोलू लागला,

'हां जी. मीच बोलतोय...नाही, कुठेही जायचं नाही. आताच निकाल लागेल... नाही नाही.... मी मुळीच घाबरलो नाही... अंऽऽ, त्यात काय....आपण कशाला त्रास घेताय.... वा, वा, आनंदानं.... जरूर या आपण.... आपली भेट झाल्यावरच मी ऋणकोंना भेटेन.... पुष्पा इथेच आहे. मला धीर देतेय....न बोलता ...'

खो, खो, खो हसतच कृष्णकान्तने टेलिफोन खाली ठेवून दिला. आणि तो पुष्पाला म्हणाला,

'काका इकडे यायला निघालेत.'

आपले वडील इकडे येत आहेत हे पुष्पाला समजले. दोन्ही कुटुंबांतले परस्पर संबंध लक्षात घेता, आचार-विचारात कितीही भिन्नता असली तरी आजच्या प्रसंगात पुष्पाचे वडील कृष्णकान्तकडे येणे हे अगदी स्वाभाविक होते.

'मग आपण निघू या आता.' जनार्दन घाईघाईने अरुणला म्हणाला. 'आता कृष्णकान्तला कसलीच अडचण येणार नाही, याची मला खात्री आहे.'

'जरा थांबलो तर? अंतिम निर्णय लागल्यावरच जाऊ या. आता फार वेळ नाही लागायचा.' अरुण म्हणाला.

'मी जातो. तू ये नंतर, सगळी बातमी घेऊन.' म्हणून जनार्दन जागचा उठलाच.

'आज एवढी घाई कसली झालीय?' रंजनने विचारले.

'मी विसरलोच होतो. एकाला मी आश्रमात भेटायला बोलावले होते.' जनार्दनने सांगितले.

'मग तो पुन्हा येईल.'

'नाही, नाही. मला जायलाच हवं.' जनार्दन अत्यंत अधीरतेने म्हणाला.

'रंजन, महात्मा चहा-कॉफी काही घेणार नाहीत. ती फळांची बशी दे त्यांना. मग जाऊ दे त्यांना.' कृष्णकान्तने सांगितले

आतापर्यंत कधी झाला नव्हता असा चमत्कारिक चेहरा जनार्दनचा आता झाला होता. नाइलाजाने त्याने फळांच्या एकदोन फोडी खाल्ल्या. तेवढ्यात खाली मोटारीचा भोंगा वाजला आणि जनार्दन दचकून उठला. उभे राहून त्याने घाईघाईने सर्वांचा एकदमच निरोप घेतला. आणि तो लगबगीने खोलीबाहेर पडला.

'मी माझ्या मोटारीतून पाठवते त्यांना' असे म्हणत रंजन घाईघाईने जनार्दनच्या पुढे निघाली.

जिन्यातच पुष्पाचे वडील आणि जनार्दन एकमेकांसमोर आले. जनार्दन तोंड बाजूला वळवून जिना उतरू लागला.

'या या. भाई आपली वाटच पाहातोय.' मागून येणारी रंजन म्हणाली. आणि ती जनार्दनला मोटारीत बसवून द्यायला खाली उतरली.

पुष्पाचे वडील धनसुखलाल धोतर, अंगरखा आणि पगडी अशा वेषात होते. म्हातारपणाकडे झुकले असले तरी त्यांची तब्येत चांगली होती. जुन्या पद्धतीचे गुजराती दिमत होते. कृष्णकान्तने त्यांच्याकडे पाहात त्यांना आपल्याला न जमणारा नमस्कार केला. त्यांना त्याने एका मोठ्या सोफ्यावर बसवले आणि तो स्वतः

जवळच्याच एका खुर्चीवर बसला.

'शेवटी मी म्हणत होतो तसंच झालं ना ? गोऱ्यांना फार काळ जवळ ठेवू नका असं मी तुझ्या बापालासुद्धा सांगत होतो. आणि तुलाही एकदादोनदा सांगितलं होतं, आठवतं ? त्यांना फार जवळ केलं की ते मालक होऊन बसणार ? धनसुखलाल मोठ्याने बोलत होते.

'हां. जी. आपण मला एकदा सांगितलं होतं खरं.' कृष्णकान्त उत्तरला.

'पण तुम्हाला सगळ्यांनाच साहेब व्हायचं होतं. मग कोण ऐकणार ? जाऊ दे. जे झालं ते झालं. मी कारखान्यात चौकशी केली तर तू नव्हतास. म्हणून मी इथे फोन केला.

'आपण आलात ते फार चांगलं झालं.'

'आता तुझे सगळे साहेबी विचार सोडून दे. तुम्हा बाप-लेकांना...ही कसली सवय लागली होती कोण जाणे ! ...हं मग, काय ठरलं ?'

कृष्णकान्तचे हे वडीलधारे हितचिंतक जुन्या पद्धतीची तुटक-तुटक भाषा बोलत होते. कृष्णकान्तने त्यांना थोडक्यात सगळी हकीकत सांगितली. घेणेकरी आणि भागीदार यांची खाली सभा बोलावली होती. तीही त्यांना माहिती दिली. कृष्णकान्तने अंगावर घेतलेली जबाबदारी त्यांना समजली तेव्हा धनसुखलालनी तोंड वाकडे केले आणि ते म्हणाले,

'तुला काहीसुद्धा येत नाही. 'वेल' आणि 'यू सी' म्हटलं की तुला वाटतं आपण राज्य मिळवलं ! ही जबाबदारी पत्करलीस त्याच्या आधी मला तरी विचारायचं होतंस.'

'नैतिक जबाबदारी असतेच ना ?' कृष्णकान्तने विचारले.

म्हातारा जरा खूष झाला. साहेब बनलेल्यांच्या मनातसुद्धा धर्माचा थोडाफार अंश शिल्लक आहे असे त्यांना वाटले. तेवढ्यात घड्याळात आठचे ठोके पडले.

'आता मी खाली जातो.' खाली जायची वेळ झाली तसा कृष्णकान्त म्हणाला.

'मी आलो तर चालेल का ?' धनसुखलालनी विचारले.

'न चालायला काय झालं ? चला ना.'

रंजन येऊन तिथे बसली होती. तिला पाहाताच धनसुखलालनी विचारले, 'रंजन, जिन्यात मला भेटला तो कोण होता ग ?'

'आश्रमवाला जनार्दन.'

'अस्सं होय, कुठंतरी पाह्यल्यासारखं वाटतंय त्याला.' चालता चालता धनसुखलाल भूतकाळात काहीतरी शोधू लागले.

दोघेही खाली सभेच्या जागी गेले. सगळीजण एकटक कृष्णकान्तची वाट पाहात बसले होते. एका बाजूला मस्तक झुकवून कृष्णकान्तने सफाईने सगळ्यांना अभिवादन केले. आणि तो सिगारचा धूर काढू लागला. धनसुखलाल त्याच्याच जवळ बसले होते. ते हाताने धूर बाजूला करायला लागले तसा सिगार विझवत कृष्णकान्त म्हणाला, 'ओह ! आय बेग युअर पार्डन, काका !' (माफ करा हं मला, काका !')

# 18. धनसुखलालची भाषा

**कडू कडुलिंब त्याची सावली थंडगार**
**असेल अबोल बांधव तरी तोच मदतगार**

**—लोकोक्ती**

'ए बेग पार्डनवाला, आपलं काम सुरू कर ना.' इंग्रजी शब्दांना देशी प्रत्यय लावीत धनसुखलालनी कृष्णकान्तला सांगितले.

दोन-तीन धनकोंनी आपापल्या वेगवेगळ्या योजना सादर केल्या. या सगळ्या योजनांत कृष्णकान्तला दूर करायची प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्ष कल्पना होती. धनसुखलालला साधा सरळ विचार आणि साधी सरळ भाषा पसंत पडे. त्याला ह्या कल्पना सहन झाल्या नाहीत. तो बोलून गेला, 'तुम्ही सगळे एकत्र जमला आहात, ते काय भलतंच काही मागायला? 'स्कीम' च्या मोठ्या नावाखाली तुम्ही कृष्ण-कान्तला इथून हाकलून देणार आणि परत जबाबदारी त्याच्याच शिरावर लादणार! कृष्णकान्त म्हणतो ते तुम्हाला मान्य नसेल तर चालायला लागा. तुम्हाला पाहिजे ते करा. कोर्टाचे दरवाजे उघडे आहेत.'

धनको परस्परांत बोलू लागले. कृष्णकान्त आणि त्याची बहीण रंजन या दोघांच्या संपत्तीवर त्यांचा डोळा होता. धनकोंचे दडपण आले तर कृष्णकान्त आपल्या बहिणीच्या संपत्तीचाही वापर करील अशी त्यांची स्वाभाविक कल्पना होती. परंतु धनसुखलालनी आपल्या कडक शब्दांनी धनकोंच्या सगळ्या योजना फेटाळून लावल्या.

कृष्णकान्त जरा सौम्य सभ्य शब्दांत त्यांची समजूत घालू लागला. परंतु धनसुख-लालना ही निरर्थक गोड भाषा मुळीच पसंत नव्हती. त्यांची प्रतिष्ठा, त्यांचे वय, त्यांचा स्वभाव आणि त्यांच्या भाषेतला रासवटपणा दाखवीत ते डाफरले.

'सोडून दे ना सगळा हा घोळ. शंभर शब्दांच्या तिथे एक शब्द. अर्धा तोटा आता

भरून काढला जाईल. राहिलेला नंतर. आस्ते आस्ते. पण ते केव्हा ?—कृष्णकान्तच्या हातात सर्व कारभार राहिला तरच ना ?'

त्यावर कृष्णकान्तच्या व्यवस्थापकीय असमर्थतेबद्दल एक-दोघेजण काही बोलू लागले, तेव्हा त्यांना दाबीत धनसुखलाल म्हणाले, 'बस्स करा आता. तुम्ही दोघांनी काय-काय घोटाळे केले आहेत ते सगळ्यांना सांगायचं असेल तर मी सांगतो. इथे बसलेल्यांच्यात किती अब्रुदार आहेत ते सांगायलाच नको. कृष्णकान्त काही नादारी घेत नाही की विधवांचे पैसेही हडप करीत नाही. त्याला खोटया वह्या ठेवायच्या नाहीत की काही-जणांसारखे खोटे दस्तऐवज तयार करायचे नाहीत.' ज्यांची ज्यांची या प्रकारांबद्दल खात्री होती त्यांच्याकडे नजर टाकीत धनसुखलाल गर्जत होते.

तेवढयात मागच्या बाजूने अरुण बोलला,

'ठरलेल्या मुदतीत जर कृष्णकान्त उरलेला तोटा भरून काढू शकला नाही तर तो तोटा भरून काढायची जबाबदारी त्याची वहीण आपल्या अंगावर घेत आहे.'

धनसुखलाल आणि कृष्णकान्तनी मागे वळून बघितले. अरुण, रंजन, पुष्पा आणि सुरभी येऊन तिथे बसले होते. ही सगळी बोलणी ते ऐकत होते, हे त्या दोघांना आताच समजले.

'बास बास आता. तुला कोणी शहाणपणा करायला सांगितलं ?' धनसुखलालनी अरुणला दटावले.

अरुण हा उघड अपमान सहन करणे शक्यच नव्हते. त्याची आणि धनसुखलालची मुळीच ओळख नव्हती. धनसुखलालच्या स्वभावाची त्याला काहीही कल्पना नव्हती. तो तडकून उत्तरला, 'रंजनगौरीनं मला सांगायला सांगितलं. ते मी सांगितलं.'

'ती ढीग सांगेल. तिला अक्कल कुठे आहे. पण तुलासुद्धा. . . .'

'काका, तो सुरभीचा भाऊ आहे.' कृष्णकान्तने धनसुखलालना मध्येच अडवले.

'कोणी का असेना ! जरा समजून. . .'

'अरुण, डोन्ट यू माइंड काकाज टंग. ही डझन्ट मीन एनिथिंग.' (अरुण, काकांचं बोलणं मनावर नको घेऊस तू. त्यांचा तसा इरादा नाही ! ) मागे वळून कृष्णकान्तने अरुणला समजावले.

परंतु अरुण चांगलाच रागावला होता. या श्रीमंत म्हाताऱ्याने आपल्याला असा दम भरावा हे त्याला मुळीच पसंत नव्हते. तो काही बोलायला जाणार तेवढयात रंजनने त्याचा हात खेचून त्याला खाली बसवले. स्त्रीच्या त्या स्पर्शामुळे आपण लाचार

झाल्याचे अरुणला जाणवले. त्याचा रागही एकदम शांत झाला. रजनच्या हस्तस्पर्शात अरुणला अशी काही जादू जाणवली, की त्याने कोणाचाही कसलाही अपराध माफ केला असता.

'काका बोलले म्हणून वाईट वाटून घेऊ नका अरुणभाई. खरं की नाही पुष्पा ?' अरुण खाली बसल्यानंतर रंजन हलक्या आवाजात म्हणाली,

पित्याच्या भाषेमुळे शरमलेली पुष्पा थोड्या नाराजीनच ही झक्काझक्की ऐकत होती. तिने रजनला काही उत्तर दिले नाही.

शेवटी सगळ्या धनकोंनी मिळून एक निर्णय घेतला. धनमुखलालची धमकी, कृष्णकान्तचा प्रामाणिकपणा आणि त्याच्या नातेवाइकांनी त्याच्या पाठीमागे उभे राहाण्याची दाखवलेली तयारी, या सर्वांचा विचार करून त्यांनी कृष्णकान्तची योजना मान्य केली. कारखान्याच्या चालकांनी धनकोंच्या इच्छेप्रमाणे एक ठराव केला. आणि कृष्णकान्तने आपली संपत्ती तोटयाची भरपाई करण्यासाठी घालवून स्वतः गरिबी पत्करली. भागीदार आणि धनको यांना बाजूला ठेवून त्याने स्वतः एका धंद्यातून दुसऱ्या धंद्यात, त्यातून तिसऱ्या धंद्यात अशी लांब उडी मारली. व्यापारी क्षेत्रात सतत आघाडीवर असणाऱ्या व्यापारीवीरांच्या मते कृष्णकान्तने हा मूर्खपणाच केला होता. परंतु त्याच्या स्वतःच्या मनात मात्र एक विजय मिळवल्याचा निश्चयीपणा आला होता.

कृष्णकान्त सगळ्यांशीच नम्रपणे थोडेथोडे बोलला आणि मग त्याने सगळ्यांना निरोप दिला. धनमुखलालना मात्र समजावणीत वाया जाणारा हा वेळ मुळीच सहन झाला नाही. ते वारंवार कृष्णकान्तला म्हणत होते, 'आता सगळ्यांना घालवून दे बघू.'

अनेक धनकोंना त्यांनी सांगून टाकले होते, 'आता किती वेळ बसणार आहात ? चालायला लागा की.'

जगात सगळेच लोक जर विचारी आणि सभ्य झाले तर जगातली कृत्रिमता जास्तच वाढून जाईल. तुसडेपणाचा आरोप सहन करूनसुद्धा स्पष्ट सांगणारा स्वभावही अस्तित्वात आहे हेच बरे. नाही तर माणूस एवढा हळवा झाला असता की त्याला थोडीशीसुद्धा कटुता सहन झाली नसती.

सगळे निघून गेले तेव्हा कुठे धनमुखलालचा चेहरा प्रसन्न झाला.

'अरे कृष्णकान्त, ठाकुरजीनं तुला चांगली बुद्धी दिली. पैसा येतो आणि जातो. परंतु स्वतःच्या हातातला पैसा देऊन टाकायची संधी दरवेळेला मिळतेच असे नाही.

बरं, आता मी निघतो. मुळीसुद्धा घाबरू नकोस. गरज लागली तर मला कळव.'

'थांबा की थोडा वेळ. मी काहीतरी सोवळ्यानं करायला सांगतो.' कृष्णकान्त म्हणाला.

'साहेबांच्या घरात कसलं आलंय सोवळयाचं ? मला विटाळ नाही करून घ्यायचा. तू म्हणालास यातच सगळं काही पोचलं. चल पुष्पा.'

'पुष्पाला बसू दे की. नंतर पाठवतो मी.'

'तुझ्या विचारापासून तू ढळणार नाहीस ! तू खाली यायचा नाहीस. ठीक, तुझी मर्जी.'

'मी पण निघतो आता.' अरुण म्हणाला.

'तुला कसली घाई आहे ?' कृष्णकान्तने विचारले.

'जनार्दनचा जीव वरखाली होत असेल. त्याला जरा निकालाची बातमी देतो.'

'चला येत असलात तर. मी माझी गाडी तुमच्या बाजूनं घेईन. कुठं राहाता तुम्ही ?' धनसुखलालनी विचारले. थोड्याच वेळापूर्वी आपण अरुणला रागावलो होतो हे ते विसरूनच गेले होते.

'हे आश्रमात राहातात' रंजनने सांगितले.

'कसला आश्रम ? हे कसले नखरे आहेत ? स्नानसंध्या, पूजापाठ यांचं नाव नाही, आणि म्हणे आश्रम' हसत धनसुखलाल म्हणाले. हिंदू धर्मातील कर्मकांड वगळून जे काही केले जाते ते सर्व हिंदू धर्माच्या विरुद्ध आहे, असे त्यांचे मत होते.

'मी चालत जाईन. गाडीची जरूर नाही.' अरुणचे त्या कटू बोलणाऱ्या म्हाताऱ्या-बद्दल अजून मत चांगले झाले नव्हते.

'आता चल की माझ्या राजा. गाडी असताना तंगड्या तोडीत जायचं काय कारण ? चला, चला.' असे म्हणत अरुणच्या खांद्यावर हात ठेवीत त्यांनी अरुणला ओढले.

कृष्णकान्त हसला. या म्हाताऱ्याची जीभ आणि मन यांच्यात खूपच अंतर आहे, असे अरुणला वाटले. आणि त्यात विशेष ते काय होते ?

सगळ्यांचेच असे होते.

संस्कार, विशेषत: नवीन संस्कारांची झळाळी मनात द्वेष बाळगते, परंतु जिभेवर मात्र साखरेची गोडी धारण करते. धनसुखलालच्या जिभेला करवत होती. परंतु त्यांच्या मनात मात्र द्वेष जाणवत नव्हता.

'बरं, बरं. येतो मी.' अरुणने गाडीतून जायचे मान्य केले. धनसुखलालच्या जिभेचा

फटकारा त्याला पुन्हा खायचा नव्हता.

'मग मीसुद्धा निघते आता.' पुष्पा जागची उठत म्हणाली. पुष्पा फारच कमी बोले. तिला थांबवून घेण्यात तरी काय अर्थ होता ? आणि आता तिला थांबवून घेतले असते तरी ती थांबली असती की नाही शंकाच आहे. वडलांच्या बरोबर मुलीने घरी का जाऊ नये ?

रंजनला मात्र त्यात वेगळेच कारण दिसले. जाता जाता तिने पुष्पाच्या कानात अमृत ओतले,

'अरुणभाईजवळच बस ग.'

रंजनकडे तिरप्या डोळ्यांनी बघत पुष्पाने आपला राग व्यक्त केला. आपल्या मनातले कोणाला समजले नाही तर आपल्याला बरे वाटत नाही. ते समजलेले आपल्याला आवडतेच. परंतु ते कोणी स्पष्ट केले तर मात्र ते आपल्याला पटत नाही. मात्र काही गोष्टी इतक्या गोड असतात, की कोणी त्या समजून उघड केल्या तर मात्र आपल्याला ते आवडते. फक्त त्याच्यावर आपण खोटा-खोटा राग काढला की झाले. सूर्याला हळूहळू आपल्या कवेत घेत लपू पाहाणारी संध्या जेव्हा त्याचे चुंबन घेताना पकडली जाते तेव्हा कशी लालचुटुक होऊन जाते !

दिघेही मोटारीने जायला निघाले. धनसुखलाल आता सार्वजनिक कामातून जवळ-जवळ निवृत्त झाले होते. त्यामुळे त्यांचा आता लोकांशी फारसा संबंध येत नसे. त्यातून त्यांची राहाणी अगदीच जुन्या पद्धतीची होती. त्यामुळे नवीन प्रवृत्तीच्या राहाणीत आढळणारा स्वाभाविक मोकळेपणा त्यांना मुळीच आवडत नसे. त्यांनी अरुणला विचारले,

'तुम्ही आश्रमात राहून काय करता ?'

पुष्पा मनात चांगलीच घाबरून गेली. वडलांची भाषा अरुणला आवडणार नाही हे तिला माहीत होते, म्हणूनच यांच्या गप्पा फार लांबू नयेत अशी मनातल्या मनात तिने प्रार्थना सुरू केली.

'झेपेल तेवढं देशसेवेचं काम करतो.'

'मोठी आली तुमची देशसेवा ! कमवायचं, मिळवायचं सोडून ही नस्ती उठाठेव कशाला करता ?'

'तुम्हाला वाटतं तितकं हे निरर्थक काम नाही.'

'माहीत आहे, माहीत आहे ! आश्रम काढलात म्हणजे काही वाघ नाही मारलात.'

या प्रश्नाचे उत्तर देणे कोणत्याही पिढीतल्या देशसेवकाला अवघडच होते. आश्रम-

स्थापणारे, व्याख्यान देणारे, जागृती निर्माण करणारे देशसेवक आपले काम अगदी थोडक्यात सर्वांना समजेल अशा स्वरूपात समजावू शकतील का ? एका दिवसात मी पंधरा व्याख्याने दिली असे मोठ्या अभिमानाने सांगणाऱ्या देशसेवकाला जर विचारले की तुझ्या व्याख्यानांनी काय साधले, तर तो, दिसू शकेल, मापता येईल असा काही परिणाम सांगू शकतो का ?

'आम्ही एक वर्तमानपत्र चालवतो.' अरुण म्हणाला.

'अशा चिध्या तर कितीतरी निघतात.'

'यांच्या पत्रात आणि इतर चिध्यांत खूप फरक आहे.' न राहवून पुष्पा म्हणाली.

'असेल, असेल. चार लाबलचक वाक्ये जास्त घालीत असाल त्याच्यात सरकार-विरुद्ध कान उघाडणी करणारे लेख लिहीत असाल. पण त्यातून निष्पन्न काय होणार ?'

'लोकांच्यात त्यामुळे राजकीय जागृती निर्माण होते. सरकारला लोकांनी सांगितलेलं ऐकावं लागतं. आपल्या राजनीतीविरुद्ध कडक टीका झाली, की स्वतःचं कार्य जपून करावं लागतं.'

'तुमचं वर्तमानपत्र नसतं तर काय हे काही झालं नसतं ?'

अरुणला हसू आले. आपल्या सेवेशिवाय देशाचे काही चालत नाही, असा गर्व बाळगणारे देशसेवकही त्याने पाहिले होते. देशसेवेचा शिक्का नसलेल्या माणसाला तुच्छ लेखणाऱ्या कार्यकर्त्यांना नम्रता शिकविण्यासाठी तरी धनसुखलालशी गप्पा-गोष्टी करायला पाठवणे किती आवश्यक आहे हे जाणून त्याला हसू आले.

'आमचं वर्तमानपत्र हे एक निमित्त आहे. वर्तमानपत्र आमचं असो की दुसऱ्यांचं, त्याच्यावाचून हे काही घडू शकलं नसतं ना ?' अरुणने विचारले.

आता धनसुखलाल हसले. या मुद्द्याचा त्यांच्यावर काही फारसा परिणाम झाला नाही. थोड्या वेळाने त्यांनी पुन्हा विचारले.

'काही शिकलाय-बिकलाय की नाही ? का असेच कोरडे ?'

इंग्रजी शिक्षणाचा मोह टाकून देण्याच्या या युगातसुद्धा इंग्रजी शिकलेल्यां-बद्दल खास पक्षपात केला जातो. हा पक्षपात राष्ट्रवाद्यांच्यातही जिथे होतो तिथे इतरांची काय कथा ?

राष्ट्रसेवा हेच जीवनकार्य करण्याची मूळ कल्पना गोखले यांची. ही विचारसरणी सबंध देशभर पसरवून त्यासाठी देशसेवा संघाची स्थापना महात्मा गांधींनी केली. त्यांच्या कार्यक्रमामुळे न शिकलेल्यांचाही उपयोग होऊ लागला. पण त्यामुळेच अनेकांना वाटू लागले, की दुसरे काहीही करणे ज्यांना शक्य नाही त्यांना देशसेवेच्या

बहाण्याखाली आश्रय मिळवण्याचा यापेक्षा दुसरा चांगला मार्गच नाही. समाजात कज्जेदलाल म्हणून प्रसिद्ध असलेले लोकसुद्धा खादी घालून परदेशी मालावर बहिष्कार टाकायला लोकांना सांगतात, किंवा अगोदर गुत्त्यात सापडलेला बेकार माणूस दारूच्या 'पिकेटिंग'साठी पगार घेतो तेव्हा राष्ट्रीयवृत्तीच्या उणिवा शोधणाऱ्यांना टीकेचे उत्तम साधन मिळते. धनसुखलालच्या प्रश्नातही इंग्रजी शिक्षणाचा मोह आणि राष्ट्र-सेवासंघाची दुर्बलता लक्षात आल्यामुळे वाटणारी मौज स्पष्ट दिसून येत होती.

'शिकलोय ना बेताचा.' अरुणने सांगितले.

'मॅट्रिक झाले असाल ?'

'त्याच्यापुढे गेलो होतो.'

'बी. ए. झाला.'

'नाही. एम्. ए.'

अरुणवर शिक्षणाचे संस्कार झालेले ऐकून धनसुखलालला त्याच्याबद्दल वाटणारा तिरस्कार जरा कमी झाला.

'मग नोकरी का नाही धरलीत ?'

सरकारी नोकरी म्हणजे शिकलेल्यांचा स्वर्ग. नोकरीत प्रवेश करणाऱ्यांच्या शिक्षणाचे चीज झाले असे सर्वांनाच वाटते.

'कोणी ठेवूनच घेत नाही.' किंचित हसत अरुण म्हणाला.

'असं होईल का कधी ?'

'होतंय ना. माझ्या लायकीची नोकरी तर पाहिजे ना ?'

'एकदा जी मिळाली होती ती घ्यायची होती. आस्ते आस्ते प्रगती झाली असती.'

'पण माझी महत्त्वाकांक्षाही जबर होती.'

'तुम्हाला व्हाइसरॉय नव्हतं ना व्हायचं ?' काहीशा उपहासानेच धनसुखलालनी विचारले.

'तेच व्हायचं होतं मला. पण त्या जागेची आशा धरली म्हणून मला कोणी समोरही उभं केलं नाही.'

'अशी वेडपटासारखी मागणी केली तर कशी चालेल ?'

'त्यात वेडेपणा काय आहे ?'

'म्हणजे आपण हिंदी लोकही राज्यकारभार करू शकू असं तुमचं मत आहे तर ?'

'का नाही करू शकणार ?'

'इंग्रजांवाचून मुळी आपलं चालणारच नाही.'

'आपण साहेबीपणाच्या विरुद्ध आहात ना ? आपल्या घरात ज्याला आपण येऊ देत नाही त्याला देशात कसं राहू देता ?'

ते ऐकून धनसुखलाल जरा चमकलेच. पूजापाठ करणारे, देवावर निश्चल श्रद्धा ठेवणारे पवित्र पुरुष कट्टर हिंदू असूनसुद्धा इंग्रजांवाचून हिंदुस्थानचे चालणार नाही असेच मानतात. परंतु एकदा देशाला साहेबाच्या हाती सोपवले तर त्याची छाया मंदिरात आणि घरात पडल्याशिवाय राहाणार नाही, हे त्यांच्या लक्षातच येत नाही.

गाडी थांबली. आश्रम आला होता. अरुण खाली उतरला आणि त्याने नमस्कार केला.

'परत भेटा बरं का.' धनसुखलालनी अरुणला सांगितले.

'हो, हो, जरुर.'

मोटार वळून गेली. धनसुखलालनी पुष्पाला विचारले. 'हीच मंडळी मिरवणूक काढणार आहेत ना ?'

'होय.'

'तुला वाटलं तर जा एखाद्या वेळी—पण मला स्वतःला मात्र हे ढोंग पसत नाही.'

## 19. पुन्हा फुललेले निखारे

**प्रणयकलही अश्रू वाहती**
**कवटाळी, चुंबी हृदयस्वामी**
**या एक एक क्षणासाठी**
**जीवनाचे दानही असे कमती ।।**

सगळे गेल्यानंतर फक्त सुरभी, रंजन आणि कृष्णकान्त एवढेच काय ते घरी राहिले. रंजन कृष्णकान्ताची भारी लाडकी होती. आपल्या बहिणीने चांगले कपडे घालावेत, चांगले राहावे, चांगले शिकावे याची भाऊ काळजी घेत असे. आणि आज बहिणीचे औदार्य दिसून आले तेव्हा आपण तिची घेतलेली काळजी निष्फळ ठरली नाही याचा भावाला आनंद झाला. त्याने रंजनच्या खांद्यावर हात ठेवला आणि तो जिना चढू लागला.

सुरभी जवळच होती. तिला ते खटकले.

'माझ्या खांद्यावर हात ठेवून हे का नाही वर चढत ?'

तेवढ्यात तिला आपल्या वागणुकीची आठवण झाली. मदिरेची चव घेणाऱ्या पतीला अपवित्र समजून ती त्याच्या स्पर्शापासूनही दूर राह्यचा प्रयत्न करीत होती. अनेकदा देहस्पर्श हे हृदयस्पर्शाचे मूर्त स्वरूप असते. मग तिचे आणि कृष्णकान्तचे मन परस्परांशी मिळाय-जुळायचे थांबले होते का ?'

चटकन सुरभीने आपला हात लांब केला. आणि आपल्या पतीचा हात धरला. कृष्णकान्त विचारात गढून गेला होता. त्याने वळून पाहिले. सुरभीच दिसली तेव्हा तिच्याकडे पाहून स्मित केले.

एकदोन पायऱ्या चढून गेल्यावर त्याने रंजनच्या खांद्यावरचा आपला हात काढून घेतला.

'का रे भाओी ? हात काढलास ? मी दमले नाही काही.' रंजन म्हणाली.

'माझे दोन्ही हात अडकवून ठेवले तर मला चढता कसे येईल ? कृष्णकान्तने म्हटले.

'हां, अस्सं होय ? वहिनी भारी मत्सरी आहेत हं. बरं बाई, माझ्यापेक्षा त्यांचाच हक्क जास्त आहे. त्यांचाच हात धरून चाल तू.' रंजन म्हणाली.

'नाही हं रंजनवन्सं. असं नाही. माझ्या मनात आलं. . .' काहीशी ओशाळून सुरभी काही बोलू पाहात होती. तिला थांबवीत रंजन म्हणाली,

'तुमच्या मनात काय आहे ते मला माहीत आहे वहिनी. सांगायची काहीं जरूर नाही. ही मी लांब झाले. आता झालं ?'

'रंजन, धनसुखलालांनी आपल्याला असं पाहिलं तर ?' विषय बदलण्यासाठी कृष्णकान्त म्हणाला.

'मारतीलच आपल्याला. त्या दिवशी आपण त्यांच्या घरी एकाच सोफ्यावर बसलो होतो तेव्हा केवढे भांडले होते आपल्याशी. अेका सोफ्यावर बसला नाहीत तर तुम्ही बहीण-भाऊ आहात हे सगळ्यांना माहीत कसं होणार नाही का ? असं सरळ तोंडावर म्हणाले आपल्याला.'

'आणि त्या दिवशी मी सुरभीचे नाव घेतले तर केवढे चिडले होते.' 'त्रास झालं आता. सारखं सुरभी, सुरभी काय चालवलं आहेस ? नाव घेतल्याशिवाय होत नाही का ? फार प्रेम उतू चाललंय ?'– हो की नाही ?' कृष्णकान्तने हसत हसत धनसुख-लालची नक्कल केली.

सुरभी विचारात पडली. प्रेमचेष्टा करायचे संपूर्ण स्वातंत्र्य असूनही कृष्णकान्तचे प्रेम आपण राखू शकलो असू का ? असा हसतमुख, विनोदी, उदार आणि रसिक पती, त्याला फक्त दारू पिण्याची सवय आहे, एवढ्यावरूनच तो आपल्या प्रेमाला अपात्र ठरू शकतो का ?

आपल्या आतापर्यंतच्या वागण्यात काहीतरी चुकत होते असे सुरभीला वाटू लागले. आपले नातेवाईक आपल्याला परिपूर्णता मिळावी अशी इच्छा करतात, परिपूर्णता हा आपला हक्क आहे असे मानतात, हे जास्तच नाही का जरा ? अर्थात दोष हा दोषच असतो. आणि नाते जेवढे निकटचे तेवढे त्या नातेवाइकांत दोष कमी असावे अशी आपण अपेक्षा करतो. पति-पत्नीच्या संबंधापेक्षा जास्त निकटचा संबंध अजून मानवजातीत निर्माण झालेला नाही. आणि म्हणून पती किंवा पत्नीचा साधा दोष-सुद्धा असह्य होतो. सारखा बाहेर राहाणारा पती घरात जास्त वेळ का टिकत नाही या विचारांनी कितीतरी पत्नी खंगत असतात ! तर घरातून जरासुद्धा बाहेर न पडता

चोवीस तास घरातच बसून राहाणारा पती आपले घरकोंबडेपणा सोडून एखादा तास तरी घरातून बाहेर जावा, म्हणून प्रार्थना करणाऱ्या बायकाही काही कमी नाहीत. आपली हसतमुख बोलकी पत्नी, शेजारी-पाजारी, मित्र-मैत्रिणी, ओळखीचे-पाळखीचे अशा सर्वांशीच गप्पा मारता मारता शर्टाचे बटण लावायचे लांबणीवर टाकू लागली तर आपल्या पत्नीने साती दिवस मौनव्रत पाळावे अशीच प्रार्थना तिचा नवराही करतो. उलट मोठ्या कष्टाने एखादे अक्षर बोलणारी, सहसा न हसणारी, आणि बंद केलेल्या दिव्यासारखी अस्वस्थ, शांतता पसरवणारी पत्नी ज्याला मिळालेली आहे तो पती दुसरी बिघ खायलाही तयार होतो यात न समजण्यासारखे काही नाही.

अशी परस्पराकडून पूर्णतेची अपेक्षा करणारे जोडपे क्षुल्लक चुकांमुळे जीवन विषारी करून सोडते आणि निकटच्या संबंधामुळे आपण क्षुल्लक, लक्षातही न घेण्यासारख्या दोषांना भलतेच महत्त्व देत आहोत, हे त्यांच्या लक्षातच येत नाही. सद्गुणांच्या यादीत एका गुणाचा समावेश करायचा ते विसरतात— सामान्य चुका, सामान्य दोष सहन करायचा. हाही गुण सचोटी, चांगुलपणा, पावित्र्य किंवा औदार्य या गुणांसारखाच एक उच्च दर्जाचा गुण आहे. औदार्याचाच हाही एक प्रकार आहे. एखादी विलक्षण, सर्वांना स्पष्ट दिसणारी दैवी घटना स्वतःच्या बाबतीत घडली असेल तरी तिचा त्यांना विसर पडतो मोठ्यातल्या मोठ्या. सर्वांना दिसणाऱ्या एखाद्या दैवी घटनेला ते स्वतःच्या बाबतीत अवास्तव महत्त्व देतात. रंग, रूप, बुद्धी आणि सद्गुण याबाबत दैव कधीही पूर्णता देत नाही. सपूर्णता जिथे दिसते तिथे ती फसवी असते, अस्वाभाविक असते. ईश्वर बनल्याशिवाय ही ईश्वरी पूर्णता मिळत नाही. आणि ईश्वरसुद्धा नाही का या जगाचे आणि त्यातल्या माणसांचे अनेक दोष चालवून घेत?

पतीच्या डोक्यावर एक भयंकर संकट कोसळलेले आहे. तो श्रीमंतीचा एकदम गरीब बनला आहे. जन्मापासून सुखात, विलासात राहिलेला, काहीसा विचित्र परंतु सुसंस्कृत, सदर्पी तरीही सहृदय असलेला आपला पती हे संकट सहन करू शकला नाही तर? संकटात सापडलेले बहुतेक श्रीमंत लोक आत्महत्या करतात, हे सुरभीने ऐकले होते. हाच विचार कृष्णकान्तच्या मनातही आला नसेल कशावरून? निव्वळ शोक म्हणून दारू पिणे याखेरीज त्याच्यात दुसरा कोणता दोष आहे? निर्व्यसनी गणल्या जाणाऱ्या किती नवऱ्यांची निष्ठुरता त्यांच्या बायकांना सहन करावी लागत होती? निर्व्यसनी परंतु निष्ठुर पती चांगला की व्यसनी असूनही सहृदय असलेला पती चांगला?

सुरभीला कृष्णकान्तविषयी एकाएकी जबरदस्त प्रेम वाटू लागले.

'असेल दारू पीत! त्यात कोणाचं काय गेलं?'

तिच्या मनात विचार आला. खरेच, त्यात कोणाचेच काही जात नव्हते. खरी तक्रार फक्त सुरभीचीच होती. पण ती तक्रार ती विसरून गेली. आणि पतीचे व्यसन निव्वळ सहन करायलाच नव्हे तर त्याचे समर्थन करायलाही ती आता तयार झाली होती.

पति-पत्नींची मने जुळवून आणणारे संकट आशीर्वादसम मानायला हवे.

'कुठं निघालात ? आत या ना.' वर आल्यावर कृष्णकान्तबरोबर त्याच्या खोलीत शिरत सुरभी रंजनला म्हणाली. रंजन पुढे निघाली होती.

'नाही रे बाबा. मी पुन्हा तुमच्या हक्कात कुठे कडमडू ? जुना जमाना सगळ्या सासू-नणंदांवर रागाने जळत होता. त्यात आता ह्या नवीन जमान्याला त्यांना शिव्या कशाला द्यायला लावू ?'

'आम्ही शिव्या दिल्या असतील, खरं ना ? ऐकल्यात का कधी ?'

'मनात तरी दिल्याच असतील की नाही ?' असे म्हणून रंजन पुढे सटकली.

नणंद-भावजयांची अनेकदा खडाजंगी उडे. कृष्णकान्ताच्या दारूच्या सवयीमुळे सुरभी पतीपासून दूर दूर जात आहे हे रंजनला समजले होते. असे होऊ नये. पती-पत्नीत पुन्हा प्रेम उत्पन्न व्हावे अशाच दृष्टीने ती सुरभीशी गप्पा मारीत असे. दोघींची चांगलीच गाढ मैत्री जमली होती.

कृष्णकान्त बेफिकीर चेहरा करून सोफ्यावर टेकून बसला होता. परंतु त्याच्या आता जागरूक झालेल्या पत्नीला त्याच्या चेहऱ्यावर खिन्नता झाकाळलेली स्पष्ट दिसून येत होती.

'सिगार नाही पेटवायचा ?' सुरभीने विचारले.

कृष्णकान्तच्या ओठात सिगार होता. परंतु तो सगळीच विझला होता. आणि कृष्णकान्तला त्याचा पत्ताच लागलेला नव्हता.

'ओह, आय सी !' म्हणत कृष्णकान्त हसला. काडयापेटीची अद्‌भुत चमत्काराची पेटी काढून त्याने सिगार पेटवला. थोडा वेळ दोघे काही न बोलता बसून राहिले.

'जेवायची वेळ झाली.' साडेनवाचा टोला घड्याळात पडलेला ऐकून सुरभी म्हणाली.

'आज मला जेवायचं नाही.'

'का बरं ?'

'भूक नाही.'

'भूक नसली तरी जेवावंच लागेल आज.'

एरवी आपल्या रोजच्या कार्यक्रमात मुळीच मन न घालणारी आपली पत्नी आज आपल्याला जेवायचा आग्रह करताना पाहून कृष्णकान्ताला आश्चर्यच वाटले.

'माझं ठीक आहे. पण तू का बसून राहिली आहेस ? जेवून झोप तू. नाहीतर तब्येत जास्तच बिघडेल.'

'तुमच्या नतर जेवीन मी.'

'ओरिएंटलायझिंग सो फास्ट ! ओह ! द इंडियन वाइफ !'
(इतक्या लवकर एवढा फरक ! एकूण ती आर्यपत्नीच !')

इंग्रजी उच्चार अस्सल इंग्रजी ढबीने बोललेले ऐकून सुरभी हसली.

कृष्णकान्तचा सिगार पुन्हा विझला. सुरभीची नजर तिकडे वळली. सुरभी आपल्याकडे वारंवार पाहात आहे हे लक्षात येऊन कृष्णकान्तलाही सिगार विझल्याचे कळले. त्याने सिगार हातात घेऊन वर साचलेली राख बोटाने झटकली आणि सिगार खिडकीतून लांब फेकून दिला.

'आज देशी पद्धतीनं जेवलो तर ?' कृष्णकान्तने विचारले.

कृष्णकान्त आपल्या गरिबीची तयारी करू लागला आहे असा सुरभीचा समज झाला. देशी पद्धतीचे जेवण, इतर देशी वस्तूंप्रमाणेच परदेशी पद्धतीच्या जेवण्यापेक्षा फारच स्वस्त होते.

पण पतीने चालू केलेली ही गरिबीची तयारी पत्नीला मुळीच आवडली नाही.

'मुळीच नाही. तुम्हाला जे आवडतं तेच करायचं तुम्ही. मी सगळी तयारी करून ठेवलीय.'

'अस्सं ! तुझ्यात एवढी शक्ती कशी काय आली ? चल तर मग. मी जेवून घेतो.'

कृष्णकान्त उठून चालू लागला. साहेबी थाटात जेवायचे तर वेगळी खोली आणि वेगळे फर्निचर लागते. कृष्णकान्त विचारात गढला होता त्यामुळे मागून येणारी सुरभी त्याला दिसलीच नाही. इकडे-तिकडे न पाहाताच तो सरळ जेवणाच्या खोलीत जाऊन खुर्चीवर बसला. समोरच्या टेबलावर त्याने हात ठेवले आणि त्याच्यावर आपले डोके टेकवले. काचेची बशी खडखडली तरी त्याने हात बाजूला केला नाही. पाठीमागून त्याच्या डोक्यावरून हात फिरवीत सुरभीने विचारले, 'असं काय बरं ? जेवायचं नाही का ?'

कृष्णकान्त सावरला. आपण विचारात गढून गेलो होतो हे त्याला दाखवायचे नव्हते.

'काही नाही ग, आज जरा थकलोय. बाकी काही नाही.'

सुरभीने बटलरला जेवण आणायला फर्मावले.

'तुला हे जेवण आवडत नाही. मग तू इथं कशाला आलीस ?'

'अशीच आपली.'

"मग आता जायचं नाही का ? तुला थकायला होईल.'

'नाही होणार.'

'तुला जेवायला उशीर होईल.'

'झाला तर झाला. अजून रंजनवन्सं गातायत.'

रंजन दिलरुब्याच्या साथीने हलके-हलके गात होती.

'पायल मोरी बाजे झनक झनक
कैसे कर आऊँ तेरे पास, सजन'

विफलतेमुळे बेचैन झालेले चित्त शांत राखण्याचा प्रयत्न करणारी रजनी बिहागाचे आर्जवी सूर आळवून रजनीनाथाला बोलावीत आहे असा भास रंजनचे गाणे ऐकून होत होता.

आकाशात चंद्रोदय होत होता.

काहीही न बोलता खाली बघत कृष्णकान्त जेवत होता. तेवढ्यात त्याच्याजवळ काचेचा एक छानसा छोटा पेला कोणीतरी ठेवला कृष्णकान्तने वर पाहिले. सुरभी हातात एक बाटली घेऊन उभी होती. तिच्या चेहऱ्यावर स्मित उमटले होते.

कृष्णकान्त आतापर्यंत इतका कधीच दचकला नव्हता. त्याच्या डोक्यावर कोसळ-लेल्या पैशाच्या संकटानेसुद्धा त्याला एवढे हादरवले नव्हते.

'सुरभी, हे काय करतेस तू ?' कृष्णकांतने विचारले.

'काही नाही. तुम्ही जेवा शांतपणे.' सुरभीने आपला मोकळा हात प्रेमाने कृष्ण-कृष्णकांतच्या खांद्यावर ठेवला.

'अग पण ही दारू आहे.'

'आहे ना.'

'आणि तू ती स्वतःच्या हातानं मला देते आहेस.'

'मी दिली म्हणून ती नावडती नाही ना होणार ?'

'नाही, नाही. मी मुळीच पिणार नाही ती.'

'माझी शपथ आहे नाही प्यालात तर.'

जेवता जेवताच कृष्णकान्त उठून उभा राहिला. त्याने सुरभीला दोन्ही हातांनी घट्ट आलिंगन दिले. आणि आतापर्यंत कधी घेतले नव्हते इतक्या प्रेमाने तिचे एक चुंबन

घेतले. सुरभीचे भानच हरपले. आपण चंद्रकिरणात न्हात असल्याचा भास तिला झाला.

बशीत दुसरा पदार्थ वाढायला आलेला बटलर किंचित हसून मागे फिरला. आतल्या दारातून तो गुपचुप ते चुंबन दृश्य पाहात होता. त्याबद्दल त्याला प्रणयाचा ईश्वर निश्चितच क्षमा करील.

'आता मीच तुम्हाला देत जाईन रोज.' पतीच्या आलिंगनातून सुटका करून घेत सुरभी म्हणाली.

'आणि तुला काय वाटलं तुला न आवडणारं हे आसव मी पीत जाईन म्हणून ? हँग इट ऑल ! (चुलीत घाल ते.)' असे म्हणून कृष्णकान्तने पेला आणि बाटली खिडकीच्या बाहेर फेकून दिली. सुरभी तिकडे पाहातच राहिली.

रंजन अजून गातच होती–

पायल मोरी बाजे झनक झनक–

# 20. मिरवणुकीच्या रात्री

धन्य तो धन्यचि पुण्य प्रदेश
आमचा गुणी गुर्जरदेश !
कृष्णचंद्राच्या धवल कौमुदीने
बनविला प्रभूने अपुला देश
आमचा गुणी गुर्जरदेश !

—न्हानालाल

आज जनार्दनच्या आश्रमात उत्साहाचे वातावरण होते. अहिंसेचे प्रतीक असलेला पांढरा ध्वजसुद्धा फडकवायचा नाही असा सरकारी हुकूम निघाला होता. आणि तो तोडण्याची तयारी सगळ्या आश्रमवासियांनी केली होती. सकाळी एक मिरवणूक काढण्याचे जाहीर झालेच होते. जनार्दनने मिरवणुकीचा कार्यक्रमही ठरवून टाकला होता. मिरवणुकीच्या आधी एक संपूर्ण रात्र जायची होती. परंतु उत्साहाने उचंबळलेली ती मंडळी शांतपणे रात्र घालवतील अशी शक्यताच नव्हती. हजारो वर्षांपासून शौर्याचा अनुभव न घेतलेल्या गुजरात्यांचे एक छोटे टोळके आज वीररसाने ओतप्रोत भरून गेले होते. थयथय नाचणाऱ्या घोड्यावर चढून बसलेल्या वीराची अधीरता त्या सर्वांच्या चेहऱ्यावर स्पष्ट दिसत होती.

जनार्दनच्याही डोळ्यांत तेज चमकत होते. तो मनात म्हणत होता, 'गुजरातची ही मर्दुमकी कायम टिकली पाहिजे.'

क्षणभर त्याच्या मनात उत्साह दुथडी भरून वाहू लागला. उत्साहांच्या आवेशात त्याने सहजच मान उंचावली. ज्या जागी एरवी स्मशान शांतता असे तिथे आज त्याने जिवंत झरा वाहविला होता. गाढ झोपेत सुस्तीत पडलेल्या समाजाच्या एका अंशाला त्याने आज धावायला लावले होते. फटाक्याच्या आवाजानेही ज्यांच्या हृदयाचा

थरकाप उडावा त्यांच्याही हृदयात बंदुकीच्या आवाजाने फक्त तिरस्कारच निर्माण होईल, अशी परिस्थिती त्याने आज घडवून आणली होती. त्याचे पाप आता जळून भस्म होणार होते. त्याची तपश्चर्या आज फळाली होती. दुर्बलांना ईश्वर बनवणारी संजीवनी आज त्याच्या हातात आली होती. त्याच्या साधनेतून आज त्याला सिद्धी मिळाली होती. . . .

खण्ण !

दूर झांजा किणकिणल्या. झांजांचा आवाज ऐकून अहंकारात गुरफटून चाललेला तो साधक एकदम चमकून भानावर आला.

'जीवनाची प्रेरणा मी नाही का दिली ?' क्षुब्ध झालेल्याच्या अहंभावाने प्रश्न केला.

खण्ण !

पुन्हा झांजांचा आवाज आला.

'मी कोण ?' झांजांच्या किणकिणीबरोबरच जनार्दनच्या हृदयात प्रतिप्रश्न उभा राहिला. धना भगतला धरून किसन अंधारातून उजेडात आला. जणू जनार्दनच्या प्रश्नाचे उत्तरच त्याने दिले !

'या या भगत ! आता तुमचीच आठवण करीत होतो मी.' जनार्दनने धना भगतला आपल्याजवळ बोलावले. अहंकाराच्या गर्तेत वाहात जाणाऱ्या त्याच्या मनाला या आंधळ्या भगतचा आधार मिळाल्यासारखे वाटले.

'भाऊ, भगवंताची आठवण करावी. त्याची कृपा होईल तर तिळाचासुद्धा मेरू पर्वत बनू शकेल.' धना भगत जनार्दनच्या शेजारी बसत म्हणाला.

दोन-तीन आश्रमवासी एकमेकांकडे पाहून हसले. एकजण हलकेच म्हणाला, 'परमेश्वराला दुसरा काही धंदाच दिसत नाही.' सगळ्यांना काही त्याचे बोलणं ऐकू आले नाही.

'खरं आहे भगत तुमच म्हणणं.' जनार्दन म्हणाला, 'तसं नसतं तर एवढ्या मोठ्या राजसत्तेविरुद्ध उभं ठाकण्याची ताकद आमच्यात आलीच नसती.'

'सत्यासाठी मरणारालाच मोक्ष मिळतो. मात्र त्यानं मरणाचा मोह धरता नये.' धना भगतच्या या शब्दांनी मृत्यूचे मूल्यच कमी झाले. अहंकारामुळे आलेला मृत्यूही डागाळलेला असतो. सत्त्वगुणापेक्षाही त्यामागची मनाची भूमिका महत्त्वाची असते, हेच त्या अस्पृश्याने सूचित केले होते. गुणांच्या पलीकडे गेल्यानंतरच मानवाला ईश्वरा-समीप जाता येते. सत्त्वगुण अंगी बाणणाऱ्याच्याही तो पुढे जाऊ शकतो.

आपल्या तरुण सहकाऱ्यांच्या पवित्र आणि सात्त्विक उत्साहाला आणखी विशुद्ध

बनवण्याची जरूरी आहे, हे जनार्दनला पटले. तो स्वतः मधाशी अहंकारात गुरफटला जात होता. मग स्वदेश-स्वधर्म-स्वाधिकार (स्वराज्य) या आदेशांचे पालन करणारे हे तरुण त्यात गुरफटले गेले नसते तरच आश्चर्य ! सगळ्यांच्यातला 'स्व' नाहीसा झाल्याशिवाय परमशुद्धी कधीच मिळत नाही.

'भगत, मी तुम्हाला बोलावलं ते ईश्वरस्मरण करण्यासाठी. ते केलं नाही तर मी आणि माझे हे मित्र यांना 'सत्यकर्म करणारे फक्त आम्हीच' असा वृथाभिमान वाटू लागेल. एखादं भजन म्हणा ना.'

'जनार्दननं आता संन्यासी बनावं. पण संन्यास घेतल्यावर त्यानं इथं राहू नये हिमालयात जावं. नाहीतर आपल्या सगळ्यांना तो भजन्ये बनवून टाकील.'

जनार्दनला ऐकू येणार नाही अशा बेताने सगळे आश्रमवासी आपापसात बोलत होते. जनार्दनची ही वाढती धार्मिक वृत्ती कोणालाच पसंत नव्हती. त्यांच्या मते प्रत्येक गोष्टीत ईश्वरस्मरण करण्याचा आग्रह म्हणजे वेळ आणि शक्तीचा दुरुपयोग होता.

'अजूनही हिंदुस्थान धर्मानं तृप्त झालेला दिसत नाही.' कोणीतरी बडबडले.

तरीसुद्धा जनार्दनने ठरवल्याला विरोध करण्याचे धाडस कोणी दाखवले नाही. ईश्वरस्मरणाची गरज प्रत्येकालाच भासते असे नाही. प्रार्थनेवर ज्यांचा विश्वास नाही ते प्रार्थनेत सामील होत नाहीत. तरीसुद्धा अनेकदा प्रार्थना गीतातील रसाळ शब्द, त्या शब्दातील भाव, शब्दांचे गांभीर्य यांचे आकर्षण नास्तिकांनाही वाटतेच. आणि मग तेही प्रार्थनेत सामील होतात !

शेवटी देशभक्तांनी प्रजेच्या भक्ताचे सहाय्य घेतले. धना भगतने आपली एकतारी झणकारली. झांजांचा गोड किणकिणाट केला.

'तुम्ही काय गाणार धना भगत ?' एकाने न राहावून विचारले.

'येईल तसं भगवंताचं नाव घेईन. दुसरं काय ?'

'भगवंताचं नाव आता खूप झालं. जरा थोडं बाहू स्फुरण पावतील असं गा की, आम्ही उद्या रणावर निघालो आहोत.' एका शूराने सुचविले.

'असं होय बापा ? बरं बरं, रणात जा. पण मित्रांनो, ईश्वराच्या मार्गावर भित्र्याचं पाऊल कधी पडत नाही हं. भक्ती दुधारी तलवारीपेक्षाही तीक्ष्ण असते. त्यातही शेवटी मरावं लागतं.'

असे म्हणून धना भगतने एकतारीच्या आवाजात आपला आवाज मिळवला आणि तो गाऊ लागला.

भावनेने भारले । मस्तीने पेटले
मत्याचे शूर शिपाई आनंदात नाहले ।
कापिले स्वहस्ते शिर । भरिले जोगियांचे खापर
मत्याचे शूर शिपाई आनंदात नाहले ।
वाजतो डका । गाजतो नाद ।
भरला शंखात सोऽहं सोऽहं नाद ।
मत्याचे शूर शिपाई. . .
तप हा तीर । भक्तीचाच भाला ।
प्रेमाची तलवार, खेळती संतवीर ।
मत्याचे शूर शिपाई. . .
झुंजती धीरवीर । खेळती मर्द खेळ ।
काम-क्रोध-लोभ जाहले चूर ।
मत्याचे शूर शिपाई. . .
घेतली शपथ । नाही मरण चुकत ।
द्वार मुक्तीचे ठाके समोर ।
मत्याचे शूर शिपाई. . .
डोळे भरून पाहत । आत्म्याची ज्योत तेज ।
तळहाती घेऊन शिर, मरणा तयार ।
मत्याचे शूर शिपाई. . .

सुरुवातीला धना भगत एकटाच गात होता. थोड्या वेळाने किसनने त्याला साथ द्यायला सुरुवात केली. मग जनार्दनही गाऊ लागला. हसू, रडू आणि संगीत ही मानवी मनाची भावत्रिवेणी आहे. एकदा त्यांचा प्रवाह सुरू झाला की, सर्वजण त्या प्रवाहात ओढले जातात. आताही तसेच झाले. सुरुवातीला संगीताच्या एकदोन शौकिनांनी आपले सूर त्यांच्यात मिळवले. सगळ्यांचीच हृदये हेलावली. आणि मग ज्यांना राहावले नाही त्यांनीही गीत म्हणायला सुरुवात केली.आता गीत वाढत चालले. अनेक आवाज असूनही त्यातून एकच नाद, एकच ताल स्पष्ट उमटत होता. अनेकतेतून एकाचेच दर्शन घडवणाऱ्या या समूहसंगीताने बाकीच्यांनाही आपल्या प्रवाहात ओढले. आणखी थोड्यावेळात सर्वच व्यक्ती ते गीत गाऊ लागल्या.

गीताने भारावून गेलेल्या त्या मंडळींना गीताच्या नादात आपल्या मागे चार-पाच

सरकारी अधिकारी यऊन उभे राहिले आहेत, हेही कळले नाही. नदीच्या वेगात सगळेच ओढले जातात. कित्येक पर्वत, टेकड्या तिच्या प्रवाहात निश्चल उभ्या राहातात. नदीला आपला प्रवाह बदलायला लावतात. पहाडासारखे सरकारी अधिकारी अशा संगीत प्रवाहाच्या मार्गात उभे राहिले तर मात्र त्यांची आतापर्यंत न डळमळलेली प्रतिष्ठा डळमळित होते. म्हणूनच की काय अधिकारी संगीतापासून लांबच राहिले. राज्यकारभारात संगीताच्या मृदुपणाला अवसरच नसतो. आर्यस्मृतिकारांनी आपले नियम श्लोकबद्ध रचनेत करून संगीताचे महत्त्व मान्य केले आहे. परंतु दयाघन येशूचे अनुयायी असलेल्यांच्या राज्यकारभारात मात्र गोडव्याची जरूर असल्याचे जाणवत नाही. कर्कश, कठोर आणि कठीण गद्यात लिहिलेले त्यांचे नियम हे कोणत्या कठोरतेचे प्रतिबिंब असतील"?

' हे काय सोंग आणलंय ? अशी भजनं गाऊन कुठे स्वराज्य मिळतं ?'

नृसिंहलालने आपल्याजवळ बसलेल्या एका पोलीस अधिकाऱ्याला म्हटले. तो अधिकारीही हसू लागला. ईश्वराचे सहाय्य मागणारे हे असहाय्य पामर मानव शस्त्रज्ज आणि कार्यक्षम ब्रिटिश सत्तेच्या समोर उभे राहू शकतील हे त्याला मान्यच नव्हते. लोकांचे हे वेडे प्रयत्न हास्यास्पद होते. तो हसला आणि म्हणाला,

' बघा की नृसिंहलालजी ! स्वराज्य मिळेल तेव्हा मिळेल; पण त्या निमित्ताने आंधळ्या-पांगळ्या कीर्तनकारांना, धंदा-रोजगार नसलेल्या बेकारांना आणि दुसऱ्याच्या पैशाने मजा करणाऱ्या खटपट्यांना भाकरी नक्कीच मिळेल ! '

विरुद्ध पक्षाचा उपहास करायला नेहमीच बरे वाटते. परंतु नृसिंहलालला मात्र आपल्या सहकाऱ्याची ही टीका तितकीशी पटली नाही. धना भगत आंधळा होता खरा. तसा कोणी एखादा अपंग या जमावात असेलही. एखादा धंदा नसलेला गरीब लाचार आणि खाजगी झगड्यातून आपले पोट भरू पाहाणारा लटपट्याही त्यांच्यात मिसळला असेल. हे सगळे खरे असले तरी स्वत: जनार्दन सुसंस्कृत होता. अरुणने उच्च शिक्षण घेतले होते. आणि खुद्द नृसिंहलालचाच मुलगा त्यांच्यात सामील झाला होता. त्यांना गरीब, लाचार किंवा लटपटे म्हणता आले असते का ? या चळवळ्यांच्यात असे काय आकर्षण होते, की सरकारचे मीठ खाणाऱ्या इमानदार अधिकाऱ्यांची शिकली-सवरलेली, सुसंस्कारी मुलेसुद्धा यांच्यात सामील व्हावीत ?

नृसिंहलालचे विचार थांबले. भजन एकाएकी बंद झाले. वातावरणात शांतता पसरली होती. परंतु त्या शांततेतही गीताची अबोल आंदोलने उफाळून आलेली होती. क्षण-दोन क्षणाच्या हृदय हेलावून सोडणाऱ्या त्या नि:शब्दतेनंतर कोणीतरी मोठ्याने

म्हटले, 'वंदे . . .

एकत्र जमलेल्या सगळ्यांनी तारस्वराने वाक्य पुरे केले– 'मातरम् !'

पुन्हा एकदा सगळ्यांनी घोषणा दिली–

'वंदे मातरम् !'

मातेला सर्वांचे वंदन ! अंध असो की अपंग, दुष्ट असो की साधू, अमीर असो की गरीब, राव असो की रंक, विद्वान असो की अशिक्षित, त्या सर्वांचेच वंदन मायभूमी स्वीकारते. सगळ्यांना आपल्या छातीशी धरते, आपल्या मांडीवर झोपवते. माता आणि मातृभूमी यांना स्वर्गापेक्षा महान म्हटले आहे त्यात चूक काय ?

जगातल्या कोणत्याही राज्यसत्तेत जोपर्यंत मातृत्वाची भावना निर्माण होत नाही तोपर्यंत ती राज्यसत्ता कठोरच राहाणार. अशक्त आणि अपंग यांना उपाशी मारणारी. मानसिक दृष्ट्या दुर्बल आणि म्हणूनच दयेला पात्र असणाऱ्या आजाऱ्यांना त्यांच्या चुकांची शिक्षा म्हणून कैदेत ठेवणारी, उच्चनीच, गरीब श्रीमंत हे भेद कायम राखणारी, हार-जितीचे, तलवारबाजीचे खेळ शेजारच्या प्रजेशी खेळून कायम झगडे करणारी राज्यसत्ता ही वंदनीय माता बनत नाही ती रुधिरप्रिय राक्षसी आहे. वंदे मातरम्च्या जयघोषाने हिंदवासी लोक जिला अभिवादन करतात त्या मातेला रक्त आवडत नाही. ही परम सात्त्विक जननी सर्व जगाला अहिंसा, दया आणि प्रेम यांचा संदेश देत उभी आहे. मानवजातीचा विकास पशुतेवर अवलंबून नाही, तर प्रेमावर अवलंबून आहे. याचे मूर्तिमंत प्रतीक बनलेल्या त्या मातेला सदा वंदन असो !

'वंदे . . . मातरम्'

जयघोष चालूच होता. अरुणने जथ्याच्या पाठीमागे उभ्या असलेल्या पोलीस अधिकाऱ्यांना पाहिले होते. त्यातल्या आपल्या एका जुन्या दोस्ताला, रहीमखानलाही त्याने पाहिले होते. रहीमखान मॅजिस्ट्रेट होता.

दोघेहीजण कॉलेजात एकत्र होते. कॉलेजात असताना अरुण आणि रहीम या दोघांचीही महत्त्वाकांक्षा एकच होती. हिंदुस्थानच्या स्वातंत्र्यासाठी त्यांनी अनेक योजना आखल्या होत्या. अभ्यास पूर्ण केल्यावर अरुण हिंसावादी क्रांतिकारकांना मिळाला, तर इंग्रज सरकारने मुसलमानांना आपल्याकडे ओढून घेण्यासाठी आखलेल्या योजनांचा लाभ मिळवून रहीम एकदम चांगल्या नोकरीवर लागला होता.

त्यात रहीमचा काही दोष नव्हता. अरुणचे वडील एक अधिकारी होते. त्याने स्वतः संयम पाळून आपल्या गरजा खूपच कमी केल्या होत्या. त्यामुळे त्याला आर्थिक अडचण सहन करावी लागत नव्हती. उलट रहीम एका गरीब मुसलमानाचा मुलगा

होता. त्याच्या वडिलांनी काढलेले अफाट कर्ज त्याला फेडायचे होते. कुटुंबाच्या पोषणा पोषणाची जबाबदारी त्याच्यावरच होती. त्यात त्याचे लग्नही लहानपणीच झालेले होते. ताबडतोब पैसे मिळवण्याशिवाय त्याला दुसरा उपाय नव्हता. हिंदू-मुस्लीम ऐक्यातून निर्माण होणाऱ्या प्रचंड राष्ट्रवादाचा पडसाद ऐकणाऱ्या परदेशी राज्यसत्तेने त्या राष्ट्रवादापासून आपला बचाव करण्यासाठी दोन्ही जमातींचा अहंभाव जागृत करायला सुरुवात केली. आणि मुस्लिमांना सरकारी नोकरीत खास सवलती देण्याचे धोरण स्वीकारले. त्यांचा अहंकार ती सुखवू लागली. गरीब रहीमला जेव्हा एकदम डेप्युटी कलेक्टरची नोकरी चालून आली तेव्हा अरुणनेच त्याला ती नोकरी स्वीकारण्याचा आग्रह केला होता.

अरुणच्या या आग्रहामागे काही विशेष अर्थ होता. रहीमचा योग्य वेळी आपल्याला चांगला उपयोग करून घेता येईल असा त्याचा विचार होता. हिंसात्मक क्रांतिवाद्यांच्या गुप्त प्रचारकार्यात सरकारी नोकरीलाही एक विशिष्ट स्थान होते.

रहीम मात्र कॉलेजातली सगळी स्वप्ने विसरून गेला. आणि सरकारी नोकरीच्या अंगाचे तो एक उपयुक्त अंग बनून गेला. हिंसात्मक क्रांतिवाद्यांचे विविध प्रकारचे कार्यक्रम पाहिल्यानंतर अरुण एका वर्षासाठी अहिंसेचे पालन करायला तयार झाला होता. अहिंसेचा क्रांतीला विरोध नाही, तिचा खून-मारामाऱ्यांना विरोध आहे. प्रस्थापित सत्तेचा क्रांतीला विरोध आहे. मग ती क्रांती हिंसात्मक असो की अहिंसात्मक. राज्यसत्तेच्या काही असह्य कमतरतेतून क्रांतीचा जन्म झाला आहे. व्यक्तीप्रमाणेच समष्टीलाही मिथ्याभिमान होतोच. राज्यसत्तेला आपला कमीपणा किंवा उणिवा कधीच दिसून येत नाहीत. म्हणूनच त्या उणिवांकडे कोणी बोट दाखवले की सत्ता त्याला आपला शत्रू समजते. मग अशी उणीव दाखवणारा दयेचा सागर कोणी गांधी असो की झारच्या साऱ्या कुटुंबाचे कंदन करणारा एखादा वज्रहृदयी लेनिन असो !

अरुण आणि रहीम हे दोघे मित्र आता विरोधी पक्षात होते. उद्या सकाळी ध्वजाच्या मिरवणुकीचे भूत उभं करून लोकांना भलत्याबुऱ्या मार्गांनी चिथावण्याचा प्रयत्न करणाऱ्या जनार्दन आणि अरुणसारख्या चक्रमांना समजावण्यासाठी, त्यांची समजूत पटली नाही तर त्यांना धमकी देण्यासाठी मॅजिस्ट्रेट आणि पोलीस अधिकारी तिथे आले होते.

दोघांचेही धर्मसंकट उभे ठाकले होते. अरुण आणि रहीम जानी दोस्त होते. खुद्द पोलीस अधिकारी नृसिंहलालचा मुलगा कंदर्प स्वतःच ध्वज घेऊन मिरवणुकीच्या आघाडीवर चालणार होता !

'या या मॅजिस्ट्रेटसाहेब! या नृसिंहलालजी या, बसा.' 'वंदे मातरम्' चा जयघोष हवेत विरल्यानंतर जनार्दनने नम्रपणे दोन्ही अधिकाऱ्यांचे स्वागत केले.

अहिंसावादात कोणाही व्यक्तीबद्दल शत्रुत्वाची भावना बाळगायला मुळीसुद्धा वाव नसतो. अहिंसावादाचे शत्रुत्व फक्त काही सामाजिक घटनांशी त्या घटना ज्यामुळ घडून येऊ शकतात अशा विचारप्रणालीशी असू शकते व्यक्तीशी त्याचे वैर नाही. परंतु व्यक्तीत आविष्कार पावलेल्या असभ्य, क्रूर, मनाशी त्याचे वैर आहे. अहिंसावादाला व्यक्तीचा नाश करायचा नाही. तर उलट व्यक्तीचा हृदयपालट करून तिला आपल्या कार्यात सामील करून घेण्यावर अहिंसावादाचा विश्वास आहे. बंध आणि मोक्ष यांचे कारण मनच असते, शरीर नाही. या गीतेच्या महाकाव्याला तत्त्वज्ञानाच्या बंदिस्त पेटीतून बाहेर काढण्याचे आणि सर्वसामान्य जीवन व्यवहारातही उपयोगात आणण्याचा प्रयोग करण्याचे सामर्थ्य अहिंसेत सामावलेले आहे.

म्हणून राज्यसत्तेविरुद्ध लढायला तयार झाल्यावरही अंमलदाराच्या विरुद्ध अहिंसावाद्यांत वैरभाव उत्पन्न होता कामा नये. जनार्दनसारखा अहिंसावादी स्वतःच्या विरुद्ध असलेल्या अंमलदारांनाही मोठ्या नम्रतेने बसायला सांगणारच.

मॅजिस्ट्रेट आणि नृसिंहलाल येऊन जनार्दनजवळ बसले.

# 21. चळवळीमागील प्रवाह

**एक दिवस अमृत झरा**
**झुळझुळ वाहील**
**पृथ्वीलाही भिजवील**

**—मगनभाई**

जनार्दनचा हा प्रयोग प्रारंभातच उखडून काढण्यासाठी हे अंमलदार आलेले आहेत असे आश्रमवासी हळूहळू आपापसात कुजबुजत होते. आणि त्यांची मने वैफल्यपूर्ण उत्साहाने भरून गेली. काय वाटेल ते होवो, मिरवणूक काढायचीच असा निश्चय मनातल्या मनात केला होता. पोलीस अटक करतील, मारतील, गोळीबार करतील सगळ्यांनीच तरीसुद्धा आपला निश्चय ढळू द्यायचा नाही, असे सर्वांनीच मनाशी ठरवले होते. अधिकारी काही बोलण्यापूर्वीच सगळ्यांची मने अशी कडवट भावनेने भरून गेली होती. तेवढ्यात रहीमने विचारले, 'अरुण कुठे आहे?'

मॅजिस्ट्रेट रहीम आणि अरुण यांची मैत्री आहे हे फारच थोड्यांना माहीत होते. एखादेवेळेस अरुण त्याला भेटायला जात असे. तेव्हा सगळ्यांना वाटे की सरकारी अंमलदार चळवळ्यांना बोलावून घेत असत त्यातलाच हाही एक प्रकार असावा. नृसिंहलालला मात्र रहीमनेच आपल्या आणि अरुणच्या मैत्रीची कल्पना दिली होती. त्यामुळे त्याला या दोघाच्या संबंधाची पूर्ण कल्पना होती.

'का रे? इथेच आहे मी!' धना भगतच्या बाजूला बसलेला अरुण म्हणाला.

'वा दोस्ता! मी तुलाच शोधत होतो.' रहीम म्हणाला.

'शोधतोस कशाला? वॉरंट नसलं तरी मी तुझ्यासमोर हजर राहीन.' हसत-हसतच अरुण म्हणाला.

एक राज्यद्रोही आणि एक सरकारी नोकर हे दोघेही असे हसत हसत एकमेकांना

एकेरी संबोधताना ऐकले तेव्हा ऐकणाऱ्यांना आश्चर्य वाटणे साहजिकच होते. परंतु अहिंसात्मक युद्धात विरोधीसुद्धा वैरी नसतो. उलट वैराने धुमसणारा वैरीसुद्धा अहिंसेच्या योद्ध्याला हसताना पाहून आपले वैर विसरून जातो. मग हे दोघे तर मित्रच होते.

'अस्सं होय. मग चल तर. माझ्या संरक्षणाखाली ये बघू.' हसत-हसत असे म्हणत रहीम उठून उभा राहिला. त्याने अरुणचा हात आपल्या हातात घेतला आणि तो त्याला त्या कोंडाळ्यातून बाहेर घेऊन गेला.

नृसिंहलाल हे दृश्य पाहातच राहिला. मित्राला मित्राविरुद्ध, बापाला मुलाविरुद्ध, आईला मुलाविरुद्ध उभे राहावे लागावे हा काय चमत्कार हिंदुस्थानात झाला आहे ?

'काय चमत्कारिक प्रसंग आहे बघा हा. मॅजिस्ट्रेट अरुणचे जानी दोस्त. आणि त्यांनाच अरुणला पकडायचा हुकूम द्यावा लागणार आहे.' नृसिंहलालने प्रसंगाचे क्रौर्य जनार्दनला दाखवून दिले.

'पण पकडायचे कारण काय ?' जनार्दनने विचारले.

'कारण एवढंच की, मिरवणूक काढायचा मनाई हुकूम तुम्ही पाळणार नाही. मग दुसरं काय होणार ?'

'मग मनाई हुकूम मागे घ्या !'

'असं कधी होतं का ?'

'आमच्या कार्यातली सचोटी आधी पाहा. मग मनाई हुकूम मागे घ्यायला काय हरकत आहे ?'

'नाही, नाही. तुम्ही हे एवढं वादळ उठवलं आहे, त्यामुळे किती कुटुंबांच्यात झगडे निर्माण झालेत त्याचा विचार केला आहे का कधी ?'

'कंदर्प, जरा इकडे ये बघू.' नृसिंहलालचा प्रश्न ऐकून जनार्दनने नृसिंहलालच्या मुलाला जवळ बोलावले. तो येऊन दोघांजवळ उभा राहिला. किशोरावस्थेतून यौवनात पाऊल टाकणारा, निष्पाप, निरागस, किंचित लाजरा, परंतु उत्साही कंदर्प. जनार्दनने आपल्याला 'चळवळीत पडू नकोस' असे पुन्हा एकदा सांगण्यासाठी इथे बोलावले आहे हे त्याला समजले.

'बघ बाबा, तू अजून शहाणा हो. तुझ्या वडिलांना अडचणीत नको टाकूस. त्यांचं मन सांभाळायला हवं ना ?' जनार्दनने कंदर्पला समजावीत म्हटले.

वडिलांच्या मनाला थोडेसुद्धा दुःख होईल असे काही हातून घडले की, स्वतःच दुःखी होणाऱ्या अनेक सहृदयी मुलांना या अहिंसात्मक युद्धाने आगीत उभे केले आहे. एकीकडे

वात्सल्याची मूर्तीच असलेले मातापिता आणि एका बाजूला युगधर्माची परम आकर्षक प्रतिमा ! या हृदयांच्या व्यथेची कल्पना यायची तर त्यासाठी पुत्राला मृत्यूची शिक्षा फर्मावणारा ब्रूटस तरी बनावे लागेल, किंवा पित्याचे वचन पाळण्यासाठी पित्याला मरणांतिक धक्का देणारा राम तरी बनावे लागेल. कंदर्पाच्या चेहऱ्यावर विषाद दाटून आला.

'ते नाही होणार माझ्याच्यानं.'

'मिरवणुकीत जायचं सोडून दे.'

'ते शक्य नाही.' कंदर्प ठासून म्हणाला.

'चुकतोयस तू. देशाची सेवा करण्याचा एवढा एकच मार्ग नाही. तू मिरवणुकीत गेला नाहीस तर देशहिताची तुझी कळकळ कमी नाही होणार.'

'तुम्हीच मिरवणूक रद्द केलीत तरच ते शक्य होईल. त्याशिवाय नाही.' कंदर्प म्हणाला.

झेंडा-मिरवणुकीच्या या कृतीच्या मागे एक महान भावना सामावली आहे, अशी कंदर्पची भावना होती. आणि त्याच भावनपोटी तो मिरवणुकीत सामील झाला होता.

ब्रिटिश प्रजेच्या सार्वभौम सत्तेच्या अमलाखाली तयार झालेल्या हिंदी प्रजेच्या मनाचे तीन प्रकार आपल्याला सहज दिसून येतात. मराठ्यांच्या प्रांता-प्रांतातून फिरले तर वावटळीसारखे नाश करणारे सैन्य, शिथिल पडलेल्या मुस्लीम सत्तेचे सगळ्यांना हादरा देणारे मृत्यूपूर्वीचे आचके, हिंदू आणि मुस्लीम हे दोन्ही राज्यकर्ते दुर्बल बनले आहेत याची साक्ष देणारे लुटारू, ठग आणि पेंढाऱ्यासारख्या लुटारूंच्या राज्याश्रय मिळाल्याने किंवा सत्तेने दुर्लक्ष केल्यामुळे, सजीव होऊन सगळ्यांना पीडा देणाऱ्या संघटित टोळ्या. या प्रत्येकातील क्षणोक्षणीच्या अनिश्चिततेमुळे बेजार झालेल्या समाजाचे दुःख ! या दुःखी प्रजेला ब्रिटिश राज्यसत्तेचा कारभार इतका काही पसंत पडला की ती आनंदाने गाऊ लागली.

गरिब बिचाऱ्या त्या बकरीचा
कोणी न आता पकडी कान !
हा तर उपकार परमेशाचा
आनंदी हो तू, हिंदुस्थान !

हा आनंद अनुभवणारे मन हा पहिला थर.

ह्या सुव्यवस्थित शांततेचा पूर्णपणे उपयोग घेतला जाण्यापूर्वीच ही शांतता हळूहळू असंतोषाने धुमसू लागली. ब्रिटिश राज्यशाहीला बाकी सगळे काही जमले, जमले

नाही एकच– तिला हिंदी किंवा हिंदवासी मात्र होता आले नाही. देशात शांतता निर्माण झाली होती निश्चित. पण देशाचा आत्मा कशाने तरी गुदमरला होता. आता कोणी बकरीचा कान पकडत नव्हते हे खरे. परंतु बकरीचा कान पकडायचीही ताकद प्रजेत उरली होती कुठे ?

प्रश्न उपस्थित झाला तर त्याचे निराकरण केल्यानेच सुटका होणार, प्रजेच्या ताकदीचा विचार केल्यावर जिज्ञासूच्या लक्षात आले की ह्या निःशस्त्र प्रजेत बकरीच्या समोर उभे राह्यचेही धैर्य उरलेले नाही. नुसते धैर्यच नव्हते असे नाही, तर प्रजेच्या अर्धपोटी देहात बकरीचा कान पकडण्याचेही बळ नाही. राज्यकर्त्यांचे मोठेपण त्यांच्या प्रजेच्या ऐश्वर्यावरून मापले जाते प्रजेमध्ये सुख-शांती पसरवणाऱ्या राज्यकर्त्यांन लोकांनी विचारायला सुरुवात केली.

'ईश्वराच्या लाडक्या बाळांनो, तुम्ही आम्हाला शांतता मिळवून दिलीत खरी, पण आमचं बळ कुठं नाहीसं केलंत ?'

घाबरत घाबरत विचारणाऱ्या आपल्या प्रजेचा तो दुबळा आवाज ऐकून अट्टाहास्य करीत राज्यसत्ता उत्तरली.

'बळ ? तुम्हाला बळाची काय जरूरी ? शांतीतच सुख माना !'

'नाही, नाही. हे ख्रिस्त्यांनो, आम्हाला ताकद मिळवून देणारा व्यायाम थोडा थोडा तरी करू द्या. ही शांतता आम्हाला आजाऱ्याच्या अशक्तपणासारखी वाटते आहे.'

'तुमचं बळ आम्हीच ! मग तर तुमचं काही म्हणणं नाही ना ? राज्यसत्तेने आश्वासन दिले.

'बरं चालेल ! पण मग तुम्ही-आम्ही एक ना ?' प्रजेतील काहीजणांनी विचारले.

'कृतघ्न हिंदवासियांनो, तुम्हाला आमची कदर आहे कुठे ? आम्ही आलो नसतो तर तुम्हाला अफगाणांनी खाल्लं असतं, चिन्यांनी खाल्लं असतं, रशियनांनी खाल्लं असतं जपान. . . .'

'साहेब, बेअदबी माफ करा. पण आतासुद्धा आम्हाला खाऊनच टाकलेलं आहे ना ? अफगाण किंवा इजिप्त यांनी खायच्या ऐवजी तुम्ही . . .'

'जबान बंद करा !'

'मेहरबान, असे रागावू नका. आम्ही जरा कडक शब्द वापरले. आमच्या भल्या-करताच आपण राज्य करण्याची ही भयंकर तकलीफ सहन करीत आहात, असं आपण म्हणता ना ? आम्ही तुमचं हे औदार्य मान्य करतो. परंतु आम्हाला जरा एकदा तरी

विचारा ना की आमचं भलं आम्हाला कशात आढळतं आहे!'

एवढंच पाहिजे ना तुम्हाला ? ठीक. विचारू तुम्हाला एक-दोन वेळा. बस्स!'

प्रजा तावडतोब खूष झाली. हा हिंदी मनाचा दुसरा थर.

संबंध आता दुसऱ्या भूमिकेपर्यंत येऊन पोचला होता. हिंदी प्रजेचा आवाज ऐकण्यासाठी थोडी वाद्ये आणि वाद्यगृहे बनवली गेली. न सुधारलेली, सुधारलेली, लहान-मोठी कायदेमंडळे स्थापन केली गेली. आणि हक्क-अधिकारांच्या शब्दजाळाची भुलावणी सुरू झाली.

'झालं ना आता?'

परंतु तृप्तिसूचक 'बस' असे उत्तर मिळाले नाही. उलट पुन्हा प्रश्न विचारले जाऊ लागले.

'जो सल्ला फेटाळला जाऊ शकतो तो देण्याची जरूरी तरी काय? आमच्या सल्ल्याप्रमाणे तुम्ही का नाही वागत?'

'लोभी हिंदवासियांनो! भटाला दिली ओसरी अन् भट हातपाय पसरायला लागला. तुमचा सल्ला मान्य करण्यासारखा नसतो त्याला आम्ही काय करणार?'

'प्रजेचे प्रतिनिधी एकमताने– बहुमताने जे सांगतात ते न मानण्याइतका उर्मट-पणा तुमच्यात कशानं आला आहे?'

'कारण? या इकडे, कानात सांगतो. कोणाला सांगू नका हं. आम्ही तुमचे राजे आहोत, हे विसरू नका.'

'पण म्हणून काही तुम्ही आमचे प्रतिनिधी होत नाही ना? आणि जे आमचे प्रतिनिधी नाहीत त्यांचं राज्य आम्ही खपवून घेणार नाही.'

'हा उघड-उघड राज्यद्रोह आहे.'

'राज्य आमचं असेल तर तो राज्यद्रोह. राज्य आमच्यासाठी असेल तर तो राज्य-द्रोह. हा परराज्याचा द्रोह होईल फार तर!'

'हे, हे, तुम्हाला कोणी शिकवलं?'

'स्वातंत्र्याच्या मान्यवर पुजाऱ्यांनो! या शिक्षणाचे सारे श्रेय तुमच्याच खाती जमा झाले आहे. स्वतंत्र हिंदुस्थानच्या राजदरबाराच्या दरवाजावर आम्ही एक पाटी लावू, 'ब्रिटिशांशी आलेल्या संबंधाबद्दल हे स्वराज्य ऋणी आहे!' मग तर काही हरकत नाही ना तुमची?'

आणि या तिसऱ्या भूमिकेमुळेच हिंदुस्थान असा उभा ठाकलाय. अजून या तिन्ही भूमिका जिवंत आहेत. दिसून येण्याइतक्या ठळक आहेत. परंतु तिसऱ्या भूमिकेच्या

भाराखाली पहिल्या दोन्ही भूमिका पार दबून गेल्या आहेत, दिसेनाशा होत आहेत. आजोबांना ब्रिटिशांशी आलेल्या संबंधात ईश्वराची कृपा दिसून येते. तर वडलांना तो एक उत्तम योगायोग वाटतो. परंतु मुलाला मात्र तो हिंदुस्थानला गुदमरवून टाकणारा हिमालयासारखा पांढराशुभ्र बोजाच वाटतो. मग पिता-पुत्रांच्यामध्ये राजकारणावरून तीव्र मतभेद झाले नसते तरच नवल. म्हणूनच ब्रिटिशसत्तेच्या चक्रात खोलवर गुरफटला गेलेल्या नृसिंहलालचा विनयी, सुशील पुत्र कॉलेज सोडून राज्यसत्तेविरुद्ध उभा ठाकला यात काय आश्चर्य ?

कंदर्पला नृसिंहलालने खूप समजावले. जनार्दननेही त्याला पटवून देण्याचा प्रयत्न केला. तरीही तो आपल्या निश्चयापासून मुळीच ढळला नाही. या तालीमबाज गुर्जर तरुणाच्या मनात ध्वज घेऊन आघाडीवर चालण्याची महत्त्वाकांक्षा जागी झाली होती.

नृसिंहलालला खूप वाईट वाटले. त्याने आपला राग जनार्दनवर काढून त्याला दोष देत म्हटले,

'तुम्ही मुलांना असं आईबापांविरुद्ध चिथवता. त्याचं फळ चांगलं नाही मिळायचं तुम्हाला.'

'जग या मुलांचं आहे, आपलं नाही.' जनार्दनने शांतपणे उत्तर दिले.

भूतकाळाच्या पडद्यामागे सरकत जाणारे आईवडील भूतकाळाचे प्रतिनिधी आहेत. वर्तमानकाळ निश्चितपणे तरुण-तरुणींचा आहे. संपत्ती निर्माण करणारे माता-पिता संततीच्या बरोबरीनेच वर्तमानही निर्माण करतात. ते आपल्या अपत्यांना निरर्थक बनवू शकले तरच वर्तमानकाळ निरर्थक बनू शकेल. मुलामुलींत आईवडिलांच्या शरीरवैशिष्ट्यांचे केवढे साम्य दिसते ? तसेच मुलामुलींच्या मनातही आईवडलांचे प्रतिबिंब किती स्पष्ट दिसत असते. शांतता आणि शहाणपणा यांचा सल्ला आपल्या मुलांना देण्यापूर्वी आईवडिलांनी आपल्याच मनात खोलवर डोकावून पाहिले तर त्यांना आपल्या अपत्यांच्या अशान्त आणि बेचैन मन:स्थितीचे मूळ नक्कीच समजून येईल.

मुलाला ए. एस्. पी.,डी. एस. पी. बनवण्याची स्वप्ने पाहाणारा, त्या उद्देशाने त्याला मानसिक व शारीरिक शिक्षण देणारा पिता आपल्या पुत्राला लोकदलात सामील झालेला पाहून दु:खी झाला. तरुणांना नोकरीचा मोह न पडू देणाऱ्या देशभक्ताला त्याने मनातल्या मनात शाप द्यायला सुरुवात केली. अहमदाबाद काँग्रेसच्या वेळी स्वयंसेवक म्हणून काम करताना सुरेंद्रनाथ बॅनर्जींची गर्जना ऐकून आपल्याही मनात देशभक्तीची

तीव्र इच्छा झाली होती याचा मात्र आता नृसिंहलालला विसर पडला.

रहीम आणि अरुण बोलत बोलत पुन्हा घोळक्यात सामील झाले. तेवढ्यात कृष्णकान्त, सुरभी आणि रंजनही तिथे येऊन पोचले. त्यांना पाहाताच मॅजिस्ट्रेट रहीमला खूष करायच्या हेतूने एक पोलीस अंमलदार उपहासाने म्हणाला,

'हा दारुड्या गृहस्थ आता दारुबंदीच्या कामात पडला आहे.'

वाईट माणूस चांगला बनतो, चांगले म्हणवून घेतो, हेही आपल्याला खपत नाही. उणिवा विसरण्याची सवय आपण कधी लावूनच घेत नाही. त्यामुळे दोष काढण्याची आपली वृत्ती इतक्या थराला जाऊन पोचली आहे की दुर्गुणी गणल्या जाणाऱ्या माणसाने अंगातले दुर्गुण झटकण्याचा प्रयत्न केला तरी त्याचे दुर्गुण आपल्या लक्षात येत राहातात.

'मग त्यात तो वाईट काय करीत आहे?"

'स्वतः प्यायची आणि इतरांना मात्र मनाई करायची, यात काय अर्थ?'

'स्वतः खड्डयात पडलेला माणूस ओरडा-आरडा करून दुसऱ्यांना इशारा देतो यात वाईट काय? आणि कृष्णकान्तनं तर दारू सोडून दिली आहे.'

'ते सोडा साहेब, दारू काय अशी सुटते?'

यावर रहीम काहीच बोलला नाही. परंतु त्याच्या मनात विचार आला, 'माझ्या धर्मात सांगितलं आहे की दारूचा थेंब जरी शरीराच्या एका भागावर पडला तरी तो भाग कापून काढला पाहिजे. दारूबंदीच्या कामात सामील होणं हे प्रत्येक सच्च्या मुस्लिमाचं कर्तव्यच नाही काय?'

परंतु आपण एक सरकारी नोकर आहोत हे त्याच्या लक्षात आले. दारुबंदीच्या कामाला राज्यद्रोहाचा वास येतो.

'काय मॅजिस्ट्रेटसाहेब, इथूनच मिरवणुकीला मनाई करणार की काय?' कृष्णकान्तने चेष्टेने विचारले.

साहेबालाही लाजवेल असा पाश्चात्य धर्तीचा पोशाख करणारा श्रीमंत आज खादीच्या पोशाखात बाहेर पडला होता. या मानसिक परिवर्तनात कोणता संकेत असावा? इंग्रजी पोशाखाची गरज नाही, इंग्रजांसारखे दिसण्याचीही गरज नाही. कारण खुद्द इंग्रजांचीच आपल्याला आता गरज नाही, अशाच तऱ्हेची भावना, या वेषपालटात सामावली आहे हे कोणाला उमजणार नाही? गांधीटोपी नुसती पाहून दचकणाऱ्या, घाबरणाऱ्या अंमलदारांना त्या टोपीमागील भावनांचे अनिवार सामर्थ्य चक्रावून टाकते.

कृष्णकान्तचा खादीचा पोशाखही रुबाबदार होता. त्याची स्वच्छता डोळ्यांत भरण्यासारखी होती. पायाच्या मापाप्रमाणे बेतलेल्या पँटमध्ये त्याला पाहायची सवय झालेल्यांनाही मान्य करावे लागले असते की, कृष्णकान्तने धोतरही फारच सफाईदार रीतीने, निष्काळजीपणाने नेसल्यासारखे वाटावे इतक्या काळजीपूर्वक नेसले होते. शरीराच्या मापाप्रमाणे बेतलेले कपडे चांगले की शरीराच्या आकृतीची निव्वळ कल्पना देणारा, निरनिराळ्या तऱ्हेने देहाला लपेटून टाकणारा मोकळा काळा पोशाख चांगला याचा निर्णय कपड्यांचे तत्त्वज्ञानच करू शकेल. परंतु कृष्णकान्तची नेसण्याची ढब पाहिली की हास्यास्पद किंवा ज्याचा उच्चारही करू नये असे वाटणाऱ्या धोतरालाही पुरुषांच्या कपड्यात अजूनही महत्त्वाचे स्थान मिळू शकेल याबद्दल खात्री वाटत होती. त्याचा सदरासुद्धा वरच्या शरीरावर चापूनचोपून बसला होता. त्याच्या बाह्या बोटांपर्यंत पोचतील एवढ्या लांब नव्हत्या, की गळ्याला फास बसेल अशी कॉलरही त्याला नव्हती. त्याच्या टोपीचा तिरकेपणा मोहक होता. गुलामांचे सौंदर्य निरर्थक असते. कलंकरूपी असते. असे मानून शक्य तेवढे कुरूप दिसायचा महात्माजींनी निश्चय केला. प्रजेच्या पारतंत्र्याचे प्रतीक म्हणून खेडुतांच्या टोपीचा आदर्श म्हणून त्यांनी स्वीकार केला, असे गांधीटोपीच्या इतिहासात कदाचित सांगितले असेलही. परंतु आदर्श बंदिवानांच्या धगधगत्या वेषभूषेतही मोठी कला लपलेली आहे असे सांगणारी ती वेडौल गांधी टोपी रसिकतेच्या व्याख्येतही बसू शकते याची खात्री देत कृष्णकान्ताच्या मस्तकावर शोभून दिसत होती.

'आधी तुम्ही मिरवणूक काढा तर खरं. मग अडवायचं बघू.' रहीम म्हणाला.

'सगळी तयारी आहे. आम्ही फक्त सकाळ व्हायची वाट पाहात आहो.'

सामान्यत: सरकारी अंमलदारांची काळी बाजूच लोकांच्या नजरेसमोर येते. परंतु सत्याच्या या संग्रामात विरोधकांच्याही प्रेमाचे प्रसंग विसरून चालणार नाही. सत्याग्रही आणि शिपाई या दोघांमधल्या गोडीगुलाबीच्या प्रसंगाची आठवण अजूनही अनेकांना असेल.

'तलवारी आणि बंदुका सज्जच आहेत, बर का !' रहीमने चेष्टेने भीती दाखवली. मजेतसुद्धा असली भीती आपल्याच देशबांधवांना घालताना रहीमचे धडधडते मुस्लीम मन काळीज कापीत होते.

'द स्टील शॅल् रस्ट, सर !' (तुमचं ते लोखंड तसंच गंजून जाईल) कृष्णकान्त बोलून गेला. त्याच्या जिभेवर नकळत इंग्रजी भाषा येत असे. इंग्रजी भाषेचे उपकार हिंदुस्थान विसरणे शक्य नाही !

रहीम आणि त्याच्याबरोबरचे पोलीस अंमलदार निघून गेले. त्यांनी काय सांगितले असावे ते कोणालाच समजले नव्हते. परंतु अरुण आणि जनार्दन यांना मिरवणूक न काढण्याबद्दल समजवायला ते आले असावेत असाच सर्वांचा स्वाभाविक समज झाला होता.

त्यांना जाताना पाहून अनेक तरुण हसत होते. सरकारी अंमलदार आणि पोलीस खात्याचे नोकर हे हास्यास्पद, तुच्छ प्राणी असतात असा अनेक देशसेवकांचा समज झालेला असतो. ही समजूत अगदीच चुकीची आहे असे कसे म्हणता येईल ? परंतु जनार्दनला मात्र ही तिरस्कार करण्याची प्रवृत्ती मुळीच आवडली नाही. तिरस्कारातूनच हिंसा जन्माला येते.

विरोधकांबद्दलसुद्धा प्रेम उत्पन्न होईल असे मन का नाही निर्माण होत ?

त्याने सारी रात्र विचारात घालवली. मिरवणुकीत सामील होणाऱ्या साऱ्या मंडळींना त्याने झोपायला लावून थोडी विश्रांती घ्यायला लावली. तरीसुद्धा विजयाची स्वप्ने पाहाणाऱ्या तरुणांना झोप थोडीच येणार ?

# 22. मिरवणूक

**सागराच्या लाटांमधुनी**
**जसे उसळती शंख अन् शिपा,**
**ब्रह्मांडाच्या लाटांमधुनी**
**गर्जत उठतो मानव बालक तैसा.**

**—न्हानालाल**

सूर्य उगवत होता. जगातली अनेक दृश्ये पाहाणाऱ्या सूर्यदेवाने आपले डोळे किंचित उघडले. आणि त्याच्या नजरेला काही वेगळेच दृश्य पडले. कुतूहलाने त्याने आपल्या पापण्या जरा आणखी उघडल्या.— पन्नास एक माणसे चारचारांच्या रांगा करून उभी होती. त्यांच्यापुढे पांढऱ्या रंगाचा ध्वज घेऊन एक देखणा तरुण उभा होता. बाजूलाच तीन तरुणी उभ्या होत्या. जनार्दनची ध्वज-मिरवणूक पोलिसांचा मनाई-हुकूम तोडायला सज्ज झाली होती. पन्नास कोटींच्यावर राज्य करणाऱ्या सत्तेविरुद्ध पन्नास माणसे उभी ठाकलेली पाहून सूर्यदेवाने आपली नजर त्यांच्यावर स्थिर केली.

माणसाला या सगळ्याचेच नावीन्य होते. शंभर माणसांच्या समोर पन्नास माणसे उभी ठाकणे याला माणसाचे शहाणपणा मूर्खपणाच म्हणेल. माणसाची मापे फार छोटी आहेत. पाच आणि पन्नास यांच्या दरम्यान फार अंतर आहे असे त्यांना वाटते. पन्नास आणि पन्नास कोटी यांच्यातले अंतर मोजतामोजता ते थकून जातात. परंतु एका क्षणात लाखो कोसांवर किरणे विखुरणाऱ्या सूर्यदेवाला पाच आणि पाच कोटी हे दोन्ही आकडे सारखे आहेत. महाग्रहांना आपल्या उपग्रहांबरोबर गरागरा फिरवणाऱ्या ग्रहराजाला मानवजातीचा आणि तिच्या गणनेचा हिशेब कसा असेल ? माणूस नाही का चालता चालता एखाद्या किड्याला चिरडतो ? त्याला कुठे पत्ता असतो की आपल्या पायाखाली किडा आला होता ? तसेच सूर्याचे. सगळ्या मानवजाती नाहीशा झाल्या

तरी सूर्य आपला हसत हसत प्रकाशतच राहील. त्याच्या त्या विराट जीवनात मानव-जातीला एखाद्या किडयाइतकेसुद्धा महत्त्व नाही. त्याच्या हिशेबी पाच मानवांना जेवढे महत्त्व तेवढेच पन्नास कोटींना. त्याच्या हिशेबात दोघांनाही फारसे महत्त्व नसतेच.

तरीसुद्धा आज त्याने आपली नजर स्थिरावली. संस्थेची त्याला काही कल्पना नव्हती. परंतु त्याला एवढे जाणवले, की आपले दिव्य तेज आज पन्नासएक लोकांच्यात चमकू लागले आहे. गूढ दिव्य स्मित करीत सूर्यदेव जरा वरती आले. जगात आपले तेज पसरण्यापेक्षा जगाने ते तेज आत्मसात करावे याचीच त्याला काळजी जास्त होती.

एका युवकाने घोषणा केली :

नाही नमणार, नाही नमणार
निशाण भारतभूमीचे
या भारतीय धर्मध्वजाचा
आम्ही राखू मान
निशाण भारतभूमीचे ।।

कंदर्पाने निशाण उंच धरले आणि तो पुढे चालू लागला. त्याच्या पाठीमागे चार-चारांच्या रांगांनी सैनिक पावले टाकीत चालू लागले. प्रत्येकजण म्हणत होता,

नाही नमणार, नाही नमणार
निशाण भारतभूमीचे ।

सगळ्यात शेवटी जनार्दन जमिनीकडे दृष्टी वळवून चालला होता. स्त्रियांना मिरवणुकीत यायला त्याने ठासून नकार दिला असतानाही सुरभी, पुष्पा आणि रंजन तिथे हजर होत्या. त्या तिघी, कृष्णकान्त, विमोचन, काही वर्तमानपत्रांचे प्रतिनिधी आणि आश्रमाबद्दल सहानुभूती बाळगणारे काहीजण या सर्वांनीच मिरवणुकीबरोबर चालायला सुरुवात केली. ते मिरवणुकीत सामील झाले नव्हते हे त्यांच्या पावले-टाकण्याच्या वेगळ्या ढबीवरून स्पष्ट होत होते. आणि तरीसुद्धा ते मिरवणुकीपेक्षा वेगळे आहेत, असेही वाटत नव्हते.

मिरवणूक आश्रमाच्या बाहेर पडली. बाहेरही बरीच माणसे जमली होती. तीही मिरवणुकीच्या पाठोपाठ चालू लागली. जनार्दन आणि त्याचे स्वयंसेवक सरकारचा हुकूम धुडकावून लावून शहराच्या मध्यभागी असलेल्या चौकात झेंडा फडकवणार आहेत ही बातमी सगळ्या शहरात पसरली होती. त्यामुळे मिरवणूक बघायला जागो-

जागी लोकांचे थवे जमले होते. मिरवणूक पुढेपुढे जात होती, तशी गावाच्या वस्तीतून जात होती. साहजिकच लोकांचा जमाव मोठ्या संख्येने मिरवणूक बघायला जमत होता. मानवाच्या कुतूहलास मर्यादा नसते. त्याला जिथे तिथे नजर टाकायची सवयच असते. ज्यांना माहीत होते ते रस्त्यावर उभे होते. परंतु ज्यांना माहीत नव्हते तेही रस्त्याने जाणारी ती मिरवणूक पाहून बघायला रस्त्यावर थांबले.

'का हो, काय आहे हे?' कोणीतरी विचारले.

'शाळेतली पोरं आहेत' एका जाणकाराने आपले ज्ञान पाजळले.

'नाही हो. ही तो असरकारी माणसं.' आणखी कोणीतरी त्या ज्ञानात भर घातली. असरकार आणि असहकार हे दोन्ही शब्द एकच आहेत असे समजणाऱ्या खेडुतांचे ज्ञान अगदीच चुकीचे आहे असे कोण म्हणू शकेल?

'आज लढाई होणार आहे!' एकाने बातमी सांगितली.

'ही पांढरी टोपी लढणार?' एक शूर उपहासाने म्हणाला.

'ही लढाई शस्त्रांची नाही. हे आत्मसामर्थ्याचं युद्ध आहे.' वाचन करणाऱ्या एका गृहस्थांनी त्या शूरवीराला समजावले.

'शस्त्रांशिवाय कसली आलीय लढाई? त्यानं काही होणार नाही. हे तर मार खातील आणि... हं. शूरवीरांनी सर्वांना उपयोगी पडेल अशा बुद्धीचा प्रभाव समजावून सांगितला.

'आपल्या हातून असलं काही होणार नाही. आपल्याला कुठे शस्त्र वापरता येतंय?'

'काठी वापरता आली की बंदूक पकडायलासुद्धा येईल, समजलात साहेब?'

मिरवणूक पुढे सरकत होती. त्यांच्या पाठीमागून लोक जमावाने काहीबाही बोलत आणि कल्पना लढवीत चालले होते. फक्त पन्नास माणसांच्या त्या मिरवणुकीच्या मागोमाग थोड्याच वेळात पाचशे, मग पाच हजार माणसांचा घोळका जमा झाला होता. ज्यांना जसे जमेल तशा मोठमोठ्या आवाजात गप्पा मारायची त्यांना मुभा होती. मोठ्याने बोलल्याशिवाय बोलणे शक्यच नव्हते, आणि प्रत्येकाला बोलल्याशिवाय राहावलेच नसते.

कोणी जादा उतावळे धाडशी लोक धक्काबुक्की करीत पुढे जाऊन धडकत होते. जमावाचा धक्का पाण्याच्या प्रवाहासारखा असतो. एक भोवरा आला की सगळ्या पाण्याला हलवून सोडतो.एका टोकाला धक्का बसला की अगदी शेवटी उभ्या राहिलेल्या माणसापर्यंतसुद्धा तो पोचू शकतो. मात्र गांधीयुगातील जमावावर एक महत्त्वाचा संस्कार झालेला आहे. हा जमाव धक्के हसत हसत सहन करतो. जमावाच्या मध्ये

एक लहान मूल सापडले होते. घाबरून रडत होते. मवाच्या त्या वाचिवीराने बाकी-च्यांना बाजूला सारून त्या मुलाला कडेवर उचलून घेतले. आणि अवसान गळून गेलेल्या त्याच्या वडलांच्या हाती सोपवून त्याला जमावाबाहेर काढले.

मिरवणुकीचे स्फूर्तिगीत ऐकू येत होते. जमावातलेही कित्येक लोक हे गीत म्हणायला सरसावले होते. शब्द धड ऐकू येत नव्हते. तरीसुद्धा ते म्हणायची लोकांची उत्सुकता जाणवत होती. मिरवणुकीच्या गीताचे वाटेल ते चरण जमाव गात होता.

आम्ही भारताचे पुत्र
आम्ही मात्र पुराण-पवित्र
ज्यांची सुंदर सूत्रे
तेजाळती उच्च चरित्रे !

मिरवणुकीचे स्वयंसेवक जमावाच्या बरोबरीने गाऊ लागले. लोक खिडक्यांतून, ओसरीवरून, गच्चीवरून, झाडांच्या फांद्यांवर बसून उत्सुकतेने मिरवणूक पाहात होते. मधूनमधून कोणीतरी घोषणा देत होते. – 'वंदे मातरम्' आणि सारा जमाव त्या घोषणेला प्रतिसाद देत होता. त्यावेळी मिरवणुकीतले गाणे ऐकू येत नसे. परंतु घोषणा विरली की पुन्हा ते गीत ऐकू येई.

आमच्या मनीचा उद्देश
उतरवू प्रत्यक्षात
आम्ही देशी देशी देशी
हा हिंद आमुचा देश !

तेवढ्यात मिरवणुकीचा पुढे जाणारा प्रवाह एकाएकी थांबला. काय झालं ते लोकांनाही प्रथम समजले नाही. कारण शोधायला लोकांनी तिकडे पाहिले, आणि मग त्यांना समजून चुकले की पोलिसांनी मिरवणूक अडवली आहे.

समोरचा सगळा रस्ता शंभर-दीडशे पोलिसांनी अडवला होता. आणि ते मिरवणुकीच्या समोर खडे होते. शिपायांच्या मागे एका उंच घोड्यावर एक युरोपियन बसलेला दिसत होता. आणि शिपायांच्या पुढे आठदहा युरोपियन सार्जंट मोठ्या रुबाबात उभे होते. शिपायांच्या हातात लांबलचक लाठ्या होत्या.

'थांबा इथंच. पुढे येऊ नका.' पोलीस अंमलदाराने ओरडून हुकूम सोडला. मिरवणूक थांबलीच होती. कंदर्पने हातातला ध्वज आणखी उंचावून प्रत्युत्तरादाखल घोषणा दिली, 'वंदे . . .'

'मातरम्' स्वयंसेवकांनी प्रतिसाद दिला. तेवढ्यात जमावाने पुन्हा गर्जना केली,

'वंदे. . . . मातरम्'

घोड्यावर बसलेल्या युरोपियन अंमलदाराच्या चेहऱ्यावर कृपाळू स्मित होते. मिरवणुकीच्या मधून अरुण बाहेर पडला. मागच्या भागातले जनार्दन, कृष्णकान्त आणि त्या तिघी तरुणीही पुढल्या बाजूस आले. जमावातले स्वतःला फाजील महत्त्व देणारे लोकही बाहेर पडले. आपल्या उपस्थितीशिवाय, सल्ल्याशिवाय, कोणतीही गोष्ट निकालात निघणार नाही अशी समजूत करून घेणारी मंडळी पाच हजारांमध्ये निदान पाचशे तरी निघतात. मिरवणुकीतले स्वयंसेवक आणि पोलीस यांच्यात लढा होता खरा. परंतु त्या दोघांच्यात काही बोलणी होण्यापूर्वीच आपण फार महत्त्वाचे लोक आहोत असे मानणाऱ्यांनी लढ्याची जबाबदारी आपल्या शिरावर ओढून घेतली.

आत्मनियोजित पुढारी पुढच्या बाजूला गोंधळ करीत होते. परंतु जमावात सामील झालेले लोकही काही कमी क्षुब्ध नव्हते. मधाच्या त्या शूरवीराने गर्जना केली.

'अरे काय साहेब, इतकी माणसं आहेत. एक एक थप्पड मारली. तरी पोलीस पळून जातील.' बडबडणारा वीर कधी थप्पड मारीत नाही, हेच खरं आहे.

'असं बोलू नका हो. हा अहिंसेचा लढा आहे.' आत्मबलाचे महत्त्व समजून चुकलेला एकजण म्हणाला.

'तुम्हाला काही समजतं की नाही ? गांधीजींची युक्तीही समजत नाही तुम्हाला ? अहिंसेच्या गप्पा करून ते लोकांना तयार करीत आहेत.'

अर्थपूर्ण नजरेने त्याने त्या अहिंसावाद्याकडे पाहिले. हिंसेची सिद्धता व्हावी एवढ्याचसाठी एक युक्ती म्हणून गांधीजींनी अहिंसेचा पक्ष घेतला आहे असा समज अजूनही कित्येक लोकांच्या मनात पक्का रुजला होता.

'मारा एक ! आतापर्यंत स्वस्थ बसून पाहात असलेल्या एका तरुणाने हातात दगड उचलून म्हटले. आजूबाजूला जमलेल्या दोन-चार माणसांनी डोळ्यांनीच संमती दिली. कित्येक लोकांचे मन जमावातच फुलून येते. नवरात्रीचे गरबे असोत की एखादी सार्वजनिक सभा असो, त्यांचे हात कधी स्वस्थ बसायचेच नाहीत. अनेक जणांना लपून राहून खडे किंवा दगड फेकायची बहादुरी केल्याशिवाय राहावतच नाही. कशासाठी, कोणासाठी आपण हे काम करीत आहोत हा विचार करायची त्यांना गरजच पडत नाही. जमाव पाहिला की त्यांना आवेश चढलाच !

एक दगड भिरभिरला. पोलीस आणि मिरवणूक यांच्यामध्ये येऊन पडला. जनार्दन दचकला. पोलीस अंमलदाराचा चेहरा आतापर्यंत हसरा होता. दगड येऊन पडताच तो बदलला. त्याने जनार्दनला म्हटले,

'तो दगड आलेला पाहिलात ? ही तुमची अहिंसा ! मी अजूनही तुम्हाला सांगतो की पुढे न सरता तुम्ही मागे वळून चालू लागा.'

'मला माझ्या मित्रांपासून वाचवा हो' अशी एक व्याकुळ म्हण इंग्रजी भाषेत आहे. जनार्दनला तिचीच आठवण आता आली. पण तो म्हणाला,

'हा दगड आमच्या मिरवणुकीतून आलेला नाही, याची मी खात्री देतो.'

'ही सगळी तुमचीच मिरवणूक आहे ना ? मिरवणुकीच हे वादळ निघालं नसतं तर ही एवढी माणसं कशी एकत्र जमली असती ?

आपण जमावाला आकर्षून घेतले आहे, तेव्हा जमावाच्या वर्तनाची जबाबदारी आपल्याच माथ्यावर आहे असे जनार्दनलाही आता वाटू लागले. त्याने लोकांच्या पाया पडून त्यांना अजिबात दांडगाई न करण्याची विनंती केली. ज्यांना दगड फेकल्या-वाचून राहाणे शक्य नव्हते त्यांनी आता घरी जावे अशी विनंतीही त्याने केली. कृष्णकान्त आणि इतर पुढाऱ्यांनीही अशीच विनंती जमावाच्या निरनिराळ्या भागातल्या लोकांनी केली. लोक जरा शांत झाले. परंतु जमावातली ही शांतता दगड मारून मजा पाहाण्याची वृत्ती असलेल्या लोकांना स्वस्थ बसू देईना. मोठ्या सफाईने एक खडा उडून एका सार्जंटच्या टोपीला लागला.

सार्जंटच्या रागाला आता पारावार उरला नाही. अनेक लोकांना तो दगड दिसलाच नव्हता. सार्जंटने तो दगड अमलदाराला दाखवला. तेव्हा अंमलदाराने जरब दिली.

'मी आता शेवटची सूचना देतो. दोन मिनिटांत तुम्ही आता इथून निघून गेला नाहीत तर मी आमची ताकद वापरून तुम्हाला उधळून लावीन.'

'सार्जंट खोटं बोलतोय.' कोणीतरी जमावातून ओरडले, आणि लोकांना त्याचे म्हणणे खरेच वाटले.

'काळी टोपी बायकॉट !' कोणीतरी घोषणा दिली खरी. पण सार्जंटसाहेबांची टोपी मात्र पांढरीच होती.

'बायकॉट !' लोकांनी ओरडा केला. बायकॉटच्या घोषणेतूनच कोणीतरी 'हाय हाय' ला सुरुवात केली. तेव्हा लोकांनी एकसाथ आवाज द्यायला सुरुवात केली. 'हाय हाय ! काळा डगला-हाय हाय !'

लोकांच्या त्या गोंगाटातूनच एक कर्कश शिटी ऐकू आली आणि शिटीचा तो आवाज ऐकताच पोलीस जमावावर तुटून पडले. काही पोलीस लोकांना पळवून लावू लागले, तर काहींनी मिरवणुकीचा भिंतीसारखा अचल व्यूह तोडून टाकायला सुरुवात केली.

आता लोकांनी पळायला सुरुवात केली. ज्याला जसे जमेल तसा तो धावत सुटला

पळताना कोण कुठे पडत आहे याचेही भान लोकांना नव्हते. सगळीकडे नुसता कोलाहल माजून राहिला. शिपाई शक्यतोवर आपल्या लाठीचा उपयोग करीत नव्हते. लाठी मारायची झाली तर हलकेच मारत होते. परंतु पाच हजारातल्या फारच थोड्यांना लाठ्या खायची इच्छा होती. मघाचा तो हिंसावादी शूरवीर तर सगळ्यांच्या आधी पळून गेला होता, आणि पळता पळता अनेकांना खाली पाडण्यात आपले शौर्य दाखवीत होता. आत्मबलाच्या सामर्थ्याची जाणीव झालेला गृहस्थ आत्मबलाच्या कोणत्या दरीत बुडून गेला होता ते कोणाला समजलेच नाही. पोलिसांची शिट्टी वाजल्यानंतर त्याला त्या ठिकाणी उभा राहिलेला कोणी पाहिलाच नाही. शरीर आणि आत्मा यांच्या सामर्थ्याचा उपयोग महत्त्वाच्या प्रसंगासाठी राखून ठेवण्याची कदाचित त्याची कल्पना असेल. त्याची ती कल्पना स्तुत्यच होती!

# 23. लाठीमार

**जगाला विसरून देवीला स्मरून**
**अलबेली नाचे फिरे**
**सखी रास खेळते ग सखी रास खेळते।**

**—न्हानालाल**

कंदर्पच्या पायावर एक हलकासा, लागणार नाही, असा फटका बसला. पोलिसांची तीन-चार माणसे त्याच्या भोवती गोळा झाली. आणि त्याच्या हातातला ध्वज खेचून काढायचा त्यांनी प्रयत्न केला.

'चल, सोड हातातून' एका पोलिसाने फर्मावले.

कंदर्प फक्त हसला आणि त्याने ध्वजावरची आपली पकड आणखीनच घट्ट केली. शिपायांनी थोडी धक्काबुक्की केली, परंतु त्याच्या हातून ध्वज हिसकून घ्यायची किंवा त्याला मारण्याची त्या शिपायांची इच्छा फारशी प्रबळ नाही, असे एका सार्जंटला वाटले. तो दांडगा गोरा सार्जंट जवळ आला. आणि त्याने हातातल्या दंडुक्याचा एक जबरदस्त तडाखा कंदर्पच्या हातावर हाणला. आपला हात तुटून पडणार असा कंदर्पला क्षणभर भास झाला. दुसऱ्या हातात आपले सगळे बळ एकवटून त्या हातात ध्वज पक्का धरीत तो त्या गोऱ्या शिपायाला म्हणाला, 'ध्वज असा सुटणार नाही.'

तालीमबाज कंदर्पला अशा एका फटक्याने नामोहरम करणे शक्यच नव्हते. सार्जंटने कंदर्पच्या गुडघ्यावर दुसरा एक फटका मारला. कंदर्पचा पाय थरथरला. तो खाली बसला. पण खाली बसतानाही त्याने हातातला ध्वज सोडला नाही.

'सोड!' कंदर्पच्या अंगावर खेकसत सार्जंट ध्वज खेचू लागला.

'मी शुद्धीवर आहे तोपर्यंत तरी सोडणार नाही.' मोठ्या अभिमानाने कंदर्पने सांगितले.

साठी तोडायचे ? व्रताची आठवण होताच त्याने आपले मन स्थिर केले. झिणझिण्या येत असलेल्या खांद्याचा विचार काढून टाकला. निष्कारण जागृत झालेल्या स्वाभिमानाला त्याने अर्धवट दाबून टाकले, सार्जंटला मारून काही फायदा होणार नाही हे लक्षात येताच त्याला आपला नाही, तर सार्जंटचाच त्यात अपमान असल्याचे जाणवले. प्रहाराला प्रतिप्रहार करण्याची गरज त्याला भासली नाही. पोलिसांचा लाठीमार हा एखाद्या अचल पर्वताला हलवायचा प्रयत्न करणाऱ्या चिडलेल्या सोसाट्याच्या वाऱ्याइतकाच निष्फळ आहे, असे त्याला समजून चुकले. रागाची दुर्बलता आणि धैर्याचे सामर्थ्य याचा त्याला अचानक साक्षात्कार झाला. आणि क्षणभरातच त्याच्या मनाने विजेत्याची क्षमाशील भूमिका स्वीकारली. त्याच्या चेहऱ्यावर हसू पसरले. त्याचा राग ओसरला. त्याची ताकद कायम राहिली. परंतु त्या ताकदीत आता सत्त्वशील मृदुता निर्माण झाली. आपण या सार्जंटापेक्षा एका उच्च स्थानावर आहोत, असे अरुणला जाणवले, आणि त्या श्रेष्ठत्वाच्या भूमिकेवरून स्मित करीत अरुणने त्या सार्जंटला विचारले, 'मग, आणखी किती फटके मारणार तुम्ही मला ?'

दोन फटके खाल्ल्यानंतरही उभा असलेला, आपला हात घट्ट पकडूनही आपल्यावर हल्ला न करता स्मित करणारा अरुणच हा प्रश्न करीत आहे हे लक्षात येताच त्या सार्जंटच्या आश्चर्याला पारावार उरला नाही. क्षणापूर्वी रागाने फणफणणारा माणूस दुसऱ्याच क्षणाला पुन्हा हसू कसा शकतो हेच त्या सार्जंटला कळेना.

'एका माणसाला जास्तीत जास्त मारता येतील तितके फटके मी तुला दिलेच आहेत, आता ते निशाण सोडून दे. मी तुला आता एकसुद्धा फटका मारू शकणार नाही.' सार्जंटच्या मनात अजूनही थोडी माणुसकी शिल्लक होती.

'दोन फटक्यात कुठे ध्वज सुटतो काय ? भान हरपलं किंवा जीव गेला तरच हा ध्वज तुमच्या हाती येईल.'

'पण तू विरोध करीत नाहीस तर मी कसं मारणार तुला ?' सार्जंट खिलाडू होता. शूर होता. अरुणच्या अहिंसात्मक वागण्याने तो गोंधळून गेला होता.

'मी तुला विरोधच करणार आहे. हा ध्वज मी समोरच्या मैदानात नेऊन ठेवणार आहे.'

असे म्हणून अरुण पुढे सरसावला. त्याच्या पाठीमागून 'वंदे मातरम्'ची गगनभेदी घोषणा स्वयंसेवकांनी केली.

'हिट हिम हार्ड यू फूल ! (पाहतोस काय बावळटा, चोपून काढ त्याला) दुसरा सार्जंट लाठी परजीत स्वयंसेवकांना थोपवीत ओरडला.

सार्जटने त्याच्या डोक्यात लाठीचा फटका हाणला. कंदर्पचे डोके गरगरले. आपला प्रिय ध्वज आता हे हिसकावून घेतील की काय असे भय त्याला वाटले. त्याच्या एका हाताची पकड ढिली झाली होती. तेवढ्यात अचानक अरुणने त्याच्या हातातला ध्वज आपल्या हाती घेतला. हे पाहाताच समाधानी चेहऱ्याने कंदर्प बेशुद्ध झाला.

'आम्ही काही गुन्हा केला असेल तर आम्हाला अटक करा. असा जंगलीपणा करण बेकायदेशीर आहे' आपल्या हातातल्या ध्वजाशी झटापट करणाऱ्या सार्जंटांना अरुणने बजावले.

'कायदा ? पाहाच आमचा कायदा ?' असे म्हणत एका सार्जटने हातातला मजबूत दंडा अरुणला मारला. तो अरुणच्या हातावर लागला. तो लागल्याबरोबर अरुणचे रक्त तापले. या सार्जटाचा गळा दाबून त्याला जागच्या जागीच ठार मारावे अशी जबरदस्त इच्छा अरुणला झाली. त्याच्या डोळ्यांत खून चढला. सार्जटलाही भीती वाटू लागली हा पाणीदार तरुण आता आपल्याला तडाखा मारणार ! जिवाच्या भीतीने जर कोणी प्रहार केला तर तो प्रमाणाबाहेर बसतो. त्या सार्जटने अरुणच्या त्याच खांद्यावर पुन्हा एक जबरदस्त प्रहार केला. त्याबरोबर अरुणनं एका हातात ध्वज घट्ट पकडून ठेवून आपल्या दुसऱ्या हाताने त्या सार्जंटाचा हात गच्च पकडला. सार्जंटची खात्री पटली की आपली पुरी भरली !

'अहिंसा ! अहिंसा !'

हृदयाच्या तळापासून आलेले तीव्र शब्द अरुणच्या कानांत घुमले. राग आणि वैराचा आवेश या शब्दांना दाबून टाकू पाहात होते. तरीसुद्धा हे शब्द त्यांना दाबीत वर उसळत होते. सार्जंटला बडवून काढण्यासाठी उचललेल्या हाताची पकड जशीच्या तशीच मजबूत राहिली. परंतु त्याच्या रागाने लाल झालेल्या चेहऱ्यावर मात्र एक स्मित पसरले. त्याला राग आला होता तो खाल्लेल्या फटक्याचा नव्हता. एका स्वाभिमानी गौरवशाली तरुणाच्या झालेल्या अपमानाचा तो परिणाम होता. अरुणला बसलेले दोन्ही तडाखे इतके जबरदस्त होते, की पाहाणाऱ्याला आणि त्यांचा आवाज एकणाऱ्यांनाही अरुण आता लगेच जमिनीवर कोसळणार असेच वाटले होते. सहन करणारा आणि मार खाताना पाहणारा या दोघांच्या मनात फरक असतो. पाहणाऱ्याला वाटते एवढ्या वेदना मार खाणाराला होतच नसतात. अरुणचा खांदा दुखत होताच. परंतु फटका बसण्यापूर्वी त्याला, जेवढी वेदना होईल असे वाटले होते किंवा लांबून पाहणाऱ्याला त्याला जेवढी वेदना झाली असेल असे वाटले, तेवढी वेदना मात्र त्याला प्रत्यक्षात झाली नव्हती. आता एवढा मार खाल्ल्यानंतर अहिंसेचे घेतलेले व्रत कशा-

'आय सिपली कान्ट !' (माझ्याच्याने ते होणार नाही.) पहिल्या सार्जंटने कबुली दिली.

चिडून जाऊन दुसऱ्या सार्जंटने स्वयंसेवकांना बाजूला ढकलले आणि सावकाशपणे पुढे सरकणाऱ्या अरुणला त्याने अडवले.

'इथेच थांब.' त्याने फर्मावले.

हसतच नम्रपणे अरुण म्हणाला.

'नाही साहेब'

अरुणचे हास्य आणि त्याचा नम्रतापूर्वक नकार त्या दुसऱ्या सार्जंटला खपला नाही. त्याचा राग आणखीनच भडकला. त्याने आपला मजबूत दंडुका वर उचलला आणि अरुणच्या मस्तकावर ताड्दिशी प्रहार केला. त्या फटक्याचा आवाज ऐकणाऱ्या, सगळ्यांची खात्री पटली की अरुणचे डोके फुटले. पहिला सार्जंट चिडून म्हणाला 'यू ब्रूट ! (ए पशू)'.

शरीर आणि शरीरातील शक्ती यांच्या मर्यादा ईश्वराने ठरवून दिल्या आहेत. डोक्यात प्रहार बसला तेव्हा अरुणला फार वेदना झाल्या नाहीत. निदान तितक्या तीव्रतेने त्या त्याला फारशा जाणवल्या नाहीत. दुःखाचा अतिरेक झाला की दुःखाचा विसर पडतो. परंतु आपल्या भोवतालचे जग फिरते आहे, डोलते आहे, हालते आहे. आपल्या पायाखालची जमीन खाली खाली जात आहे, असे त्याला वाटू लागले त्याचे सगळे अंग लुळे पडत असल्याचे त्याला जाणवत होते.

'माझा ध्वज' शुद्ध जात असतानाच त्याच्या मनात विचार आला. आणि त्या विचारानेच त्याला चैतन्य आले. उरलीसुरली सारी ताकद एकवटून त्याने ध्वजावरची आपली पकड आणखी घट्ट केली. पडता पडताच त्याने ध्वज सावरला. परंतु तो पुढे कसा जाणार होता ? सगळी पृथ्वी त्याच्याभोवती गरगरत होती. पायाखालची जमीन सरत होती.

'ध्वज कोण उभारणार ?' त्याच्या गोंधळलेल्या मनाने चित्त एकाग्र करायचा प्रयत्न करीत विचारले.

'आणा तो ध्वज, मला द्या.' हलणाऱ्या सृष्टीतच एका रूपसुंदरीने प्रवेश केला होता.

'कोण असेल ही ?' शुद्ध हरपत असलेल्या अरुणला ती ओळखू आली नाही. तरीही तिच्यावर त्याचा विश्वास बसला. 'तुम्ही उभाराल हा ध्वज ?'

'जरूर ! मी उभारीन.' त्या तेजस्वी सुंदरीने उत्तर दिले. अरुणने मूठ उघडली. ध्वज त्याने त्या दुसऱ्या हाती सोपवला. अत्यंत विश्वासाने. पुरुषाला जे जमणार नाही

ते स्त्री नक्कीच करून दाखवील अशी खात्री त्याच्या शुद्ध हरपत असलेल्या मनाला पटत होती. या विचाराबरोबरच त्याचे पाय कोलमडले आणि तो उभा होता तिथेच कोसळून पडला.

त्याच्या मनाचेही भान आता हरपले होते. तरीही त्याच्या एका कप्प्यात एकच विचार सारखा जागा होता– 'ध्वज ! ध्वज !' बस्स.

शून्यातून त्याच्या कानावर आवाज आला, 'वंदे. . .मातरम्.'

त्याने डोळे उघडले आणि कसेबसे विचारले, 'ध्वज उभारला ?'

'हो. आताच रंजनन उभारला.' एका स्त्रीने उत्तर दिले.

अरुणच्या चेहऱ्यावर समाधान पसरले. ती तरुणीही त्याच्याकडे पाहून हसली. दुसऱ्याच क्षणी तिचे डोळे ओलावले. पुष्पाने त्याला आपल्या खांद्यावर सावरून धरत त्याचे डोळे बंद केले. अरुण सुखाच्या बेशुद्धावस्थेत गेला.

## 24. धनसुखलालच्या घरी

**नसते जर आजार या जगी,**
**प्रेमही नसते अमूल्य बनले!**

**—न्हानालाल**

'कमला ओरडा आहे ग?' धनसुखलालनी बसल्या बसल्याच सुशीलेला विचारले.

'ती मिरवणूक आली आहे.' आंघोळ करून नोवळे नेसलेली सुशीला खिडकीत उभी होती. तिने सांगितले.

'पुष्पा आहे ना त्यात?' असे म्हणत धनसुखलाल मिरवणूक पाहायला उभे राहिले. मिरवणुकीतसुद्धा आपले माणूस पाहायची स्वार्थी इच्छा कमी होत नाही.

'कुठं दिसत नाही...ओ हो, ती बघा तिकडे. रंजन आणि सुरभीसुद्धा आहेत बरोबर.'

'आजपासून तिला अशी बाहेर फिरू देऊ नकोस. चांगल्या घरातल्या ह्या मोठ्या मुली जमावात धक्के खात फिरतात हे बरं नाही.'

दोघेही जण थोडा वेळ मिरवणूक आणि शिपायांचा बंदोबस्त पाहात उभे राहिले. थोड्या वेळाने धनसुखलाल म्हणाले, 'अशानं कोणतं सरकार घाबरणार आहे? शिपायांनी हल्ला केला तर कोणी उभंही नाही राहाणार.'

'पण शिपाई मारतात कशाला उगीच? मिरवणूक काढणाऱ्यांनी असा काय गुन्हा केलाय?' सुशीला म्हणाली.

'तुम्ही सरकारला विरोध करा मग शिपायांनी काय बघत राह्यचं? सरकारचंही चुकलंच. पाच-पन्नास माणसे ध्वज लावणार त्यात सरकारचं काय बिघडत होतं?' दोन्ही पक्ष अगदी क्षुल्लक बाबींना मोठे स्वरूप देऊन निष्कारण लढा उभा करतात असे मानणारेही खूप लोक अजून आहेत. मिरवणूक काढायची काही जरूर होती

का ? आणि त्यांनी काढली तर ती अडवायची काय जरूर होती ?

धनसुखलालच्या घरासमोरच्या मैदानातच आश्रमवासी आणि शिपाई यांच्यातली साठमारी सुरू झाली. शहराच्या मुख्य भागात जायचे तर धनसुखलालच्या घराजवळूनच जावे लागे. आणि मिरवणुकीला पोलिसांनी त्याच जागी अडवले होते. बाप-लेक बोलत होती. तेवढ्यात लाठीमारालाही सुरुवात झाली होती.

लाठीच्या प्रहाराने कंदर्प कोसळला, अरुण पडला. मग पाठोपाठ इतरही काही तरुण पडत होते, लोक चहूकडे धावत होते, निश्चयी आश्रमवासीय मागे फिरायला तयार नव्हते, या मैदानाच्या पुढच्या भागातच तो ध्वज उभारून त्याला वंदन करून ते पुढे जाणार होते आणि पोलिसांनी निश्चय केला होता, की त्यांना ध्वज उभारू द्यायचा नाही अन् पुढेही जाऊ द्यायचे नाही. त्यावरचा उपाय म्हणून पोलिसांनी लाठीमाराचा आश्रय घेतला होता. जमावाप्रमाणेच आश्रमवासीसुद्धा माराच्या भीतीने मागे फिरतील अशी पोलिसांची कल्पना होती, ती खोटी ठरली. चक्कर येऊन खाली पडणाऱ्या एकेका तरुणाच्या जागी दोन दोन तरुण हजर होत होते.

सर्वांत प्रथम पडलेल्या कंदर्पला सुरभीने सावरले. अरुणला तिने पुष्पाच्या स्वाधीन केले. जनार्दन आणि कृष्णकान्त पडलेल्या दुसऱ्या तरुणांच्या सेवेला लागले. जमावातून दोन-तीन तरुण डॉक्टर पुढे झाले. त्यांनी जखमींची देखभाल करायला सुरुवात केली. त्यांच्यापैकी कोणालाही कोणत्याही क्षणी लाठी लागण्याची भीती होती. परंतु कोणालाच त्या भीतीची जाणीव दिसत नव्हती. तेवढ्यातच अरुणच्या हातातून ध्वज घेऊन रंजन पुढे झाली, ठरलेल्या ठिकाणी पोचली आणि 'वंदे मातरम्'ची घोषणा करीत तिने ध्वज उभारून त्याला वंदन केले.

अर्थातच या तिच्या कामगिरीमुळे चिडून गेलेले पोलीस अधिकारी तिथवर गेले. त्यांनी तो ध्वज उखडून फेकून दिला. रंजनला आता काही करता येणे शक्य नव्हते. म्हणून तिने स्वतःचा खादीचा रुमाल बाहेर काढला. आणि तो हातात उंच धरून ती परत सुरभी आणि पुष्पाकडे आली. या वीरकन्येबद्दल लोकांना कौतुक वाटू लागले. आणि त्यांनी तिचा जयघोष केला. तिची स्तुती करीतच लोक हळूहळू पांगू लागले.

पोलिसांचा एक गोरा डॉक्टर लांब उभा राहून हा तमाशा पाहात होता. लोकांना पांगवण्यासाठी चाललेला पोलिसांचा लाठीमार अजून पूर्णपणे थांबला नव्हता. कृष्णकान्त जनार्दनला म्हणाला,

'आपली मोटारही अडवलेली दिसते त्यांनी. नाहीतर या सगळ्या जखमींना आपण चटकन घेऊन जाऊ शकलो असतो.'

'मीसुद्धा त्याचाच विचार करीत होतो.'

'काकांचं घर समोरच आहे. ते तिथे उभेच दिसतायत. आपण या सर्वांना ताबडतोब तिकडे नेलं तर?'

'जरूर. जितक्या लवकर त्यांना उपचार होतील तितकं चांगलं.' जमावातून आलेल्या एका डॉक्टरने सांगितले.

'नको नको. मी उगीच कोणाला संकटात घालू इच्छित नाही. धनसुखलाल सरकारी पक्षाचे आहेत.' जनार्दन म्हणाला.

'वाटेल त्या पक्षाचे असोत, जखमींना उपचार करायची जबाबदारी शत्रूवरही असतेच ना? काका नाही म्हणणार नाहीत.'

'होय होय. अगदी बरोबर, तिकडे चला, सगळी व्यवस्था होईल.' पुष्पाने कृष्णकान्तला दुजोरा दिला.

'मी ह्या सगळ्यांना घेऊनच आश्रमात जातो. ती पाहा, एक मोटार आलीच.'

जमावाला परतवून परत फिरणाऱ्या एका शूर शिपायाचे बलवान हात बाणासुराच्या हाताप्रमाणे अजून शिवशिवत होते. त्याने जनार्दनच्या डोक्यावर एक फटका हाणला. जनार्दनच्या तोंडून शब्द आले– 'प्रभू, त्याला सद्‌बुद्धी . . .'

वाक्य पुरे व्हायच्या आतच जनार्दनने डोळ्यांवर हात दाबून धरला. कमरेपासूनच त्याचे शरीर लुळे पडले आणि तो धाडदिशी जमिनीवर पडला. कृष्णकान्तने त्याला सावरले नसते तर जवळच्याच एका दगडावर त्याचे डोके फुटले असते.

'तू राक्षस आहेस की कोण?' मागून धनसुखलालचा चिडलेला आवाज ऐकू आला. 'साल्या, जरा तरी माणुसकी ठेव. असं हात बांधून बसलेल्यांच्यावर तुटून पडताना शरम नाही वाटत तुला?'

उंची, स्वच्छ कपडे आणि डोक्यावरची पगडी यांमुळे सगळ्यांच्याहून वेगळे वाटणारे धनसुखलाल पाहाताच कृष्णकान्तला मारायला सरसावलेले दोन-तीन शिपाई बाजूला झाले. श्रेष्ठ वर्गाचा हिंदी हा कनिष्ठ गोऱ्यांपेक्षाही कमीच मानणारा सार्जंट मात्र पोलिसांना धमकावण्याचा या जगात कोणालाच अधिकार नाही, असे मानत होता. तो दंडुका सरसावीत धनसुखलालला मारण्यासाठी पुढे धावला. तेवढ्यात एका महाकाय मुसलमानाने सार्जंटला दोन्ही हातांनी पकडले आणि त्याला बाजूला खचून तो दोघांच्या मध्ये उभा राहिला.

'ए जनावरा, आमच्या शेटला हात तर लाव!'

दाढीमिशावाल्या क्रूर चेहऱ्याच्या या पठाणाला पाहाताच सार्जंटने आपला बेत

बदलला. इतक्यात घोड्यावर बसलेला पोलीस अंमलदारही तिथे दौडत येऊन पोचला. आणि त्यांनी पोलिसाला तिथून निघून जायला फर्मावले.

'माफ करा धनसुखलाल ! तुमच्या कोणा आप्त-स्वकीयांना लागलं असेल तर माफ करा.' तो म्हणाला.

'तुम्ही माफी मागून मोकळे झालात. पण ज्यांना लागलंय त्यांचं काय ?' धनसुखलाल म्हणाले.

'मी त्यांना हॉस्पिटलमध्ये पोचवतो.' पोलीस अंमलदार म्हणाला. धनसुखलाल जुन्या विचाराचे. क्लब जीवनात भाग न घेणारे. सगळ्यात पुढे असण्याचा मोह त्यांना नव्हता. तरीसुद्धा श्रीमंतांच्या खर्चाने वर्षानुवर्षे होणाऱ्या खेळात आणि इतर जाहीर कार्यक्रमात पुढाकार घेणारे अंमलदार धनसुखलालची मदत नेहमीच घेत असत. त्याशिवाय एक सद्‌गृहस्थ म्हणूनही त्यांचे सरकार दरबारी वजन चांगले होते. म्हणूनच पोलीस अंमलदार त्यांच्याशी नम्रतेने बोलत होता.

'काका, आम्ही या सगळ्यांना तुमच्या घरी आणणार होतो. इस्पितळात पाठवत पाठवताच यातले कितीतरी मरून जातील. त्यांना तावडतोब उपचार व्हायला हवेत.' कृष्णकान्त म्हणाला.

'मग आणायला कोणी मना केली होती तुला ? घरात जागा केवढी आहे. विचार कसला करतोस ?' धनसुखलाल म्हणाले.

कृष्णकान्त हसला. रंजन म्हणाली,

'काहींना आपल्या घरी घेऊन जाऊ आपण.'

'ही बोलली दीडशहाणी ! जवळचं घर दिलं सोडून आणि या सर्वांना लांब घेऊन जायचं ? चला चला. घेऊन या, अब्दुल, तुझी माणसं गोळा करून आण. घरातून खाटा घेऊन ये.'

'जी सेटसाब !' तो शूर महाकाय मुस्लीम चटकन माणसे गोळा करून घेऊन आला. त्याने धनसुखलालच्या घरातून खाटा आणल्या. आपल्या माणसांच्या मदतीने एकेका जखमी आणि बेशुद्ध माणसाला त्याने धनसुखलालच्या घरी न्यायला सुरुवात केली.

अरुण अजून बेशुद्ध होता. तो पुष्पाच्या हातावरच होता. एकदा रंजन तिला म्हणालीही,

'तुझा हात दुखेल. आण, मी घेते.'

'तू या बाकीच्या जखमींना सांभाळ पुष्पाने उत्तर दिले.

अरुणला सगळ्यात शेवटी घरी नेण्यात आले. रंजन आपल्या भावाला म्हणाली,

'अरुणभाईंना मोटारीतून सरळ आपल्या घरी नेलं तर?'

'चालेल. तू आणि सुरभी घेऊन जा त्याला. वाटेत डॉक्टरांनाही बोलावून घे.' कृष्णकान्त म्हणाला.

'आम्ही आमच्या घरी त्यांची काळजी घेणार नाही की काय?' पुष्पाने जरा रागावून विचारले.

'मध्या इथे जवळच्या जवळ न्या. त्यांना जरा जास्तच लागलय. मी तपासतो त्यांना आधी. मग घेऊन जा.' एक डॉक्टर म्हणाला.

डॉक्टरचे हे वाक्य चालू परिस्थितीत वेदवाक्य होते. त्याच्या मागण्याविरुद्ध कोणी जाऊ शकत नव्हते. म्हणून मग अरुणलाही धनसुखलालच्या घरात नेण्यात आले.

रंजन आणि पुष्पांनी एकमेकींकडे पाहिले. क्षणभर टक लावून एकमेकींकडे पाहिल्यावर त्यांनी नजर वळवली रंजनने पुष्पाच्या खांद्यावर हात ठेवला आणि दोघी मैत्रिणी लगबगीने पुढे होत घरात शिरल्या

धनसुखलालचे घर तात्पुरता दवाखाना बनले.

# 25. सुशीला

**दुग्धे पोसला, अमृते सिंचला,**
**वत्सासाठी त्या, विषरूपी अश्रू कटोरा ।**

**—न्हानालाल**

धनसुखलालचे घर खूपच मोठे होते. मोठमोठ्या खोल्या असलेल्या त्या हवेलीत वाटेल तितकी माणसे मावू शकत होती. शिवाय घरात इतर साधनेही भरपूर होती. सोवळे नेसून पूजेसाठी तयार झालेल्या सुशीलेने पन्नासहून जास्तच जखमी लोकांसाठी घाईघाईन सगळी व्यवस्था केली होती. एकेका खोलीत चार-चार, पाच-पाच माणसांना निजवले होते. डॉक्टरांच्या संख्येतही हळूहळू वाढ होत होती. यातले काही डॉक्टर्स जसे सेवा करण्याच्या वृत्तीने आले होते तसेच काही प्रमुख डॉक्टर्स आपले नाव होईल या सुप्त इच्छेनेही गोळा झाले होते.

एका खाटेजवळ येताच सुशीला थबकली.

'काय झालं ग ताई, एवढी दचकलीस का तू ?' जवळच उभ्या असलेल्या पुष्पाने तिला विचारले.

'माझ्यानं हे पाहावत नाही ग.' डोळे मिटून घेत सुशीला म्हणाली. आणि जणू काही नुसते डोळे मिटून चालणार नाही असे वाटून तिने आपला हात डोळ्यांवर दाबून धरला.

'आम्ही सगळे इथे आहोतच. मग तू कशाला इतके कष्ट घेतेस ? थकशील तू. अजून तुझी पूजाही व्हायची असेल ना ?'

'देवाची पूजा कधी पुरी होते का ?' सुशीलेने डोळे उघडले. आणि अजून पूजा व्हायचीय या विचाराने नाराज झाल्यासारखी चेहरा करून तिने डोळे पुन्हा त्या खाटेकडे वळवले.

जनार्दन त्या खाटेवर झोपला होता. त्याच्या डोक्यातून वाहिलेले रक्त आता सुकू लागले होते. सुशीलेची नजर तिकडे गेली. तिने अधीरतेने विचारले, 'पुष्पा, इकडे बघ जरा. डॉक्टरसाहेबांना इकडे बोलावून घे. यांना पट्टी बांधू या.'

'तू जा ताई. मी घेते बांधून.'

पुष्पाने सांगितले तरी सुशीला तिथून हलली नाही. वर्षानुवर्षे शरीराला झिजवणाऱ्या त्या तपस्विनीचे अंतर्मन आज बहिर्मुख बनले होते. बाजूलाच एक लहानशी खाट पडली होती. तिच्यावर बसत ती म्हणाली,

'मी काही इथून हलणार नाही. माझे पाय अगदी गळून गेले आहेत.'

सुशीला खरेच सांगत होती. तिच्या पायातली सगळी शक्तीच निघून गेली होती.

'परत आजारी पड तू!' म्हणत पुष्पा डॉक्टरना बोलवायला गेली.

सुशीला आणि पुष्पा यांच्यातले संबंध माय-लेकींसारखे होते. या दोघी बहिणींच्या आया वेगवेगळ्या होत्या. परंतु कौटुंबिक कलहाचे विष धनसुखलालच्या कुटुंबात पसरले नव्हते. सुशीलेच्या सावत्र आईने मरताना पुष्पाला सुशीलेच्या ओटचात घातले होते. आणि सुशीलेनेही पुष्पाला स्वतःच्या मुलीसारखेच वाढवले होते.

त्याबरोबरच सुशीला तिची वहीणही होती. त्यामुळे मोठी बहीण आणि धाकटी बहीण यांच्यामध्ये एकप्रकारची मैत्रीचीही भावना निर्माण झाली होती. नवीन जमान्यातील उच्छृंखलता आणि अमर्यादा याना त्या संबंधात कुठे वावच नव्हता. परतु स्त्रीस्वभावातील मनोरम चपलता आणि बडबडा स्वभाव जुन्या पद्धतीत दबला जातो, असे मानायची चूक कोणी करू नये. खरे पाहिले तर प्रत्येक युग आपल्याला अनुरूप, अशी विनोदी, रसिक किंवा नखरेल स्त्री उत्पन्नच करीतच असते. आणि म्हणून जुन्या-नव्या युगाला दोष देण्याऐवजी स्वभावाचे मनोरम तत्त्व मान्य करावे हेच योग्य आहे.

सुशीलेची आई वारली तेव्हा धर्मनिष्ठ धनसुखलालचा पुन्हा लग्न करण्याचा विचार नव्हता. परतु वंश चालू राहिला पाहिजे या इच्छेने त्याच्या निश्चयावर विजय मिळवला. वंश हा पुरुष वारसदाराकडेच चालू राहू शकतो, अशी भावना बाळगणारे या जगात अनेक लोक आजही आहेत. हल्लीच्या जागृत झालेल्या स्त्रीत्वावर त्यामुळे अन्याय होतो हे कोणाला समजतच नाही. परंतु ही भावना आजही सर्वमान्य आहे खरी. आणि हेच सनातन सत्य आहे असे मानून अनेक स्त्री-पुरुषांनी आपला जीवनक्रम घडविला आहे, हे विसरून चालणार नाही. पुत्रप्राप्ती न झालेल्या पत्नीने वंश चालू राहाण्यासाठी आपणहूनच पतीला आपल्या हयातीत दुसरी पत्नी करू दिल्याचे दाखले

हिंदू संसारात पाहिजे तितके मिळू शकतील.

म्हणूनच धनसुखलालच्या भावना चालू काळातील संदर्भात तिरस्करणीय ठरवण्या-ऐवजी त्या भावनेमागील सामर्थ्य समजावून घेणे योग्य ठरेल. दुसऱ्यांदा लग्न करणारा पुरुष तीस वर्षांचा असो, चाळीस-पन्नासाचा असो की साठ वर्षांचा त्याचे दोष काढून त्याची फजिती करण्याची वृत्ती त्या काळात एवढी जागृत नव्हती. मानवाची दुर्बलता आणि आवश्यकता यांचा हसून स्वीकार करायचा असतो, या वृत्तीनेच धनसुखलालच्या दुसऱ्या विवाहाला समाजाने मुळीच हरकत न घेता मान्यता दिली होती. धनसुखलालच्या दुसऱ्या पत्नीलाही आपल्यावर महान संकट येऊन कोसळले आहे, असे कधी वाटले नाही.

या दुसऱ्या पत्नीचे नाव सुमती होते.

तिच्या आणि सुशीलेच्या वयात पाच-सहा वर्षांचे अंतर होते, सुशीला बारा-तेरा वर्षांची होती तेव्हा तिचे लग्न झाले. वीस-बावीस वर्षांच्या तरुणीला अविवाहित ठेवणाऱ्या या नव्या युगात सुशीलेचा विवाह हा बालविवाहच मानायला हवा. परंतु त्या वेळी बारा वर्षांची मर्यादासुद्धा जास्तच मानली जाई. सुशीला एक-दोन वेळा सासरीही जाऊन आली. तिचा नवरा कॉलेजमध्ये शिकत होता. त्याच्या भावी यशा-बद्दल पुष्कळ आशा होत्या. परंतु तो पदवीधर होण्यापूर्वीच त्याला काळाने ओढून नेले. बिचारी सुशीला विधवा झाली. तिच्या या केविलवाण्या परिस्थितीबद्दल अनेकांनी अश्रू गाळले, सुस्कारे टाकले. परंतु त्याच क्षणापासून तिच्यावर कडक पहाराही बसवला गेला. विवाहित होती तेव्हा सुशीलेचे चारित्र्य हे फक्त तिच्या, फारच झाले तर तिचा नवरा आणि तिचे वडील यांच्या काळजीचा विषय होता. परंतु ती विधवा झाली आणि जगातील समस्त माणसांना तिच्या चारित्र्याची काळजी घ्यावीशी वाटू लागली. ती बसते कशी, बोलते कशी, खाते काय, जाते कुठे, या सगळ्या बारीकसारीक गोष्टी जाणून घ्यायची समाजाला गरज भासू लागली. तिच्या दुःखी वडिलांनी त्या दिवसा-पासून काळी पगडी घालायला सुरुवात केली. गोड खाणे सोडून दिले. सुशीलेला धार्मिक पुस्तके वाचायला प्रोत्साहन दिले, आणि धर्मकार्य, देवपूजा, पूजापाठ, व्रते, उपवास इकडे तिचे लक्ष जाईल, असे प्रयत्न करायला सुरुवात झाली.

पुत्रप्राप्तीच्या इच्छेने केलेल्या दुसऱ्या विवाहापासूनही धनसुखलालला पुत्र झालाच नाही. ते स्वभावाचे सच्चे होते. जीभ थोडी तिखट असली तरी सहृदय, सज्जन होते. पुत्राची आशा बाळगून त्याच्याबद्दलची स्वप्ने पाहाणाऱ्या पति-पत्नींना समजले की ईश्वराने त्यांना मुलाऐवजी मुलगीच पुन्हा दिली. पुष्पाचा जन्म झाला तेव्हा धनसुखलाल

आणि त्यांची पत्नी सुमती यांना फारसा आनंद झाला नाही. परंतु थोडया दिवसांनी पहिली नाराजी कमी झाली. धार्मिक वृत्तीच्या धनसुखलालनी 'ईश्वराच्या मनात होतं तसं झालं' अशी स्वतःची समजूत काढून मनाचे समाधान केले. आणि पुष्पाची आई तर एक दोन दिवसांतच पुष्पावर मुलासारखीच माया करू लागली. हळूहळू पुष्पा दोघांचीही लाडकी बनली.

पण पुष्पा लाडकी बनली म्हणून तिच्या पित्याचे सुशीलेवरचे प्रेम काही कमी झाले नाही. सुदैवाने पुष्पाची आईही सालस आणि प्रेमळ होती. स्वतःपेक्षा फारच थोडया वर्षांनी लहान असलेल्या सुशीलेबद्दल तिला खूपच सहानुभूती वाटत होती. मान-पानाच्या आणि जुन्या पद्धतीच्या राहाणीचा अभिमान बाळगणारी कुटुंबेसुद्धा अनेकदा सुधारलेल्या कुटुंबांसारखीच एकाकी पडतात. कारण या दोन्ही प्रकारांमुळे सर्वसामान्यांशी त्यांचा फारसा संबंध राहात नाही. त्यामुळे पुष्पाच्या आईची सुशीलेशी मैत्री जमली आणि या सावत्र मायलेकी कोणत्याही प्रकारची कुरबुर भांडणे न होता शांतपणे राहू लागल्या.

सुशीला विधवा झाली तेव्हा तिच्या सावत्र आईला फार दुःख झाले. सुशीले-विषयींच्या गोड कल्पना मनाशी रंगवून तिला हसवून स्वतः हसणाऱ्या आईचे हास्य लोप पावले. आपल्या मुलीला कसलीही उणीव भासणार नाही यासाठी ती सतत प्रयत्न करीत असे. सुशीलेला ते जाणवत होते. आपली सावत्र आई आणि बहीण यांच्या-बद्दल दिवसेंदिवस तिला जास्तीच प्रेम वाटू लागले.

आपली धर्मशास्त्रे संस्कृतात लिहिलेली असतात. त्यामुळे धार्मिक ज्ञानात भर घालायची तर संस्कृतचा अभ्यास आवश्यक ठरतो. धनसुखलालला वाटले सुशीलेला संस्कृत शिकवले तर बरे होईल. सुशीलेला एकटे वाटू नये म्हणून तिच्या आईनेही संस्कृत शिकायचे ठरवले. आणि सुशीलेच्या मनात संस्कृत शिकण्याची गोडी हळूहळू निर्माण केली. एका सुप्रसिद्ध, मध्यम वयाच्या विद्वान शास्त्र्याजवळ, आपल्या स्वतःच्याच घरी सुशीलेला संस्कृत शिकता येईल, अशी व्यवस्था धनसुखलालने केली. एक दिवसाआड येता येता शास्त्रीबुवा रोज तिला शिकवायला येऊ लागले.

संस्कृतचे ज्ञान माणसाला नेहमीच सात्त्विक बनवते अशी एक चुकीची समजूत आहे. आपली धर्मशास्त्रे संस्कृतमध्ये आहेत हे खरे. परंतु शृंगाराने भरलेले साहित्यही संस्कृतात भरपूर आहे, ही गोष्ट अनेकजण विसरून जातात. भर्तृहरीचं नीतिशतक आणि वैराग्यशतक शिकायला सुरुवात केली की ताबडतोब लक्षात येते की याच वृत्तात याच कवीचे 'शृंगारशतक' उघड उघड लिहिलेले आहे. नीतिशतक पुरे

व्हायच्या आतच विद्यार्थी, कवणी न शिकवता शृंगारशतक अर्थासह वाचू लागतो. वैराग्याबरोबरच विकारा (विषया) ला पोषक अशी तत्त्वेही संस्कृत साहित्यात मिळू शकतात.

संस्कृत साहित्याच्या जाणकारांची शौकिनता इतर कोणत्याही देशातील शौकिनांपेक्षा कमी नाही. शुद्ध-अशुद्ध उच्चारांच्या काटेकोर तत्त्वांचे विवरण करणाऱ्या पंडिताचे रसिकत्व इंग्रजी शिकलेल्या सुधारकाच्या रसिकत्वापेक्षा काही कमी बहकलेले असत नाही.

शास्त्रीजी मध्यमवयीन होते. वय वाढले की रसिकता कमी होते, अशी एक चुकीची समजूत आहे, हा समज खोटा आहे हे सगळ्या मध्यमवयीनांना माहीत आहे. परंतु रसिकतेबरोबर अनुभवही मिळालेला असतो, आणि त्या अनुभवाच्या जोरावरच मध्यमवयीन पुरुष आपली रसिकता लपवू शकतो. आणि जगाचा आपल्याबद्दलचा भ्रम कायम राहील अशा गूढ रीतीने आपल्या रसिकतेचा उपयोग करून घेऊ शकतो.

शास्त्रीजी संस्कृत शिकवता-शिकवता अगदी वाहवत चालले. तेव्हा एक दिवस पुष्पाची आई धनसुखलालना म्हणाली,

'या शास्त्र्याला घरातून हाकला आधी. त्याच्याजवळ मुलीला शिकायला ठेवायचं नाही.'

'पण झालं काय?'

'मी सांगते ते करा आधी.'

'कारण सांगितलं नाहीस तर त्याला मी मुळीच काढणार नाही.'

'वाईट माणूस आहे तो.'

'वाईट तू असशील. त्या गरीब बिचाऱ्या पवित्र ब्राह्मणाची कशाला निंदा करतेस?' धनसुखलाल म्हणाले.

त्यानंतर दोनचार दिवसांनी शास्त्रीजी घरी यायचेच बंद झाले. त्यांच्याऐवजी कॉलेजात शिकणारा एक विद्यार्थी संस्कृत शिकवण्यासाठी येऊ लागला. धनसुखलाल कॉलेजमधल्या एका प्राध्यापकांना भेटले. आपल्या मुलीला संस्कृत शिकवण्यासाठी एक सच्छील विद्यार्थी हवा असल्याचे त्यांनी प्राध्यापकांना सांगितले. असल्या व्यवहारपटू पोक्त शास्त्र्यापेक्षा हा तरुण पोरगा जास्त सभ्य निघेल, अशी त्यांची कल्पना होती.

आणि झालेही तसेच. हा विद्यार्थी अगदीच लाजरा होता. सुरुवातीसुरुवातीला तर आपल्याच वयाच्या त्या तरुणीला संस्कृत शिकवताना त्याला भारी संकोच वाटत असे.

सारा वेळ तो प्रक्षुब्ध मन:स्थितीत असायचा. तो सहसा वर मान करूनही पाहात नसे. पुष्पाची आईही वेळोवेळी त्याच्याजवळ बसून शिकायचे नाटक करीत असे. या लाजऱ्या मुलाबद्दल एकदा बोलणं निघालं तेव्हा तिनेच सांगितले होते.

'सुशीला, आपले हे छोटे मास्तरसाहेब एखाद्या मुलीपेक्षाही लाजरे आहेत !'

परंतु एवढ्या लाजऱ्या मनातही तीव्र आग पेटलेली असते. या विद्यार्थ्याचे चारित्र्य काचेसारखे स्वच्छ होते. त्याचे संस्कार उच्च दर्जाचे होते. त्याचे विचार क्रांतिकारक होते. त्याला अन्याय सहन होत नसे. मानवाची निष्ठुरता पाहिली की त्याचे रक्त तापत असे. मानवाचा मूर्खपणा पाहिला की तो भडकून जात असे. शिकत असणारा, उच्च आदर्श राखणारा विद्यार्थी ज्या विचारांच्या कक्षेपर्यंत पोहोचू शकतो ती मर्यादा त्याने गाठली होती. सगळ्या समाजाला उलथून देऊन त्याची पुनर्घटना करायची गरज आहे ह्या मताचा तो होता.

परंतु त्याच्या सांसारिक परिस्थितीमुळे तो चुपचाप राही. तो गरीब होता. अगदी कमी बोलत असे. त्यामुळे सगळ्या कॉलेजात तो अत्यंत शांत विद्यार्थी म्हणूनच ओळखला जात असे. परंतु अनेकदा आपल्या जिवलग मित्रापाशी बोलताना त्याच्या हृदयातली आग त्याच्या बोलण्यातून प्रगट होत असे. त्यावेळी सगळेच थक्क होऊन जात. त्याचा खाजगी मालमत्तेवर सगळ्यात जास्त रोष होता. लग्नसंस्थेतील मुहूर्ताच्या मूर्ख कल्पनेवर तो सडकून प्रहार करीत असे. राजसत्तेच्या स्वार्थाबद्दल तो तिरस्कार व्यक्त करी. आणि धर्म म्हणजे माळ्यावर टाकून देण्यासारखी निरुपयोगी वस्तू आहे, असे त्याचे मत होते. एवढे सगळे बोलून झाल्यावर दुसऱ्याच क्षणी तो मित्रांबरोबर एखाद्या लडिवाळ मुलासारखा निरागस वागू लागे. सारेजण त्याला लहान मूल मानीत. आणि त्याच्या विचार-वैचित्र्यांना बालकाच्या अस्थिर चमत्कारिक व विचार-शृंखलेसारखे मानीत आणि त्यातली मजा अनुभवीत.

अशा तरुणाबद्दल सुशीलेला सहानुभूती वाटली नसती तरच नवल. तिच्या आई-लाही हा मुलगा फार आवडला होता.

एक दिवस धनसुखलाल रागारागाने म्हणाले,

'असला नादान मुलगा मला इथे नको आहे. उद्यापासून तुमची संस्कृत शिकवणी बंद करून टाका.'

'एवढं काय झालं ?' सुमतीने विचारले.

'लोक काय म्हणतात ते माहीत आहे का ?'

'लोक निरुद्योगी आहेत ! त्यांचं काय ? बिचारा तो मुलगा वरतीसुद्धा पाहात नाही.'

पण लोक बोलायला लागले होते. शास्त्रीबुवामध्ये समाजाला काही दोष दिसला नव्हता. कारण समाजाच्या दृष्टीने तो एक पवित्र पुरुष होता. परंतु हा आगापिछा माहीत नसलेला मुलगा समाजाच्या दृष्टीने अयोग्य होता. इतकेच नव्हे तर धनसुखलाललाही आपले हे मत समजावे ह्याची काळजी समाजाने घेतली होती.

समाजाच्या या अन्यायामुळे सुशीलेचे मन त्या विद्यार्थ्याच्या बाबतीत आणखीनच हळवे बनले. जे करायची मनाई करावी तेच करायचा मोह व्हावा, हा नियम मानवाच्या उत्पत्तिकालापासून चालत आला आहे. सुशीला आणि तो विद्यार्थी परस्परांच्या जास्तच जवळ येत होते. सुमतीलाही या सुप्त आकर्षणाचा पत्ता नव्हता.

## 26. हे पाप आहे काय ?

**अथ केन प्रयुक्तो ऽ यं पापं चरति पूरुषः ।**
**अनिच्छन्नपि वार्ष्णेय बलादिव नियोजितः ।।**

**—श्रीमद्भगवद्गीता ।।**

खालची नजर वर न वळवणारा हा विद्यार्थी एक दिवस सुशीलेच्या आईजवळ येऊन उभा राहिला. त्याचा चेहरा कठोर परंतु गोंधळलेला दिमत होता. तो काही-तरी महत्त्वाचे बोलण्यासाठी आला आहे हे सुमतीने ओळखले.

'काय, झाली का शिकवणी ?'

'मी तुम्हाला एक विनंती करायला आलो आहे.' विद्यार्थ्याने घाबरत घाबरत म्हटले.

'मागा ना काय ते ?'

'सुशीलेशी लग्न करायची मला परवानगी द्या.' आपले सगळे धैर्य एकवटून त्या विद्यार्थ्याने दोन भागात ते वाक्य म्हटले.

आईच्या हातात छोटया पुष्पेचे झबले होते. ते तिच्या हातातून गळून पडले. त्या-बरोबरच तिच्या भिवया वाकडया झाल्या. ती संतापून ओरडली, 'आताच्या आता या घरातून चालते व्हा– जा.'

विद्यार्थी तसाच उभा होता. त्याने आज धीट बनायचा निश्चयच केला होता. विधवांना पुनर्विवाहाचा हक्क मिळालाच पाहिजे या तत्त्वावर त्याचा विश्वास होता. परंतु त्या आदर्शवादी विद्यार्थ्याला विसर पडला होता की आपल्या विधवा मुलीचा पुनर्विवाह करण्याऐवजी ती मेलेली तिच्या आईवडिलांना चालली असती. तो विद्यार्थी म्हणाला,

'त्यात सुशीले . . .'

'मला एक अक्षर ऐकायचं नाही तुमचं. शरम वाटायला पाहिजे तुम्हाला. जाता की नाही इथून?'

खालून धनसुखलालचा मोठा आवाज ऐकू आला. विद्यार्थी घाबरून गेला. आई म्हणाली,

'ह्यांनी ऐकलं तर ते तुम्हाला इथल्या इथे मारून टाकतील, सुशीलेलासुद्धा.'

आता मात्र विद्यार्थ्याला खरोखरच भीती वाटू लागली. स्वतःसाठी नाही; सुशीलेसाठी. सुशीलेला खरेच तिच्या वडिलांनी मारून टाकले तर? हल्ली युरोपमध्ये सर्वमान्य झालेल्या नीतिमत्तेनुसार— जातीय स्खलने समर्थनीय ठरतात. परंतु हिंदुस्थानात मात्र अजूनही तो अक्षम्य अपराध समजला जातो. विधवांच्या पुनर्विवाहाला समाजातील मोठ्या भागाने अजून मान्यता दिलेली नाहीच, परंतु पुनर्विवाहाला तयार झालेल्या आपल्या बहिणीला किंवा मुलीला तलवारीच्या एका घावात कापून काढायला तत्पर असलेले भाऊ किंवा बाप वाटेल तितके सापडतील, याची विद्यार्थ्याला जाणीव होती. तो तिथून मागे वळला. आईवडलांनी संमती दिली नाही तर सुशीलेला तिथून पळवून नेण्याची युक्ती आपण लढवू आणि पुन्हा या घरात परत येऊ अशी आशा त्या विद्यार्थ्याला वाटत होती.

धनसुखलालनी वर येऊन पाहिले तेव्हा आपल्या पत्नीचा चेहरा रागाने लालबुंद झालेला दिसला. सगळ्या दुनियेला दटावणारे धनसुखलाल आपल्या पत्नीला मात्र कधी रागावत नसत. दुसऱ्यांदा लग्न केलेल्या पतीला आपल्या पत्नीबद्दल जास्त प्रेम वाटते असा आक्षेप समाज त्यांच्यावर घेतो. धनसुखलालही या आक्षेपातून सुटले नव्हते. आवाजात शक्य तेवढे मार्दव आणून त्यांनी विचारले, 'का ग काय झालं?'

धनसुखलाल बाहेर संयम आणि मर्यादा या गुणांचे समर्थन करीत. पण एकटे असले की पत्नीला खेटून बसत.

'आणखी काय व्हायचंय? आग लागो त्या शिकवणीला!'

'कोणती शिकवणी? कोणाबद्दल बोलतेस तू?'

'ती त्या मास्तरची. आपल्याला वाटलं लहान पोरगा आहे. त्याला काही समजत नसेल. पण हा तर एकदम बेरड निघाला.'

'मी काय म्हटलं होतं तुला? त्या शास्त्रीला येऊ दिलं असतं तर?'

'मेला तो तुमचा शास्त्री. सगळे पुरुष मेले इथून तिथून सारखेच!'

सगळ्या पुरुषजातीवर आरोप करणारी पत्नी स्वतःच्या पतीलाही त्यातून सोडत नाही, याची जाणीव ठेवून धनसुखलालनी विचारले,

'अग पण, झालं काय ते तर सांगशील ?'

'त्या मास्तरनं सुशीलेबरोबर.... मेलं बोलायलाही लाज वाटते.... लग्न...'

'ओ ? काय म्हणतेस ? त्या हरामखोराला आजच्या आज मारून टाकतो मी.' रागारागाने उभे राहिलेले धनसुखलाल गर्जना करीत म्हणाले, सारे घर थरथरले. आपण स्वतःही दुसऱ्यांदा लग्न केले होते हे ते विसरले. आणि आपल्या मुलीचे दुसरे लग्न करण्याबद्दल सुचवणाऱ्या त्या विद्यार्थ्याचा गुन्हा त्यांना इतका गंभीर वाटला की त्याला माणुसकीने मरू देण्याची शिक्षाही कमीच वाटली. त्यांनी कॉलेजात, आणि इतरत्रही तपास केला. परंतु त्या विद्यार्थ्याचा त्यांना कुठेच पत्ता लागला नाही. तो त्यांच्या तावडीत सापडला असता तर आपल्या विधवा मुलीशी लग्न करण्याच्या भयंकर पापवासनेबद्दल त्यांनी त्याला जबरदस्त शिक्षा केली असती.

सुशीलेचे शिकणे बंदच झाले. आई आणि बाप दोघेही त्या विद्यार्थ्याच्या नीच पाशवीपणाबद्दल सुशीलेच्या देखत फार कडवटपणे बोलत असत. आणि सुशीलेला आपले बोलणे पटते असेच ते मानीत. सुशीलेच्या मनात मात्र त्या विद्यार्थ्याबद्दल मुळीच राग नव्हता. ती एकटीच रडत बसे. स्वतःच्या नशिबाला दोष देई. व्यक्तींचे भाग्य साधारणपणे विधाता घडवतो. मात्र अनेकदा समाजच विधात्याचा हा हक्क हिरावून घेतो. समाजाला हा हक्क आहे की नाही हे विचारणेही अशावेळी पाप ठरते. समाजाने स्त्री आणि पुरुषांसाठी वेगवेगळे आचार ठरवून दिले नसते तर सुशीलेला आपले दैवच नासले आहे असे मानावे लागले नसते.

सुशीलेची नाराजी, रडणे काही दिवस चालले. हा विधवांचा जीवनक्रमच होता त्यामुळे धनसुखलाल आणि त्याची पत्नी यांना त्यात विशेष काही वाटले नाही. शिक्षकांबाबत घडू नये ते घडले होते. आणि त्याचा केंद्रबिंदू सुशीला होती. त्यामुळे त्या सद्वर्तनी तरुणीला वाईट वाटत असणार असेच ते मानीत होते. तिला दिलासा देण्यासाठी ते त्या शिक्षकावर कडक टीका करीत. ती टीका सुशीलेचे काळीज कापीत जाई. आपल्याला मन आहे ही गोष्टच मुळी तिला त्या विद्यार्थी-शिक्षकाशी संबंध आल्यानंतर कळून आली होती. आणि आपल्या मनाचे अस्तित्व जाणवते न जाणवते तोच त्या मनावर खोल जखम झाली होती. त्या विद्यार्थ्याचे तोंड तिला परत दिसले नाही.

काही दिवसांनंतर सुशीलेचे कष्टी झालेले मन स्थिरावेल असे तिच्या आईला वाटले होते. परंतु सुशीलेचे दुःख कमी होत नसल्याचे तिला दिसून आले, आणि तिला काळजी वाटू लागली. सुशीलेबद्दल तिला बहिणीसारखे प्रेम वाटे. रडणाऱ्या सुशीलेला तिने

एक दिवस विचारले, 'सुशीला, सारा दिवस तू रडत का बसतेस ?'

आईला ठाऊक नव्हते, पण सुशीला रात्रीही रडत असे. ती काहीच बोलली नाही. उलट डोळ्यांवर हात धरून ती आणखीनच रडू लागली. आईने आपल्या दुःखी मुलीचे डोके आपल्या खांद्यावर ठेवले आणि ती तिच्या पाठीवरून हात फिरवू लागली.

जशी आयुष्याला मर्यादा असते तशीच हसू आणि रडू या आयुष्यातील दोन अंगांना-सुद्धा मर्यादा असते. मनुष्य हसत असला की त्याला वाटत असते आयुष्यभर असे हसूच का नसावे ? दुःखाने तो जेव्हा पिंजून जातो तेव्हा त्याला वाटते सारे आयुष्यभर असे रडावे लागणार असेल तर कसे व्हायचे ? महाभयकर रडण्यालामुद्धा शेवटी मर्यादा घालावी लागतेच. सुशीला रडत होती. आईने तिचे डोळे पुसले आणि विचारले,

'असं काय करतेस सुशीला ? अंगात ताकद कशी येईल मग ?'

सुशीलेने डोळे उघडून आईकडे पाहिले. तिचे डोळे अत्यंत थकलेले दिसत होते. त्यात जगाबद्दलचे वैराग्य होते. समाजाच्या रूढिबंधनातून सुटण्याची तळमळ होती. ओतप्रोत सौदर्याने भरलेल्या त्या चेहऱ्यावर सौंदर्याला निस्तेज बनवणारा विषाद पाहाताच मैत्रिणीसारख्या असलेल्या त्या सावत्रआईचे मातृत्व उफाळून आले,

'डोळे किती सुजलेत ग पोरी !'

जखम झालेल्या मुलाचा आईने पापा घ्यावा अशा तऱ्हेने ते वाक्य उच्चारत आईने सुशीलेला दिलासा द्यायचा प्रयत्न केला. दुसरी वेळ असती आणि या पाचएक वर्षांचा फरक असलेल्या तरुणींच्यातला हा माय-लेकीचा खेळ असता तर दोघींनाही खोखो हसू आले असते. पण आता सुशीला म्हणाली,

'मला विष आणून दे.'

चमकून आईने सुशीलेकडे पाहिले. तिचा चेहरा आज असा वेगळा का वाटत होता ? ती भयंकर रडत होती. गेला महिनाभर ती दुःखात बुडून गेली होती. तिच्या चेहऱ्यावर सुखाची कुठे रेषाही दिसत नव्हती. तरीमुद्धा हा चेहरा असा वेगळा का वाटतो आहे ? प्रियतमेचा अश्रूंनी भिजलेला चेहराही प्रियतमाला शरदाच्या स्वच्छ चंद्रप्रकाशा-सारखा मनोरम वाटतो. ही तर सखी होती. सुशीलेच्या चेहऱ्यावर हे एवढे तेज कसले ?

'कशासाठी ?' आईने विचारले.

'मरण्यावाचून आता दुसरा इलाजच नाही.'

'फार झालं हं आता. म्हातारी झालीस की काय ?'

'नाही दिलंस तर मी जीभ हासडून मरेन.'

'सुशीला, सुशीला, अग हे तू काय बडबडते आहेस ?' घाबरून जाऊन आईने विचारले. आज तिला काही समजतच नव्हते.

'मी खरं तेच सांगते आहे.' सुशीलेने अेक निःश्वास टाकला. त्या निःश्वासाने तिचे सारे शरीर थरथरले. बसलेल्या सुशीलेच्या शरीराकडे आई पाहात होती. एकाएकी तिच्या सारे काही लक्षात आले. मातृत्वाचा प्रत्यक्ष अनुभव घेतलेल्या आईला विजेचा झटका बसावा तसे समजून आले की सुशीलेचा देहही मातृत्वाचे ओझे वाळगतो आहे.

हे समजून येताच आईच्या अंगावर जणू वीज कोसळली. काही वेळ तिचे मन बधीर झाले. तिचे मन भानावर आले तेव्हा तिचा देह थरथरू लागला.

अग, आई ग ! या विधवा मुलीला. . .' ती पुरता विचारही करू शकली नाही. श्रीमंत पती आणि सावत्र मुलगी या दोघांच्या सहवासात राहाणाऱ्या त्या तरुणीला काय बोलावे आणि काय करावे तेच समजेनासे झाले. मनातला गोंधळ सहन न होऊन ती धावतच आपल्या खोलीत गेली.

'काय झालं हे ! मेला तो मास्तरडा. . . ! जेवढ्या आठवत होत्या तेवढ्या सगळ्या शिव्या तिने मनातल्या मनात त्या विद्यार्थी-शिक्षकाला देऊन टाकल्या. स्त्री-पुरुषांच्या अनैतिक संबंधाच्या बाबतीत पुरुषांचाच दोष असतो. परंतु तो सहन करावा लागतो स्त्रीला. जोवर स्त्रीला पुरुषांसारखे सामाजिक आणि आर्थिक स्वातंत्र्य मिळत नाही तोवर त्यात पुरुषाचाच दोष आहे असे मानले तर ते चुकीचे नाही.

मात्र समाज पुरुषाचा बचाव करतो आणि स्त्रीला बळी देतो. मास्तर पळून जाईल; आणि पळून गेला नाही तरी चार दिवस त्याची निंदा होईल, बस्स. या पलीकडे काही होणार नाही. परंतु धनसुखलालच्या धर्मनिष्ठ आणि प्रतिष्ठित कुटुंबाच्या सात पिढ्यांना कलंक लागणार होता. हा कलंक कसा धुऊन काढायचा ? मानवाला पाप करण्याची जेवढी भीती वाटत नाही, तेवढी ते पाप पकडले जाण्याबाबत वाटते. कलंक तर लागला आता, पण त्याचे निवारण कसे करायचे ? त्याची बोलवा बाहेर मुळीच होणार नाही याची आईला आधी काळजी पडली. पण हे होणार कसे ?

'तुम्ही करताय काय सगळे ?' धनसुखलाल आत येत जरा चिडूनच म्हणाले.

पतीचे शब्द ऐकताच पत्नीला झटका बसल्यासारख्या तीव्र वेदना झाल्या.

'ह्यांना समजलं तर ? ह्यांना समजलं असेल का ? तिचे काळीच धडधडू लागले.

तिकडे सुशीला रडत बसलीय आणि इथे तू तोंड फुगवून बसलीस. तुम्ही भांडलात की काय दोघी ?' सावत्र संबंधही प्रेमाचे ठेवण्यात आजपर्यंत यश लाभलेले धनसुखलाल

घाबरून म्हणाले.

'ती मुलगी बिचारी कधीतरी भांडते का ?' सुमतीने म्हटले.

'मग तू भांडली असशील ?'

'माझी सावत्र मुलगी ना ती !' सुमतीचे मातृहृदय उफाळून आले. सुशीला आपली सख्खी मुलगी नाही याचे सुमतीला आज दुःख झाले. तिच्या मातृत्वाने सुशीलेला जास्तच प्रेमाने कवटाळले.

'मी कुठं तसं म्हणतोय ? पण एकीला रडताना पाहिलं. आणि दुसरीचा चेहरा घुम्म दिसला म्हणून विचारलं.'

'आम्ही भांडलो तरी तुमच्याकडे तक्रार घेऊन नाही येणार, समजलं ?'

'पण झालं काय ते तर सांगशील ?'

'काय होणार ? एक पुस्तक वाचत होतो. वाचता वाचता मला अन् सुशीलेलाही रडू येऊ लगलं. दुसरं काय ?' आईने उडवाउडवीचे उत्तर दिले.

'पण मग अशी पुस्तकं वाचता कशाला ?'

'सबंध दिवस करायचं काय मग ?'

'दोन तास जप करावा. ठाकूरजीची (देवाची) पूजा करावी. गीतेचा पाठ म्हणावा.'

पतीचा सल्ला पत्नीने ऐकून घेतला. भोगविलासासाठी आतुर झालेले तारुण्य जप करता करताच संपून जाते, हे सुमतीला माहीत होते. धर्म सांगतो, भोगविलास वर्ज्य करा. पण तसे प्रत्यक्षात होत का नाही ? धर्मभावनांना आघात न पोचवता देहाला आपल्या अनावर भुका भागवता येतील, असा एखादा उपाय धर्म का नाही शोधून काढीत ?

पतीपासून आता ही गोष्ट लपवली खरी; पण कायमची कशी लपवणार ? तिला जगाची प्रतिक्रिया समजत होती. आणि पतीचीही प्रतिक्रिया तिला चांगलीच माहीत होती.

'ह्यांना समजलं तर विष देऊन ते मारून टाकतील.' नुसत्या विचारानेच सुमती शहारली.

बिचारी सुशीला ! असे काय पाप तिने मागल्या जन्मी केले होते, की तिला या जन्मी विधवा व्हावे लागले ? विधवांच्या दुःखावर काही उपाय नाहीच का ? तिला देह आणि मन या दोहींना मारावेच लागते. ज्या वेळी जगातल्या अणुरेणूतून सौंदर्य फुलते त्यावेळी विधवांनी काय आपले डोळे फोडून टाकायचे ? ज्या क्षणी सारी पृथ्वी मधुर संगीतात नाचत असते त्यावेळी तिला काय बांधून ठेवायचे ? ज्या क्षणी मनात

चांदण्यांनी फुललेल्या स्वप्नांचा आनंद फुलतो त्याच क्षणी तिने त्या मनावर आपल्याच हाताने खंजीर खुपसायचा ? विवाहित अवस्था म्हणजे भोगविलासाचा परवाना. आणि वैधव्य म्हणजे जीवनाचे स्मशान किंवा कबरस्तान ? का म्हणून ? स्त्री-पुरुषांच्या संबंधावर विवाहाचा शिक्कामोर्तब झाला असेल तरच तो पवित्र ? ठीक आहे. समाज स्वतःच्या सोयीसाठी रूढी-रिवाज बनवतो. पण ज्यात समाजाची कसलीच सोय नसते अशा, वालविधवांना लग्नापासून वंचित ठेवण्याच्या रूढीत कुठे आला आहे न्याय, दया आणि उपयुक्तता ? विधवांच्या शरीरातला कणन् कण चिरडून टाकतो. चिरडून जाणारे त्याचे मन तडफडते. आणि जात्यातून भरडताना जरा दूर गेले तर समाज 'पाप' 'पाप' म्हणून ओरडा करतो.

खरेच का हे पाप आहे ?

की सृष्टी निर्माण करणाऱ्या महाशक्तीला कागदाखाली दाबून टाकण्याच्या सामाजिक प्रयत्नांचा हा प्रत्याघात आहे ?

# 27. समाजातील बलिदान

**होय रे मज विषारी नागाने दंश केला**
**अहो संत आता विष कसे उतरवणार ?**
**होय रे माझ्या अंगी बाण घुसला धारदार**
**अहो संत हा घाव उरीचा कसा भरणार ?**

**—न्हानालाल**

हिंदू कुटुंबात चौकशी केली तर कितीतरी विधवांच्या आयांनी असा विचार केलेलाच नसेल ! कदाचित फार बारकाईने आणि स्पष्टपणे अनेक मातांनी ही चर्चा केली नसेलही. परंतु एवढे खरे, की एकएक आई स्वतःच्या मुलीला अशा परिस्थितीत अनपेक्षित संरक्षण देत असते. मुलीचे असे कुठलेच पाप नसते की जे आई माफ करीत नाही.

पाप्याला पापी म्हणून हटकणारा कोणता धाडसी मनुष्य या जगात जन्माला आला आहे ? ज्याने आयुष्यात एकदाही पाप केले नसेल त्यानेच पाप्याला दगड मारावे ! आहे कोणी दगड उचलायला तयार ?

पाप्याचा तिरस्कार करण्याची घमेंड मारणारा स्वतःच महापापी असतो. जसजसा सुशीलेच्या वर्तनाचा विचार सुमती करू लागली तसतसे तिच्या मनात क्षमेचेच विचार येऊ लागले. काही दिवसांनी तिने त्या गुन्हेगार विद्यार्थ्याला शिव्या द्यायचेही बंद केले.

प्रसंग पडला की अननुभवी तरुणीसुद्धा व्यवहारकुशल बनते. रडून-रडून थकलेल्या सुशीलेचे डोके मांडीवर घेऊन बसलेली सुमती विचार करीत होती. सगळ्यात सोपा उपाय कोणता ? सुशीलेला विष देऊन मारून टाकायचे ?

उपाय नुसता मनात येताच सुमतीचा थरकाप झाला. 'अग आई ग ! त्यापेक्षा

मीच पिते ते विष!' सुशीलेला तिने आणखीनच जवळ घेतले. ती सुशीलेच्या कपाळा-वरून हात फिरवू लागली तेवढ्यात छोटी पुष्पा खेळत खेळत तिथे आली. आणि आईच्या गळ्यात पडून म्हणाली, 'आई ग, मला नाही ना घेत मांडीवर ?'

'अश्शी मत्सरी आहेस! सुशीला मांडीवर झोपलीय ते पाहावत नाही वाटतं ?' अर्धवट दटावीत, अर्धवट हसत सुमतीने पुष्पाला म्हटले

मुलांना प्रेमात वाटेकरी चालत नाही. पुष्पा कुरकुरली. 'ताई काय माझ्याएवढी आहे मांडीवर झोपायला ?' आईच्या मांडीकडे सरकणाऱ्या मुलीने विचारलेल्या ह्या प्रश्नाचे उत्तर देणे कठीण होते. मुलांचे अनेक प्रश्न असेच अनुत्तरित राहातात.

'ये ग बाई, तू झोप मांडीवर.' सत्याग्रहाला मार्ग मोकळा करून देणेच सुशीलेला योग्य वाटले.

'नको, नको. तू जरा पड पाहू. आताच रडूनरडून जरा शांत झालीयस. पुन्हा रडायला लागशील' सुशीलेला झोपवत सुमती म्हणाली.

'ताई रडत होती ? एवढे मोठे लोक मांडीवर झोपायला रडतात ?' आश्चर्याने पुष्पाने विचारले. माणसाला मरेपर्यंत आईची मांडी गोडच वाटते हे पुष्पाला कसं माहीत असणार ? दोघीजणी हसू लागल्या.

'जा, खेळ जा, थोडा वेळ.' सुमती म्हणाली.

'आई, आपण असं करू या ना. ताई तुझ्या मांडीवर निजेल, आणि मी ताईच्या मांडीवर!' पुष्पाने मार्ग काढला.

मोठमोठे प्रश्न सोडवायचे काम मुलांवर सोपवले तर ती निश्चितच मुत्सद्द्यांपेक्षा जास्त चांगल्या रीतीने त्यांचा उकल करतील.

सुशीलेचे मन भरून आले. आपले दुःख विसरून जाऊन तिने पुष्पाला आपल्याजवळ ओढले. सुमतीच्या डोळ्यांसमोर एक चित्र दिसू लागले. ती सुशीलेला मांडीवर घेते आहे आणि सुशीला पुष्पाला! मातेचे वात्सल्य म्हणजे अखंड आणि अनंत काळपर्यंत वाहणारा झरा आहे. एक माता म्हणजे अनेक पिढ्यांच्या परिवाराची माता. तिचे अपार वात्सल्य सर्व पिढ्यांना लाक्षणिकदृष्टया मांडीवरच घेत असते.

'सुशीलेला काहीही होता कामा नये' आईने मनाशी निश्चय केला. पण मग आता दुसरा मार्ग कोणता ? सुशीलेच्या अजून जन्माला न आलेल्या मुलाला नाहीसे करावे लागेल. अशा तऱ्हेने ?

समाज ज्याला कलंक मानतो त्यातून वाचण्यासाठी मनुष्य आणखी कितीतरी कलंक अंगावर ओढवून घेतो. जगात यायला निघालेल्या मुलांना ती जन्माला येण्या-

पूर्वीच विष दिले जाते. हे विष घेऊनही ती जन्माला आलीच तर त्यांचा गळा दाबला जातो. सुमतीच्या डोळ्यांसमोर पुष्पा आली. पुष्पाचा गळा कोणी दाबला तर ?

सुमतीचे डोळेच फिरले. स्वतःचा जीव गेला तरी बेहत्तर. पण पुष्पाला मात्र काही होता कामा नये. मग सुशीलेच्या बालकाला तरी कसे मरू द्यायचे ? त्या मुलाचा काय अपराध आहे ? पुष्पा जगायला पात्र का आणि सुशीलेचे मूल मरायला पात्र का? लग्नाचा शिक्का एकाचे रक्षण करते. आणि त्या शिक्क्यावाचून जन्मलेली सर्वच मुले मरायला योग्य असतात ! हा कोणता न्याय ?

'सुशीलेच्या मुलालाही काही होता कामा नये.' सुमतीने निश्चय केला. स्त्रीचा निश्चय म्हणजे शक्तीचा निश्चय. हसरी, खेळकर, अननुभवी सुमती एकाएकी अनुभवी, दक्ष आणि चतुर बनली. तिच्यात जास्त समज आली. थोडे कपट आले, कुटिलता आली आणि खोटेपणाही आला. तिने पतीची आणि जगाची जबरदस्त फसवणूक आरंभिली. सुशीलेचा तिने जिवापाड सांभाळ केला. लोकांना, घरातल्या माणसांनाही संशय येणार नाही अशा रीतीने ती सुशीलेला योग्य वेळी देवदर्शनाला घेऊन जात असे किंवा आजारी पाडीत असे. सुशीलेला मोठ्या चलाखीने तिने आपल्या नवऱ्याच्या डोळ्यांसमोरून लांब राखले होते. सुशीलेचा सुमतीवर संपूर्ण विश्वास होता. तिला स्वतःची भयंकर परिस्थिती समजून चुकली होती.

सुशीलेचा त्या विद्यार्थ्याशी विवाह करून देणे हा सगळ्यात उत्तम मार्ग होता. तो नाही तर बेकायदा जन्म घेणाऱ्या त्या मुलाचा स्वीकार करायचा हा दुसरा मार्ग. परंतु हे दोन्ही स्पष्ट आणि योग्य मार्ग अवलंबणे समाजाने अवघड बनवले होते. सल्ला द्यायला सोपा असतो,पण त्याचे पालन करणे सल्ला देणाऱ्यालाही अवघड जाते. वेड्या-वाकड्या रस्त्याने जावे लागते. कपट आणि खोटेपणाचा आश्रय घ्यावा लागतो. पापाची ओळखसुद्धा नसलेल्या कोमल हृदयाला सोंगे घ्यावी लागतात. या समाज-व्यवस्थेवर ज्वालामुखीचा कडकडीत रस पुन्हा ओतायला पाहिजे.

पण हे जोपर्यंत होत नव्हते तोपर्यंत बिचारी सुमती तरी दुसरे काय करणार ? विचार करून, उपाय शोधून थकलेल्या सुमतीचा चेहरा काळवंडला होता. तिच्या केसांत रूपेरी कडा दिसू लागली होती.

काही दिवसांनंतर सुमतीने धनसुखलालना व्यापार आणि यात्रेच्या निमित्ताने काही महिन्यांच्या प्रवासाला पाठविले. पुष्पाच्या जन्माच्या वेळी बोलाविलेल्या बाईला तिने पुन्हा बोलावून आणले आणि पैसे चारून तिला वश करून घेतले. आपल्या एका जुन्या नोकराला तिने विश्वासात घेतले, त्याला पैसे देऊन त्याचे तोंड बंद करून

टाकले. त्या अभागी बालकाचा जन्म झाला तेव्हा अश्रूंच्या धारा वाहवत तिने त्याला जगातल्या एका अंधाऱ्या कोपऱ्यात सोडून दिले, मावल आई सख्ख्या आईपेक्षा जास्त प्रेमळ निघाली, सुशीलेची तब्येत बरी नव्हती, हे ती चांगली हिंडती-फिरती होईपर्यंत लोकांना समजलेच नाही,

मातृत्व आणि पितृत्व यांसारखे जवळचे नाते आणखी दुसरे कोणते असणार? दैवाने दिलेले हे बंधन विरहित संबंध चंद्र-सूर्याइतकेच स्पष्ट आणि सनातन आहे, मग ते समाजाने स्वीकारलेल्या पद्धतीनुसार केलेल्या लग्नाने संस्कारित झाले असोत वा नसोत.

सुशीलेने एक दिवस विचारले,

'आई, त्याचं काय झालं ग?'

सुशीला आता सुमतीला 'आई' अशी एकेरीच हाक मारू लागली होती. ती कोणाचा उल्लेख करीत आहे हे सुमतीला समजले.

'तेवढं तू विचारू नकोस. काहीही झालं नाही असं मानून ते सर्व विसरून जा.' सुमतीने तिला समजावले.

'विसरायचा प्रयत्न करते आहे ग. पण एकदा पाहिलेला तो चेहरा डोळ्यांपुढून हलतच नाही.'

नवजात बालकाचा आकारविकार नसलेला चेहरा आईशिवाय दुसऱ्या कोणाला आवडेल आणि आठवेल?

'मला काही विचारू नकोस आता. जरा तुला अक्कल आली तर बरं होईल.' स्वतः सुमतीही त्या मुलाच्या आठवणीने दुःखी होत असे.

'त्याचं काय केलंस तेवढंच सांग मला. मग मी पुन्हा कधी काही विचारणार नाही.'

'त्याला जिवंत सोडून दिलंय. बस्स?'

'बस्स!' हा शब्दच मातृत्वाला परिचित नाही. काही दिवसांनी सुशीलेने पुन्हा विषय काढला.

'आई, तू चिडणार नसशील तर एक विचारू?'

त्या प्रसंगाची आठवण विसरण्याचा आणि सुशीलेलाही त्याचा विसर पाडण्याचा प्रयत्न करणाऱ्या सुमतीच्या लक्षात आले. तिने डोळे मोठे करून सुशीलेला दटावले.

'खबरदार, पुन्हा तो विषय काढशील तर. तुला कधी अक्कल येणार आहे कोण जाणे?'

सुमती आई झाली होती खरी पण तिच्यातली मैत्रीण अजून जागी होती. आईचं

प्रेमच असहाय्य होते. आईच्या रागाला मात्र कोणीही भीक घालत नाही.

'तसं नाही ग. तू रागावू नकोस. जाऊ दे, मी आता काहीच विचारीत नाही.'

'अस्सं जरा.'

'मला एवढंच सांग, तू त्याला कुठे सोडलंस ?'

'ते मला विचारू नकोस. मला काहीही माहीत नाही.'

तरीसुद्धा सुशीलेने थोडीथोडी हकीकत काढून घेतली. त्यावरून तिला कळले की त्या मुलाला एका टोपलीत व्यवस्थित झोपवण्यात आले होते. तीत भरपूर पैसेही ठेवले होते. आणि मग ती टोपली त्या दाईने गुपचूप गावाच्या बाहेर एका ठिकाणी नऊन ठेवली होती.

ही जागा कोणती असावी ? सुशीलेच्या मनात प्रश्न उभा राहिला. तिच्या या प्रश्नाला मात्र सुमतीने कधीच उत्तर दिले नाही.

'त्याचं काय झालं असेल ?' बिननावाच्या या मुलाच्या फिकिरीत पडलेल्या सुशीलेने पुन्हा एकदा विचारले.

'ईश्वरच त्याचे रक्षण करो. आपण ज्याला मारायला निघतो त्याचं ईश्वर निश्चितच रक्षण करतो.'

'खरंच ? मग तो जिवंत असेल ?'

'हो, हो नक्कीच.'

'मला पाहाता नाही येणार त्याला ?'

'इथून चालती हो बघू. जरासुद्धा लाज नाही तुला !'

आता आईकडून आणखी काही माहिती मिळू शकणार नाही, याची सुशीलेला खात्री पटली. तिने त्या दाईला वश करून घ्यायला सुरुवात केली. सुशीलेला मुळीच काही माहिती द्यायची नाही अशी दाईला सक्त ताकीद होती. सुशीलेने तिला भरपूर पैसा दिला. तिची खूप विनवणी केली. आणि त्या मनाईचा जोर जरा कमी केला. मोठ्या मुष्किलीने त्या दाईने सुशीलेला घाबरत-घाबरत थोडीशी माहिती सांगितली. त्यावरून सुशीलेला समजले की गावदरीच्या मैदानावरील एकाकी जागेत त्या मुलाला ठेवायला ती चालली होती. तेवढ्यात तिला अस्पृश्य वस्तीकडे जाणारी एक अंधारी गल्ली दिसली. तिथेच त्या मुलाला ठेवायचे तिने ठरवले. सबंध रस्ताभर तिला कोणी भेटले नव्हते. परंतु अस्पृश्य वस्तीच्या एका गल्लीजवळ ती आली तेवढ्यात तिला लांबून कोणीतरी येताना दिसले. ती घाबरली आणि त्या टोपलीसकट ते मूल तिथेच टाकून तिने तिथून पळ काढला. पुढे काय झाले याबद्दल तिला काहीही माहिती नव्हती.

वैष्णवाची मुलगी महारवाड्यात जाणार कशी ? ह्या गुतागुंतीच्या प्रश्नाची उकल करण्याचा प्रयत्न सुशीला करू लागली. त्या मुलाचा जन्म झाला त्या वेळची सारी जुनी वर्तमानपत्रे काढून तिने वाचायला सुरुवात केली. अशा प्रकारे रस्त्यावर टाकून दिलेल्या जिवंत किंवा मृत मुलांविषयीच्या बातम्या वर्तमानपत्रे नेहमीच देतात. परंतु 'त्या' घटनेबद्दल मात्र वर्तमानपत्रात तिला काहीही बातमी मिळाली नाही.

तिचे वडील नगरपालिकेचे सभासद होते. परंतु धेड (महार) आणि भंगी लोकांच्या वस्त्या वेगवेगळ्या असतात, याखेरीज नगरपालिकेबद्दल काहीही जास्त माहिती त्यांनी तिला दिली नाही. शिवाय पालिकेचा संबध धेडाशी फारसा येत नाही. जास्त करून भंग्यांशीच येतो हेही तिला समजले. तेवढ्याने तिला फारसा फायदा होणार नव्हता.

अंत्यज वस्तीत जायचे कसे ? कधीकधी फिरायला निघाली की अस्पृश्य वस्तीत जायचा तिला मोह होई. परंतु गाडीवानाला कारण काय सांगणार ? ती वस्ती दिसली की ती अडखळे.

अंत्यजांच्या उद्धाराची चर्चा वैष्णवघरात होणे अशक्य होते. एक दिवस धीर करून सुशीलेने धनसुखलालना म्हटलं, 'अस्पृश्यांवर मोठा अन्याय होत आहे. उच्चवर्णियांनी त्याच्यासाठी काहीतरी केलं पाहिजे'.

सुमतीने सुशीलेकडे रोखून पाहिले. धनसुखलाल म्हणाले, 'तू या भानगडीत पडू नकोस. आपल्याकडे सुधारक भरपूर आहेत. ते धेडांच्याबरोबर खातील-पितील, आणि त्यांना सुधारतील. आपण असं भ्रष्ट व्हायचं कारण नाही.'

सुशीलेने टाकलेला सुस्कारा कोणालाही समजला नाही. धेडाला शिवल्याने धर्म भ्रष्ट होतो, असे मानणाऱ्या आपल्या वडिलांचा नातू एखाद्या धेडाच्याच घरात वाढत असला तर ?

स्वतःच्या घराजवळून जाणाऱ्या प्रत्येक अस्पृश्य स्त्रीशी सुशीला गप्पा मारीत असे. परंतु आपण धेड आहोत असे त्यातल्या एकाही स्त्रीने तिला कधी सांगितले नाही. एके दिवशी काही कामकरी बायका तिच्या घरापुढे लाकडे टाकायला आल्या होत्या. अशा बायका बहुतेक घरात जाऊन लाकडे टाकतात. परंतु या बायका मात्र लाकडे घराच्या अंगणातच टाकत होत्या. सुशीलेने त्यांना विचारले, 'इथे का टाकताय ? घरात टाका ना !'

'आम्ही घरात कशा येणार ?'

'का बरं ?'

'आम्ही धेड आहोत!'

'धेड' हा शब्द ऐकताच सुशीला दचकली. आतापर्यंत कोळी, भाई अशाच कामकरी बायका येत असत. मग आजच या धेड बायका कशा आल्या? तिच्या त्या प्रश्नाला उत्तर मिळाले, दुकानदारांचे आणि त्या कामकरी बायांचे भांडण झाले होते, म्हणून त्याने आज ह्या अस्पृश्य बायांना कामावर बोलावले होते.

'तुम्हाला किती मजुरी मिळेल?' तिने गप्पा मारायला सुरुवात केली.

'एवढी मोळी वाहून आणली की अर्धा आणा दुकानदार देतो.'

'तेवढ्यानं काय होणार?'

'मग जास्त खेपा करायच्या. घरात माग चालतो. आणि नवरा थोडंफार कमावतो.'

'तेवढं पुरतं का?'

'हो माई. पुरलं नाही तरी दुसरं काय करणार. गरिबाच्या मुलांना कुठे उन्हा-पावसाचा त्रास होतो?'

'तुला मुलं आहेत का?'

'देवानं एक मुलगा दिलाय ना.'

'मोठा असेल तो' त्या कामगार बाईच्या वयाचा अंदाज करीत सुशीलेने विचारले.

'नाही वो माय. तीन-एक महिन्यांचा असेल.'

'मग एवढ्या लवकर तू कामाला आलीस?'

'मुलगा तसा माझाच आहे. पण तो माझ्या मुलीचा मुलगा आहे. आणि आमचं काय? दोन-चार दिवस झालं की आम्हाला कामाला लागायलाच हवं.'

'तुझ्या मुलीजवळ नाही राहात तो?'

'मला मुलगी नाही.' डोळ्यांत पाणी आणून ती अस्पृश्य स्त्री म्हणाली. 'मुलगी असती तर मुलगा माझ्या घरी कसा आला असता?'

'तुझा मुलगा मला दाखवशील का?' भीतभीत सुशीलेने विचारले.

'आमच्या मुलांच्यात पाहाण्यासारखं काय असतं माई? ती देखणी थोडीच असतात?'

'तुझा किसन तर कधी नजरेलासुद्धा पडत नाही.' दुसरी एक बाई म्हणाली. 'कधी बाहेरही काढत नाहीस त्याला.'

'असं नाही ग बाई. या माईसारख्या पुण्यशीलेची नजर त्याच्यावर पडेल तर मुलाचं आयुष्यच बदलून जाईल.'

'मग आज त्याला नक्की घेऊन ये हं.'

'मी भगतला सांगून पाहाते. त्याचा फार लाडका आहे तो.'

'भगत कोण ?'

'माझा घरवाला. त्याला दुसरं काही व्यसन नाही. मजुरी करावी, भगवंताचं भजन करावं आणि आताशी त्या किसनला खेळवावं, देवाचं नाव तोंडात यावं म्हणून तर त्याचंही नाव किसनच ठेवलं त्यांनी.'

'तुझा नवरा भजन म्हणतो ?'

'होय माई. त्याचं भजन ऐकून-ऐकून तर कितीकांनी दारू पिणं, मांस खाणं सोडून दिलं. कितीतरी ठिकाणी धना भगतला बोलावतात.' त्या दुसऱ्या स्त्रीने भगतबद्दल माहिती पुरवली.

मग तर धना भगतला आज जरूर पाठवून दे. बरोबर त्या मुलाला पण पाठव. मी त्याच्यासाठी एक झबलं देईन.'

सुशीलेची आणि धना भगत व किसनची ओळख ही अशी झाली.किसनला पाहाण्या-पूर्वीच तिने मनाशी पक्के ठरवले होते,की हाच आपला मुलगा. त्याला प्रत्यक्ष पाहिल्या-नंतर तर त्याला आपला मुलगा मानायचा जास्तच मोह सुशीलेला झाला.

भजन ऐकण्याच्या निमित्ताने सुशीला अस्पृश्य भगतला वारंवार बोलावीत असे. त्यात धनसुखलालना फारसे वावगे वाटत नव्हते. ओसरीच्या खाली बसून भगत भजने म्हणत असे. ओसरीवर नाहीतर वरच्या सज्जात बसून धनसुखलालसुद्धा भजने ऐकत असत. हळूहळू धना भगतला ओसरीवर येऊन बसण्याचा मान मिळू लागला.

सुशीलेने आता ऐहिक जगातील आपले मन काढून घेतले. तिने इंद्रिय निग्रहावर जोर द्यायला सुरुवात केली. या प्रसंगानंतर चार-पाच वर्षातच सुमतीचे निधन झाले.

'सुशीला, तू आहेस म्हणून मला मरतानासुद्धा काळजी वाटत नाही.'

'तू बरी होणार नाही, असं कोणी सांगितलं तुला ?असं काहीही मनात आणायचं नाही हं.' सुशीलेने आईला दटावले.

'मला माहीत आहे ना ! बरं, ते जाऊ दे. पण मी तुला सांगून ठेवते, आज नाही, पण अजून चार वर्षांनंतरही मी नसले तरी तू पुष्पाला सांभाळ. त्या दिवशी ती काय म्हणाली होती ते आठवतंय तुला ? त्या दिवसापासून ती तुझ्याच मांडीवर बसते.

पुष्पाचा सांभाळ सुशीलाच करीत होती. तिलाही आईपेक्षा आपल्या ताईचाच जास्त लळा लागला होता. तरीसुद्धा मरताना सुमतीने पुष्पाला सुशीलेच्या हाती सोपवली. सुमती गेली तेव्हापासून सुशीलेने कडक वैराग्य धारण केले. इंद्रिय व मन यांचा निग्रह आणि आत्मसंयमन हाच तिने आपला जीवनक्रम ठरवून टाकला. ती

तपस्विनी बनली. परंतु दोघा व्यक्तींना पाहिले की तिचे मन प्रेमाने भरून येई. त्यातली एक होती पुष्पा आणि दुसरा किसन.

दोन वर्षांपूर्वीच जनार्दन नावाच्या एका सच्छील पुरुषाने शहरात आश्रम स्थापल्याचे सुशीलेने वर्तमानपत्रात वाचले होते. लोकांकडून ऐकले होते. तेव्हापासूनच तिन ठरवून टाकले की बाकी काही नाही तरी या आश्रमाशी संबंध ठेवायला पुष्पाला मनाई करायची नाही. तिला स्वत:लाही अनेकदा जनार्दनला पाहाण्याची इच्छा होत असे. परंतु तिला पुरुषवर्गाबद्दल भयंकर तिरस्कार वाटू लागला होता. त्यामुळे ती आपली इच्छा मोठ्या प्रयत्नाने दाबून टाकीत असे. परंतु जनार्दन जखमी होऊन तिच्या घरात आला, तेव्हा त्याला पाह्यचेही नाही हा तिचा निश्चय पार डळमळला. तिने बेशुद्धावस्थेत खाटेवर पडलेल्या जनार्दनला पाहिले. तोच हा तिचा शिक्षक-विद्यार्थी. त्याचे नावही जनार्दनच होते, हे सुशीला कशी विसरू शकली असती ?

सुशीलेचे पाय तिथून निघेनात. आणि निघणार तरी कसे ? गेली पंधरा वर्षे ज्याने तिची झोप आणि ध्यान उडवून दिले होते तोच तो चेहरा आज पुन्हा दिसला होता. ओळख पटली होती. मग पायांवर ब्रह्मांडाचे ओझे पडल्यासारखे वाटणार नाही, तर काय होईल ?

## 28. जखमीचा मेळावा

**गिरीकंदरी आवाज घुमे**
**लांडोर ओरडते;**
**मम हृदयी उगवे अंकुर**
**जीवन हदोळते ।।**

**—न्हानालाल**

जनार्दनने डोळे उघडले. आणि एखाद्या योग्याने ध्यानावस्थेत आपला भूतकाळ पाहावा, असे त्याला वाटले. जागा ओळखीची होती. पण ती जवळ बसलेली प्रौढा ?

काम-क्रोध-लोभाला चिरडुन टाकी !

धना भगतच्या भजनाचा चरण त्याच्या कानात अजून घुमत होता. देहातून मुक्त झालेला जीवात्मा जमिनीवर पडलेल्या आपल्या प्रेताकडे तटस्थपणे पाहात होता. एके काळी हा देह आपलाच होता, एवढीच जाणीव त्याला होती. देहाच्या कार्याशी आता त्याचा काहीही संबंध राहिला नव्हता. आता या देहाला कोणी मारले, जाळले तरी त्याची त्याला पर्वा नव्हती.

त्याने कोणते पाप केले होते ? आपल्या कार्याला तो कधी पाप मानणे शक्यच नव्हते. स्त्री आणि पुरुष यांच्यामध्ये ईश्वरानेच आकर्षण निर्माण केले आहे. या आकर्षणाचा आविष्कार झाला तर त्यात पाप कुठे आले ? समाजाने त्यांच्या आड का यावे ? असा एकतर्फी कायदा त्याने का करावा ? सगळ्यांनीच हा कायदा पाळावा असा आग्रह तरी समाजाने का धरावा ?

त्याने समाजाच्या कायद्यांचा भंग केला होता हे निर्विवाद. पण त्याला वाटले होते तेवढा समाज दुर्बल नव्हता. समाजाविरुद्ध बंड करून उठले की समाज घाबरून मागे हटेल असे त्याला वाटले होते. ती त्याची मोठी चूक ठरली होती. सुशीलेबरोबर

लग्न करायची परवानगी मिळाली नाहीतर सुशीलेला उघडपणे घेऊन जाण्याची त्याची इच्छाही प्रत्यक्षात उतरू शकली नाही. सुशीलेला उघडपणे घर सोडता येणे शक्यच नव्हते. म्हणून त्याने सुशीलेला गुपचूप पळवून नेण्याचा विचार केला होता. परंतु लवकरच त्याच्या लक्षात आले की, हा आपला निश्चय म्हणजे निव्वळ बढाई आहे. तो सुशीलेला गुपचूपही घेऊन जाऊ शकत नव्हता. घर, समाज आणि सत्ता यांचे अखंड उघडे असलेले डोळे चहूबाजूंनी त्याच्यावर सतत नजर ठेवून होते. तो पहारा चुकवण्याचे काहीही साधन त्याच्याजवळ नव्हते. उलट आपला प्रयत्न निष्फळ झाला तर आपला नाश होईल हे त्याला समजून चुकले होते. स्वतःचे नुकसान झाले असते तर त्याला त्याची पर्वा नव्हती. परंतु समाजाने सुशीलेचा नाश करायची सर्व तयारी केली होती, हे त्याला स्पष्ट दिसत होते. सुशीलेचा नाश झालेला तो पाहू शकला नसता. आणि सुशीलेचा नाश अपरिहार्य आहे हे त्याला पटत नव्हते. सुशीलेचा नाश टाळण्याचा एकही उपाय आपल्याजवळ नाही याची खात्री त्याला वाटली होती. म्हणूनच त्याला भयंकर पश्चात्ताप झाला होता.

समाजाची ताकद लक्षात न घेता, आपल्या कृतीचा परिणाम किती भयंकर होईल याचा अंदाज न घेता, त्या परिणामांपासून आपल्या प्रियेचे रक्षण करण्याचे उपाय स्वतःजवळ नसताना त्याने जे केले होते ते पाप नसले तरी ती एक भयानक चूक नक्कीच होती. अशी चूक करण्याचा अधिकार त्याला होता का? चूक आणि पाप यांच्या परिणामात फरक होता का? अशी चूक करणे म्हणजेच पाप नव्हे का? पाप आणि चूक यात कितीसा फरक आहे? संकुचित दृष्टीला जे पाप वाटते ती उदार दृष्टीला चूक वाटते!

पश्चात्तापाने तो पोळत होता. समाजाला जाळून टाकण्याच्या कितीतरी योजना त्याने आखल्या होत्या. व्यवहारात ज्या अशा योजना होत्या त्यांचाही फायदा त्याने घेतला होता. समाजाशी त्याने भयानक युद्ध आरंभले होते. परंतु त्यात त्याला एवढेच जाणवले की तो स्वतःच जगाच्या त्रासात भर घालीत आहे. माणूस माणसाशी, माणूस समाजाशी,समाजातला एक वर्ग दुसऱ्या वर्गाशी कोणत्या ना कोणत्या तरी कारणांवरून प्रत्यक्ष-अप्रत्यक्षरीत्या, कुटिल युद्धात गुंतून पडण्याची परंपरा निर्माण झाली आहे. युद्धात गुंतून पडलेल्या त्या समाजाबद्दल त्याला सहानुभूती वाटत होती. त्या सहानुभूती-तून निर्माण झालेल्या आत्मभोगाच्या वरच्या पायरीवर चढून जाऊन त्याने पाहिले तेव्हा त्याला युद्धाऐवजी अहिंसा, वैराऐवजी प्रेम, स्वार्थाऐवजी परमार्थ, हेच समाज-सुधारणेचे उत्तम मार्ग असल्याचे समजून चुकले होते. आपण जे सनातन व्रत अंगीकारले

होते ते सर्वच समाज-सुधारकांनी अंगीकारणे आवश्यक आहे अशी त्याची खात्री पटली होती. हे व्रत घेऊन देशसेवेचा महायज्ञ सुरू केलेल्या गुजरातच्या एका महातपस्व्याची प्रखर तपस्या त्याने लावून पाहिली. त्याच्या मार्गानेच जनार्दनच्या व्यथित हृदयाला शांतता मिळाली. त्याच्या प्रायश्चित्ताचे फळ त्याला मिळाले. ज्या ठिकाणी त्याचा आणि समाजाचा पहिला खटका उडाला त्याच ठिकाणी सुधारणेचा छोटासा परंतु प्रामाणिक प्रयत्न करायचे त्याने ठरवले. हा प्रयत्न सुरू केल्यावर त्याने एवढी प्रगती केली होती, की त्याच्या शुद्ध झालेल्या नजरेसमोर जेव्हा सुशीला आली तेव्हा त्याच्या मनात मुळीसुद्धा विकार आला नाही.

दोघांपैकी कोणीच काही बोलले नाही. बोलण्यासारखे खूप होते, पण बोलवत नव्हते. आजूबाजूला माणसे फिरत होती. म्हणून आपण बोलू शकत नाही असे दोघां-नाही वाटले. पण खरे दोघांनाही बोलायची इच्छा असून एकही शब्द बोलता आला नाही. परस्परांच्या झाल्यागेल्याबद्दल स्वतःच स्वतःला दोष देऊन त्यांनी परस्परांची क्षमा मागितली होती. एके ठिकाणी राहाण्याची इच्छा मनाशी बाळगूनही समाजाने त्यांना कायमचे अलग केले होते. आणि ही चूक एकदा केलेले स्त्री-पुरुष अग्निज्वालेसारख्या प्रखर तपश्चर्येनंतर जेव्हा एकत्र आले तेव्हा त्यांना एकमेकांशी बोलण्यासारखे काही शिल्लकच उरले नव्हते.

थोडा वेळ दोघांनीही एकमेकांकडे रोखून पाहिले. जुन्या धडधडीचा आवाज पुन्हा थोडा वेळ ऐकला, आणि मग संयमपूर्ण शांतता पुन्हा एकवार पसरली.

'तुम्हाला कितीसं लागलं आहे?' नृसिंहलालचा आवाज ऐकू आला. स्वतःचा मुलगा पोलिसांच्या मारामुळे बेशुद्ध झाल्याची बातमी ऐकून तो धावतच तिथे येऊन पोचला होता. त्याने जनार्दनची खुशाली विचारली.

'फारसं नाही.' जनार्दन उठून बसायचा प्रयत्न करीत म्हणाला.

'इतक्यात उठू नका.' सुशीलेने त्याला बजावले. ऋषींच्या तपोवनात कोकिळेची कुहूकुहू निनादली. ही कोकिळा मनाला शरीराकडे फरफटवीत नेत नव्हती. आपल्या कूजनाने साऱ्या अवकाशाला एक बनवून टाकणारी ही कोकिळा हृदयाला चिदाकाशाच्या मुक्त वातावरणात उडायची प्रेरणा देत होती.

जनार्दन पडून राहिला. नृसिंहलालने विचारले, 'एवढं लागलं तरी कमीच झालं का? पट्टी तर पगडीसारखी बांधली आहे.

'तीच तर आमची पगडी! पण तुम्ही कंदर्पला भेटलात का? त्याचं कसं आहे?'

'तो आणि अरुण दोघंही खाटेवर पडून आहेत. समजत नाही त्याला काय करायचं?

त्यांचे भोग म्हणायचे!'

'आज तुम्ही दिसला नाहीत कुठे?'

'मी आपला रजेवर गेलो होतो.' नृसिंहलालने सांगून टाकले. समोर आपला मुलगा पाहिला तर लाठीमाराचा हुकूम आपण देऊ शकू की नाही याची खात्री नसल्यामुळे त्या पोलीस अधिकाऱ्याला काहीतरी निमित्ताने रजा घेणेच योग्य वाटले होते. एकीकडे त्याला डेप्युटी पोलीस सुपरिटेंडेंटची जागा कायमची मिळण्याचा मोह होता. परंतु त्याचबरोबर मुलाचे डोके फोडण्याची आज्ञा देण्याचे कठोर कर्तव्यही करायचे होते. त्याचा मोह नाहीमा झाला.

'वा, तुम्ही आला असता तर आमची अहिंमा तुम्हाला समजली असती!'

अहिंसेने काही मिळवता येते हे मानायलाच मुळी नृसिंहलाल तयार नव्हता. तो म्हणाला, 'तूर्त हे सर्व राहू द्या. तुम्ही सगळे आता ईश्वराचे भजन करा. म्हणजे तुमचा उद्धार होईल. आणि हे तरुण थोडंफार शिकून-सवरून काही काम धंद्याला लागतील.'

'मी जे करतोय ते ईश्वर-भजनच आहे.'

तेवढ्यात धनसुखलाल तिथे येऊन पोचले. नृसिंहलालला पाहाताच ते गुरकावून म्हणाले, 'काय नृसिंहलालजी, तुमचे पोलीस कोण, आहेत कोण? असं मारलं तर मरतील की!'

'मग काय करायचं? दादा-बाबा केलं तर हे लोक ऐकणार आहेत का?'

'ऐकत नाहीत म्हणून मारायचं?'

'मग साहेब, तुम्हीच सांगा आता आम्ही काय करावं ते? लाठीनं काम नाही झालं तर गोळीबार करावा लागेल!'

'सरकारची अक्कल कुठं गेलीय कोणास ठाऊक? लोकांना तुम्हाला विरोध करावा लागावा असं तुम्ही तरी का वागता?'

'तो विषय आमचा नाही. आम्ही शिपाई लोक. हुकूम झाला की तो अमलात आणायचा, एवढंच आम्हाला ठाऊक!'

'पण आम्ही पोलिसांना दोष देतच नाही' मध्येच जनार्दन म्हणाला.

'बस्स झाली तुमची अक्कल. चूक मुळात तुमची आहे. कशाकरता ह्या असल्या मिरवणुकी काढता? दुसरं काही करायचं नाही, अन् उगीच मार खायचा. सोडून द्या हा धंदा आता.' जनार्दनला दटावीत धनसुखलाल म्हणाले.

'आणि सोडला नाहीत तर तुरुंगात जावं लागल' नृसिंहलालने बजावले.

'तुरुंगाची भीती साफ खोटी आहे.' मागच्या बाजूला उभा राहून कवी विमोचन

ह्या वाद ऐकत होता. त्याने नृसिंहलालच्या धमकीला मोठ्या गर्वाने उत्तर दिले.

सगळ्यांची नजर कवीकडे वळली. आपण बोलू किंवा लिहू तो प्रत्येक शब्द जगाने जपून ठेवला पाहिजे असे विमोचनला वाटत होते.

'कालपर्यंत तर तुम्ही त्यांची टिंगल करीत होता. आज कसे काय फितलात त्यांना?' नृसिंहलालने विचारले.

'सत्याग्रहाचा तो अपूर्व प्रयोग पाहिल्यावर कोणत्या सहृदय माणसाचे हृदय प्रभावित झाले नसते? माझे हृदय-परिवर्तन आज सकाळीच झाले.' साहित्यिक विमोचनने सांगून टाकले.

'हे कोण आहेत?' एवढं लांबलचक कशाला बोलतात हे?' धनसुखलालने विचारले.

'हे कवी विमोचन आज सकाळपासून सगळ्यांची शुश्रूषा करीत आहेत.' कोणीतरी माहिती दिली.

'आज मी दवंडी पिटून सत्तेला ओरडून सांगतो की आजपासून दर आठवड्याला ध्वजवंदन होईल.' विमोचनने बोलता-बोलता नजर मागे वळवली. रंजन दरवाजात उभी राहून हे सगळे ऐकत होती. सांगितलेलेच सांगितले तर तो कवी कसला? ह्या तत्त्वाचे विमोचन पुरेपूर अनुकरण करीत होता.

'दवंडी कसली?' धनसुखलालने विचारले.

रंजन नृसिंहलालजवळ येऊन म्हणाली,

'तुम्ही आता काही बोलू नका. इथून सगळं ऐकू येतं. आणि डॉक्टरांनी सांगितलं आहे की असली बोलणी ऐकून कंदर्पभाईच्या डोक्यात पुन्हा रक्त उसळून येत आहे.'

'बाप रे!' नृसिंहलाल घाबरून तिथून पळाला.

रंजनही जाऊन कंदर्पजवळ बसली. परंतु तिचे डोळे मात्र वारवार अरुणकडे वळत होते. बेशुद्ध पडलेले सैनिक आता हळूहळू शुद्धीवर येत होते. अनेकजण पहिल्यापासूनच शुद्धीवर होते. ज्यांना फारच थोडे लागले होते त्यांना घरी जायची परवानगीही मिळाली होती.धनसुखलाल आणि कृष्णकान्त यांच्या मोटारीचा त्यांना घरी पोचवण्यासाठी उपयोग केला जात होता. कित्येकजण धक्काबुक्कीत खाली पडले होते. त्यांनाही घाई-गर्दीत जखमी म्हणून इथे आणले होते. तेव्हा निम्म्यापेक्षा जास्त जखमी योद्धे आता घरी जाऊ शकत होते.

कंदर्पला घेऊन जायचा आग्रह नृसिंहलालने धरला, तर सुरभी अरुणला घरी घेऊन जायचे म्हणत होती. परंतु धनसुखलालनी एकाही जखमीला तिथून जाऊ दिले नाही. आणि त्यांना विरोध करण्याची ताकद कोणातच नव्हती.

'तुम्ही तुमच्या ऑर्डलीला जरा जास्त वेळ बसवून ठेवा. आमची शुश्रूषा योग्य वाटत नसेल तर तुम्हा पोलीस अंमलदारांना काय? तुम्हाला इथे यायला कितीसा वेळ लागणार? मोटार आण खी चार वेळा पळवा. या वेळी जेवढा मागील तेवढा भत्ता सरकार तुम्हाला देईल'

अरुणला घेऊन जायचा आग्रह करणाऱ्या सुरभीलाही धनसुखलालनी दटावले. 'सुरभी सूनबाईचा एवढा हट्ट कशासाठी?' त्यांनी विचारले. आजकालच्या स्त्रियांना 'सूनबाई' असे जाहीरपणे म्हटले की त्या गोंधळूनच जातात. या शब्दाच्या उच्चारानेच त्यांच्या नाजूक रसिकतेवर आघात होत असावा. वडीलधाऱ्यांचा हा कोडकौतुकाचा शब्द आता आस्ते-आस्ते नावडता बनत चालला आहे. धनसुखलालसारखे जुन्या संस्काराला चिकटून राहाणारे वडीलधारे लोकच त्या शब्दाबाबत आग्रह धरतात. माणसासारखीच शब्दांचीही आवडनिवड असतेच.

'तिच्या भावाला इथे कसलीही उणीव भासणार नाही.' त्यांनी आश्वासन दिले.

'पण माझा जीव नाही राह्यचा.' सुरभी म्हणाली.

'मग तूही इथेच राहा. आमच्याकडे तुमच्यासारखा साहेबी थाट मात्र मिळणार नाही हं.'

'ताई, माझ्याजवळ कोणी राह्यची जरूरी नाही. दोन-चार दिवसांत बरं वाटलं, की मीच चार दिवस तुझ्याकडे येऊन राहीन' अरुणने आश्वासन दिले.

'आणि वहिनी, मी आहे की इथे' रंजन म्हणाली.

सगळे रंजनकडे पाहू लागले. आंघोळ आणि देवसेवा यांचे सगळे बारीकसारीक तपशील पाळणाऱ्या या घरात ही मड्डम चोवीस तास कशी काय राहू शकणार?

'तुला जायचं असेल तर तू पण जा ना. दिवसातून एक-दोनदा येत जा. इथे तू कंटाळशील.' पुष्पाने म्हटले. फारशी न बोलणारी पुष्पा नम्रपणे बोलत होती.

'कंटाळणार कशाला? इतक्या सगळ्यांना पट्ट्या बांधायच्या, औषधं द्यायची, एवढं सगळं तुझ्याच्यानं व्हायचं नाही. मी ताई सांगतील तेवढ्या वेळा अंघोळ करीन आणि सोवळं नेशीन.' रंजनने उत्तर दिले.

सोवळे नेसलेल्या रंजनचे चित्र डोळ्यांसमोर येऊन धनसुखलाल खो खो हसले. 'हे मात्र चांगलं हं. राहू दे हिला इथेच. घडीभर स्वस्थ बसायची नाही. तिच्या गप्पा कधी संपायच्या नाहीत. पुष्पा आणि सुशीलेलाही जरा बरं वाटेल!'

रंजन घरात राहिली तर सुशीला आणि पुष्पा या दोघींनाही ते आवडलेच असते. परंतु आज मात्र पुष्पाने वडिलांच्या सूचनेला मुळीच पाठिंबा दिला नाही. तिने रंजनकडे

जरा डोळे वटारूनच पाहिले. रंजनही तिच्या स्वभावाप्रमाणे हसऱ्या चेहऱ्याने पुष्पाकडे पाहात राहिली. क्षण दोन क्षण दोघी एकमेकींकडे पाहात होत्या. दोघींना भीती वाटली, आपण मैत्रिणी वैरिणी तर होणार नाही ना ?

'मी पण इथेच राहाणार आहे. तुम्ही काही 'फित्र' करू नका.' जवळच उभा असलेला विमोचन म्हणाला. उर्दू व पारशी शब्दांचे उच्चारही अत्यंत शुद्ध असावेत अशी काळजी कवी लोक घेतात 'फिक्र' या शब्दाचा कोणी फिकीर असा उच्चार केला तर त्यांना संताप येतो.

'छे, छे, उगीच तुमचा अमूल्य वेळ इथे कशाला वाया घालवता ? जखमींची शुश्रूषा बायकांवर सोपवा. आणि तुम्ही तुमची साहित्यसेवा चालू ठेवा.' रंजन म्हणाली.

'आतापर्यंत साहित्यसेवा भरपूर केली. आता थोडीफार देशसेवाही करू द्या.' थोडेफार करून तेच खूप केले असे मानण्याची नम्रता साहित्याचे उपासक दाखवतात ही आनंदाची गोष्ट आहे. दर महिन्याला एक कविता, एक लेख, एक समाचारपत्र लिहिणाऱ्या साहित्यिकाला आपण समस्त गुजराती साहित्य जिवंत राखत आहोत असा अभिमान वाटू लागला तर वाटो बिचारा ! त्यातून कवी विमोचनने तर काही पुस्तकेही प्रसिद्ध केली होती. त्याने खूप साहित्यसेवा केली आहे, असे काही लोकांचेही मत होते. मग हे सगळे खोटे आहे, आपली साहित्यसेवा अगदीच अल्पगुणी आहे असे खोटेच मानायचे त्याला तरी काय कारण होते ? साहित्यिक खोटा विनय राखत नाहीत कधी.

रंजनला समजून चुकले की या साहित्यिकाला त्याच्या देशसेवेचे आपल्यासमोर प्रदर्शन करायचे आहे. देशसेवासुद्धा निरनिराळ्या हेतूंनी केली जाते. त्यामुळे सेवकांची संख्या सेव्यांपेक्षा नेहमीच जास्त असते. बरे झाले, एक करमणुकीचे साधन मिळाले, या दृष्टीने रंजनने विमोचनची उपस्थिती मान्य केली. पण आज तिलाही स्पष्ट दिसून आले, की तिची स्वतःची देशसेवाही तितकीशी प्रामाणिक नाही. तीही कोणा व्यक्तीकडे खेचली जात होती.

## 29. आकर्षण

**गाली झुके नाजुक अर्धोन्मीलित पापणी**
**पदरे झाकी उर पुनःपुन्हा**
**करवेलीने करी काठ सारखा**
**नसे तयाचा रसिक शास्त्रीय भाष्यकार**

**—न्हानालाल**

आकर्षण हा या जगातील सर्वव्यापी, सनातन नियम आहे. ईश्वराच्या शोधात असलेला तपस्वी असो की देशासाठी मरायला तत्पर असलेला वीर असो, त्या कोणालाही आकर्षणाच्या अस्तित्वामुळे शरमण्याचे काहीही कारण नाही. धर्म, देश, राजकारण यांच्याबाबतीत बदल होत असतात. परंतु बदल झाले तरी स्त्री-पुरुषांच्यातील परस्पर आकर्षण नेहमीच जिवंत राहिले आहे, आणि राहील. हे आकर्षण हाच मानवी जीवनाचा आधार आहे, तसेच तो मानवाच्या संस्कारांचाही आधार आहे. घर, कुटुंब, राष्ट्र किंवा जग यांचे 'आकर्षण' म्हणजे आदितत्त्व आहे. इतकेच काय तर ती जगाची कविता आहे. तत्त्वज्ञान आहे आणि धर्मही आहे. हे आकर्षण म्हणजे पशुत्व नाही. पशुतेलाही पवित्र बनवणारे, कोवळयातले कोवळे, अत्यंत उदात्त भावनांचे अनिवार्य, अलौकिक आणि गोंडस एकत्रीकरण म्हणजे स्त्री-पुरुषांचे परस्परांविषयीचे आकर्षण आहे. त्याला पशुता म्हणून पशूंची निंदा करायचे कारण मग काय? पशूंचे उदात्तीकरण हे आकर्षण करीत नाही, असे पशुशास्त्रज्ञांनी सांगितलेले नाही.

हे आकर्षण का, कसे आणि कशासाठी उत्पन्न होते याचे विवेचन कोणीही करू शकत नाही. अरुणलाही ते समजले नाही. पुष्पालाही नाही आणि रंजनलाही नाही. सगळयांची शुश्रूषा योग्य रीतीने होत होती. तरीसुद्धा रंजन आणि पुष्पा या दोघींनाही सारखे वाटत होते, की अरुणची सेवा शुश्रूषा बरोबर होत नाही. आपण स्वतः केली

नाही तर ती शुश्रूषाच नव्हे, असेही त्या दोघींना वाटत होते. हे असे का व्हावे ?

'ही पट्टी कोणी बांधली ?' पुष्पाने विचारले.

'रंजनगौरीने' अरुणने सांगितले

'मी तिला नको म्हटलं तरी तिनं ऐकलं नाही ना. फर्स्ट एड शिकलीय तरी अजून पट्टी काही बांधता येत नाही' असे म्हणत पुष्पाने ती पट्टी सोडून दुसरी बांधली.

रंजनने येऊन विचारले,

'पट्टी पुष्पानं बदलली ना ?'

'हो ना. पहिलीत काहीतरी चुकलं होतं म्हणून तिनं बदलली' अरुण म्हणाला.

'तिच्यासारखा तयार हात दुसऱ्या कुणाचाच नाही हे तिला माहीत आहे. पण ही आयोडिनची बाटली इथेच टाकून गेली. एखाद वेळी काही चूक झाली तर ?'

अरुण विचारात पडला. शुश्रूषेतल्या या चुका फक्त आपल्याच बाबतीत कशा राहातात ? इतरांच्या बाबतीत कसे काही चुकत का नाही ?

'पुष्पा, तू काय करतेस इथे ?' रंजनने विचारले.

'का ग ? औषधाचा दुसरा भाग देतेय.'

'तो तर मी मघाशीच दिला.'

'तू कशाला दिलास ? आता माझा गोंधळ होईल ना ?'

'त्यात कसला गोंधळ होणार ? तुझं काम तेवढंच कमी होईल.'

'कामाचं सोडून दे ग. व्यवस्था बिघडते ना.'

'सगळ्यांची एवढी काळजी करीत बसलीस तर मरून जाशील लवकर ?' हसत हसत रंजन म्हणाली.

पुष्पा त्यावर काहीच बोलली नाही. पण अरुणच्या शुश्रूषेबाबत रंजनने आणखी काही शहाणपणा केला नाही तर बरे होईल असे तिच्या चेहऱ्यावरून स्पष्ट दिसत होते. अरुणला जरा ओशाळल्यासारखे झाले. आपली इतकी काळजी या दोघी कशासाठी घेत आहेत ?

पट्टी बांधल्यामुळे अरुणचा चेहरा विद्रूप दिसत होता. झोपलेल्या अरुणच्या त्या विद्रूप चेहऱ्याकडे पाहात पुष्पाने रंजनला म्हटले, 'रंजन, खूप वेळ अशीच बसून आहेस तू. दमली असशील. जरा हात-पाय मोकळे करून ये. मी बसते इथे.'

'छे ग, दमायला काय झालं ?'

'तरीसुद्धा जरा फिरून ये. अजून खूप काम करायचंय. मग कंटाळशील.'

डोळे बारीक करीत रंजनने पुष्पाकडे पाहिले. हसून तिने मान हलवली. 'आलं

माझ्या लक्षात सारं काही ' असे जणू तिला पुष्पाला सुचवायचे होते.

अरुणने डोळे उघडले. दोघीही पऱ्या आपल्याजवळ उभ्या असल्याचे त्याला दिसून आले. आपल्याला या वाजवीपेक्षा जास्त महत्त्व देत आहेत असे अरुणला वाटत होते. तो त्यांना म्हणाला, 'तुम्ही कोणीही इथे बसायची जरूरी नाही. आता मी आपला आपणहून उठू शकतो. मग तुम्ही कशाला उगीच त्रास घेता ?'

'छे, छे. अजून तुम्हाला एकटं सोडून चालणार नाही.' जवळच पडलेली खुर्ची ओढून तिच्यावर आरामात बसत पुष्पा म्हणाली. तिथून हलण्याचा तिचा मुळीच विचार दिसला नाही.

'मग मी जरा जाऊन येते ' रंजन जागची उठत अरुणला म्हणाली. तिच्या हसऱ्या चेहऱ्यावर नेहमीच एक अनाकलनीय पण आकर्षक हसू खेळत असे. अरुण तिच्याकडे बराच वेळा चोरून पाहात असे. त्याने होकार दिला. रंजनची चाल इतकी डौलदार होती, की तिला चालताना पाहात-राहावे असे सगळ्यांनाच वाटे. तिथून जाणाऱ्या रंजनकडे अरुण पाहात आहे हे पुष्पाने पाहिले. तिचे डोळे ईर्ष्येने चमकू लागले.

'छटेल !' पुष्पा मनातल्या मनात पुटपुटली. आपल्या दोघींच्या मैत्रीत तिला बऱ्याच उणिवा दिसू लागल्या. रंजनचा स्वच्छंदी पोशाख, तिची लचकत चालण्याची सवय, तिचा हसतमुख चेहरा, तिचे चंचल डोळे, निरर्थक पण गोड बडबड, तिचे निःसंकोच वागणे, या सगळ्यांमुळे तिच्यात काहीसा वेगळा परंतु न समजण्याजोगा गोडवा आला होता. स्त्रिया जाणूनबुजून मोहक बनायचा प्रयत्न करू लागल्या, की आपल्या अनुदार मनाला ते पटत नाही. आपल्या सौंदर्याची, मोहकपणाची जाणीव ठेवून एखादी तरुणी वागू लागली तर समाज तिला नखरेल, छटेल समजतो. जणू-काही रूप म्हणजे जीवनाचा धर्मच, असा समाजाचा समज असावा. भांग वाकडा, नाजूक चाल, मानेवर येणारा अंबाडा, कपाळावर केसांची बट, यातून आपली रसिकता दाखवणाऱ्या तरुणीचे प्रागतिक मन आणि समाजाच्या बंधनात गुरफटून गेलेले तिच्या आईचे मन दोघांचा कायम संघर्ष किंवा कलह सुरू होतो. नावीन्यात (फॅशनमध्ये) काही फ़ायदा दिसत नसल्याने मोठ्या निश्चयाने जुन्या आचार-विचारांना चिकटून बसलेल्या सुशीलेच्या संस्कारात पुष्पा वाढली होती. तिला रंजनच्या या मोहक रूपा-मध्ये छेटलपणा दिसला तर ते स्वाभाविक होते. मात्र आतापर्यंत रंजनचा हा नखरेल-पणा तिला हसून घालवण्याजोगा वाटत असे. आज मात्र पुष्पाचे मन कलुषित झाले होते. आज मात्र तिला खरोखरच भय वाटले. रंजनपेक्षाही रंजनचा हा नखराच तिला जास्त भयंकर वाटला.

पुष्पाच्या मनावरचे संस्कार तिला अरुणजवळ फार वेळ बसू देईनात. तिला सारखी भीती वाटत होती, की आपण एका पुरुषाची एवढी सेवा करतो याचा आपले वडील आणि थोरली बहीण कोणता अर्थ लावतील ? जिथे पाच मिनिटे चालतील तिथे फार तर दहा मिनिटे घालवता येतील. पण पाच मिनिटांच्याऐवजी एक तास घालवायचा म्हणजे जगाच्या मनात संशय निर्माण करण्यासारखेच आहे. ती सगळ्यांच्या पट्ट्या बांधी. त्यांना औषधे पाजी. खोल्या स्वच्छ करी, त्यांना जेवायला घाली. परंतु त्या-खेरीज कोणाशी बोलावे, त्यांच्या घरची हकीकत त्यांना विचारावी, कोणाला हसवावे, रिझवावे, हे तिच्याच्याने होत नसे. तिची सेवावृत्ती प्रबळ होती. परंतु घरातल्या संस्कारामुळे इतरांना रिझवण्याची तिच्यातील कला कमी झाली होती. काहीशी गंभीर, ममजूतदार, जरूरीखेरीज शब्दही न बोलणारी, हसणे म्हणजे स्वच्छंदी वागणे, असे मानणारी पुष्पा, मगळ्यांच्या आदराला पात्र होत असे. परंतु रंजनला पाहिले, की जखमींना जसा उमाळा येई तसे काही पुष्पाला पाहून होत नसे.

रंजन मगळ्यांच्या बिछान्याजवळ जात असे. ती जशी कंदर्पजवळ जाऊन बसे तशीच इतर सामान्य जखमींजवळही बसत असे. मगळ्यांशीच तिची मैत्री असावी, अशा तऱ्हेने ती प्रत्येकाशी बोलत असे. कधी कोणाशी वाद घाली, कोणाला वर्तमान-पत्र वाचून दाखवे. कोणी आपल्या भविष्याबद्दल बोलू लागला, की ते काळजीपूर्वक ऐकत राही. तिला पाहिले की जखमींच्या वेदना निम्म्या कमी होत असत. रंजन कधी येईल याची ते वाटच पाहात असत.

बरेचदा धना भगत संध्याकाळी येऊन भजने म्हणत बसे. मुळीच हिंडताफिरता येत नाही असे त्या जखमींत कोणी नव्हते. धना भगतला घराच्या चौकात यायला परवानगी मिळाली होती. त्यामुळे ते सगळे जखमी त्या चौकात येऊन बसत. भजन ऐकत संगीताचा, भावनांचा आणि चातुर्याचा आनंद आपापल्या कुवतीनुसार घेत. आणखी आठ-दहा दिवसांत त्या सगळ्या जखमींना तिथून जायची परवानगी मिळणार होती.

एक दिवस संध्याकाळी धनसुखलाल ओसरीवर आले. तिथेच त्या जखमींच्यात बसलेल्या जनार्दनला उद्देशून ते म्हणाले,

'तुम्हा सगळ्यांवर फिर्याद होणार आहे, असं ऐकलं मी.'

'आमची शिक्षेसाठी तयारीच आहे' कंदर्प मध्येच म्हणाला.

'बोलायला ठीक आहे. पण तुरुंगाची जाळी पाहाणंही अवघड आहे.'

'काकासाहेब, मी तर जातं ओढायचीही सवय केलीय. आम्ही आत गेलो की जेलच्या जाळ्याच निखळून पडतील ' कंदर्प ताठपणे म्हणाला.

'जेलात जाऊन परत ये, अन मग बोल माझ्याशी.' धनसुखलाल थट्टेने म्हणाले. हल्लीचा गुजराती तरुण कैदेच्या भयाच्या पार पलीकडे गेला आहे, याची त्यांना खात्री पटली होती.

'उगीच कशाला बोलायचं ? मला धना भगतचे शब्द आठवतात, 'मरायचा मोह तरी कशासाठी धरायचा ?' तसंच जेलमध्ये जायचा मोह आणि हव्यास तरी कशासाठी बाळगायचा ? तेसुद्धा अहंपणा सोडूनच करायला हवं ' जनार्दन म्हणाला. सुशीला दुरूनच हे संभाषण ऐकत होती. तिने फक्त जनार्दनकडे पाहिले आणि नजर बाजूला वळवली. दोघांच्याही मनातील विषयवासना ओसरल्या होत्या, असे आता इतक्या दिवसांच्या सहवासानंतर त्यांना समजून चुकले होते.

'आज धना भगत कुठे दिसत नाही ?' धनसुखलालनी विचारले.

'काल किसनची तब्येत जरा बिघडली होती. आजही बरी नसेल, म्हणून आले नसावेत. ' अरुणने सांगितले.

अरुणला आता धना भगतबद्दल आदर वाटू लागला होता. मात्र त्याच्या धार्मिक भावनात बुद्धिनिष्ठता कमी आहे ही त्याची भावना मात्र अजून बदलली नव्हती. प्रत्येक गोष्टीत देवाची मदत मागायची, घडणाऱ्या प्रत्येक बऱ्यावाईट प्रसंगात देवाचा हात असल्याचे मानायचे, हे अरुणच्या मते दुर्बल मनाचे लक्षण होते. तरीसुद्धा त्याला भगतच्या भजनात गोडी वाटू लागली. विशेषतः वीरश्रीयुक्त आणि वीररसाला आवाहन करणारी गाणी त्याला फार आवडत.

'मग आज भजन नाही होणार तर ? गेले सहा-सात दिवस रंग कसा छान जमला होता !' भाविक मनाच्या धनसुखलालना संध्याकाळच्या भजनाच्या कार्यक्रमाची चांगलीच गोडी निर्माण झाली होती.

'कार्यक्रम बंद ठेवायचा नाही. कोणाला तरी गावंच लागेल. एवढ्या लोकांच्यात कोणी तयार नाही ?' अरुणने विचारले.

'ए कंदर्प, तू गातोस का नाही ? दिसतोस तर मोठा नखरेल.'

'नाही हो काकासाहेब, मी गायला लागलो तर परमेश्वर पण पळून जाईल.'

'गावं स्त्रियांनीच. पुष्पाताई किंवा रंजनताई नाही का गाणार ?' साहित्यिक

विमोचनला स्त्रियांच्याबद्दल भलतेच प्रेम होते. ते त्याने आता प्रगट केले. पुष्पा आणि रंजन खाली पाहू लागल्या. सुशीलेने रंजनच्या पाठीवर हलकीशी चापट मारीत म्हटले, ‘ए पोरी, तू गा की.’

‘नाही हो ताई, इथे नको. तुम्ही एकट्या असाल तेव्हा.’ रंजन लाजून हलक्या आवाजात म्हणाली.

‘हो, हो, रंजनच. चांगली गाते हं ती. पण ती शास्त्रोक्त गाते. ते आपल्याला काही समजत नाही’ धनसुखलाल म्हणाले.

‘चालेल ग रंजन. जरा साधं सोपं गा.’ सुशीलेने आग्रह केला.

‘नाही हो, ताई, लाज वाटते’ रंजन म्हणाली. तिचा चेहरा लाजेने लाल झाला होता.

‘चल, चल. लाडात नको येऊस! म्हणून टाक बघू. हजार माणसांसमोर थिएटरात गातेस तेव्हा नाही लाजत आणि आता इथे लाजतेस?’ सुशीलेने रंजनला दटावले. सगळ्यांनीच थोडा आग्रह केला. शेवटी धनसुखलालच जेव्हा ओरडले, तेव्हा रंजन गायला तयार झाली. सगळी चुपचाप बसली. सुंदर श्यामल मेघांमधून इंद्रधनुष्य प्रगटावे तसे रंजनच्या गळ्यातून सुरांचे सूर बाहेर येऊ लागले.

वेडे गोपी करिसी तू कोणाचे औक्षण ?
दारी उभा गे हृदयेश्वर नंद वर श्रीकृष्ण ।
हृदयी नवरस षट्रस देही
मस्तकी गोपीच्या भार वाही
गोरजसमयी मोहघट शिरी
कृष्णकन्हैया करी उद्धारण ।।

भान हरपले पद अडखळले
नेत्र खोल गेले
रात्र सारी रासक्रीडेचे
रसिक तो करतो जागरण ।।

जन्मोजन्मी तडपत राधा
युगायुगाची ती आठवण

ऐकुनी मुरली चमके मीही
ते तर भवसागर उद्धारण ।।

जीवनात माझ्या विष मी पचवी
शोधी माझा मी मोहन
राधामुखी रात्रंदिन
कृष्ण कृष्ण हे उच्चारण ।।

## 30. प्रेमाचा स्फोट

**तेजाचाच मांडव तेजाचीच फुले**
**तेजाचे मंदिर रसाळ मोठे**
**तेजाची वेली ही हालवी हिंदोळे**
**माझेही मन हिंदोळ्यावर डोले ।**

सुधारक रंजनच्या तोंडून राधाकृष्णाच्या प्रेमाची साधीसुधी विराणी ऐकून परम-वैष्णव धनसुखलाल एकदम खूष होऊन गेले. रंजनबद्दल त्यांचे मत चांगले बनले. आणि एकूणच सुधारलेल्या लोकांबद्दलची त्यांची नाराजी जरा कमी झाली.

'रंजन, तुझ्या कंठात अमृत भरलंय. त्यातून भगवंताचं नाव निघाल्यावर मग काय विचारायचं? व्वा! सुंदर' धनसुखलालनी तिला शाबासकी दिली.

रंजनच्या गाण्याने सगळेच मुग्ध झाले होते. अरुणला त्या गाण्यात अनुकंपा जाणवली. त्याला संगीत फारसे समजत नसे. परंतु चांगल्या आवाजाची कोणी व्यक्ती गायली तर सामान्य माणसालाही रिकामपणी ते कानाला चांगले लागते. अरुणची संगीता-बद्दलची हीच भावना होती. आजच्या संगीताने त्याला हेलावून सोडले. त्याच्या मनात आनंदाच्या लाटा उसळल्या.

स्त्रिया गातच राहिल्या तर? त्यासाठीच तर ईश्वराने त्यांना संगीताने भरलेला कंठ दिलेला नाही ना?

देवाचा विचार मनात येताच अरुण जरा अडखळला. त्याच्या मनात आले, 'मलाही या भगताचा गुण लागला की काय?'

धनसुखलालने आग्रह करकरून रंजनला आणखी गाणी गायला लावली. रंजनला शास्त्रीय संगीताची आवड होती खरी. तरीसुद्धा गरबा, गरबी (स्त्रियांचे गीत) आणि भजने गाण्यात तिला मुळीच कमीपणा वाटत नसे. शास्त्रीय संगीताच्या तालमीत

तयार झालेला तिचा आवाज साध्या गाण्यातूनसुद्धा असाधारण कंप आणि गोडवा निर्माण करी. रंजनच्या सुराच्या आंदोलनाने कोणाच्याही झोपेत गोड अडथळा येत नसे. असा मधुर अडथळा आला नाही तो पुष्पाच्या झोपेत. सबंध रात्र पुष्पा तळमळत होती. रात्री रंजनने तिला विचारले,

'पुष्पा, मध्यरात्री काय काढून बसलीस हे?'

'काही नाही. मला अजून झोप नाही आली!' कागद, रंग आणि ब्रश घेऊन पुष्पा एक चित्र काढत होती.

रंजनलासुद्धा झोप येईलसे वाटत नव्हते. तासभर वाट पाहून तिने पुन्हा विचारले,

'पुष्पा, अजून जागीच आहेस?'

'हो ना. डोळे मिटतच नाहीत.'

'एवढं कसलं चित्र काढतेस?' बिछान्यातून उठून पुष्पाजवळ येत रंजनने विचारले.

'तुला नाही दाखवणार.' पुष्पा हसतहसत म्हणाली आणि तिने कागदावर आपले दोन्ही हात ठेवले.

'चल, चल, मला बघू दे. तुझ्या चित्रांचं आता एक प्रदर्शन भरवायला हवं.'

'चांगलं नाही ग. कधीपासून प्रयत्न करतेय, पण चेहऱ्यावरचा तो भाव जमतच नाही.'

'वाहवा! डोळे खिळून राहतील इतकं सुंदर काढलंयस. राधाकृष्ण किती सुरेख काढलेस ग. ऑर्थाडॉक्स फॅशनचे– जुन्या पद्धतीचे नाहीत.'

'तुझ्या संगीताचं सौंदर्य काही या चित्रात उतरत नाही. तुझं सगळं गीत मला एका चित्रातून रेखाटायचं आहे. पण चित्र तुकड्या-तुकड्यांनी रेखल्याशिवाय ते भावच जमत नाहीत.'

'ते काही मला समजत नाही. मला फक्त एवढंच समजतं, की संगीत अल्पजीवी असतं आणि चित्र चिरंजीवी असतं.'

या दोन कलांतला फरक लक्षात आला तसे पुष्पाच्या चेहऱ्यावर स्मित झळकले. ती म्हणाली,

'तुझं गाणं विसरले असतील असं मला नाही वाटत.'

'पुष्पा, तू या पुरुषाचा चेहरा काढलास तो कोणाच्या चेहऱ्यावरून?'

पुष्पा जरा चमकली. मग कपाळावर आठ्या घालीत तिने म्हटले,

'माझं कोणी 'मॉडेल'च नाही. कल्पनेत येईल ते माझं मॉडेल.'

'सध्या तर तुझ्या मनात फक्त अरुणकान्तच आहेत. खरं की नाही?'

'चल हट. तुला थट्टा करण्याशिवाय दुसरा उद्योग कुठे आहे?'

'मी थट्टा नाही करीत. तुझ्या डोळ्यांतच मला तो नमुना दिसतोय. तू अरुणकान्तवर प्रेम करतेस.'

'नाही,' असे उत्तर असेल तरच अशा प्रश्नांचे सरळ उत्तर देता येते. सुधारक रंजन असे सहज बोलू शकली असती. परंतु पुष्पाचे संस्कार तिला स्नेह, प्रेम, अशा शब्दांचे उच्चारसुद्धा करू देत नव्हते. असे बोलणे असभ्यपणाचे आहे असे तिला वाटे. तिने उत्तर दिले,

'तू हे असं काही बोललीस, अन् ते ताईनं ऐकलं तर ती तुला अन् मला मारूनच टाकील. चल, झोप आता. मी पण दमलेय. जाऊन पडते आता'

दोघीजणी जाऊन गादीवर पडल्या. अनेकदा जागपणीच्या क्षणांपेक्षा स्वप्नावस्थेतील क्षण जास्त गोड असतात. जागृतावस्थेत क्वचित आपली एखादी इच्छा पुरी झाली तर ती अशी चमत्कारिकपणे होते की ती पुरी झाल्याचा आनंदही निघून गेलेला असतो. स्वप्नामध्ये भौतिक प्रकृतीची जडता कमी झालेली असते. म्हणूनच पंचतत्त्वं आपल्या इच्छेला अनुकूल बनलेली असतात. स्वप्नामध्य नेहमीच प्रकाश शीतल असतो. स्वप्नात माणूस आपल्या मर्जीप्रमाणे वाऱ्यावर उडत जातो. जड, अचल पर्वतही त्याला वाट करून देतात. अनुकूल स्वप्न पाहिले की योगसिद्धीवर श्रद्धा जडते.

पण खरे काय? जागृती की स्वप्न? आणि ही जागृतावस्थाही दुसऱ्या एखाद्या अवस्थेचे स्वप्नरूप असेल तर?

रंजन आणि पुष्पा यांना कोणती स्वप्ने पडली हे त्यांचे त्यांनाच माहीत. जागरण झाले असले तरी रंजन लवकरच उठली. तिने पाहिले तर पुष्पा अजून झोपली होती. पहाटेचा अंधुक प्रकाश जगाला प्रातःस्नान घालीत होता. त्या प्रकाशात रंजनने खिडकीतून डोके काढून बाहेर पाहिले. एक माणूस सायकलवर बसून घराच्या दाराशी येऊन पोचलेला तिला दिसला. ओसरीवर एक नोकर झोपला होता. त्याला उठवायचा पोलीस विचार करीत होता. तेवढ्यात रंजनच खाली उतरून आली. तिने दरवाजा उघडला आणि त्या माणसाला विचारले,

'काय काम होतं?'

'मी सूचना द्यायला आलो आहे. अरुण, जनार्दन आणि कंदर्प यांच्यावर पकड वॉरंट निघालं आहे.'

'तुम्हाला कोणी पाठवलं?'

'मॅजिस्ट्रेटसाहेबांनी. पोलीस येतीलच आता वॉरंट घेऊन. सूर्योदय झाल्यावर

ते बजावतील.'

'मॅजिस्ट्रेट स्वतःच हुकूम काढतात आणि स्वतःच आगाऊ सूचनाही देतात.'

'कोणाला सांगू नका बरं का. पण अरुण आणि मॅजिस्ट्रेट दोघंही मित्र आहेत. त्यांनी सूचना एवढ्याचसाठी दिली की सर्वांनी तयारीत राहावं.'

एवढे बोलून तो माणूस सायकलवर बसून परत गेला.

रंजन घाईघाईने घरात परतली. अरुण ज्या खोलीत झोपला होता त्या खोलीत ती गेली. अरुणच्याही चेहऱ्यावर अस्पष्ट स्मित रेंगाळले होते. त्यालासुद्धा एखादे आनंददायक स्वप्न तर नसेल ना पडत? त्याला उठवायचे कसे? हाक मारून? हलवून? दुसरे कोणी असते तर रंजनने त्याला नक्कीच हलवले असते. परंतु अरुणच्या चेहऱ्यावरचे स्मित पाहून त्याला उठवण्याचा एक नाजूक उपाय रंजनला सुचला.

रंजन त्याच्या खाटेजवळ गुडघे टेकून बसली. आणि तिने अरुणच्या मिटलेल्या ओठावर आपले ओठ टेकून त्याचे चुंबन घेतले. घाईघाईने तिने खोलीत चहूकडे नजर फिरवली. खोलीत दुसरे कोणीच दिसत नव्हते.

अरुणच्या चेहऱ्यावरचे हसू आणखीनच प्रफुल्लित झाले. त्याचा आनंद आणखी वाढला. आणि त्याने शांतपणे आपले डोळे उघडले. पण डोळे उघडताच मात्र तो चमकून उठून बसला. स्वप्नातले दृश्य जागृतावस्थेत समोर प्रत्यक्षातच उतरलेले पाहून त्याचे मन आनंदाश्चर्याने भरून आले. खाटेवर हात टेकून, जमिनीवर गुडघे टेकून बसलेली आपल्याकडे पाहणारी खोडकर रंजन खरी आहे का स्वप्नातली रंजन खरी?

त्याने आपल्या डोळ्यांवरून हात फिरवला. त्याला स्वप्न पडले होते तेही खरे. आणि आता तो जागा झाला होता हेही खरेच. स्वप्नात त्याने रंजनला पाहिले होते हे खरेच. आणि स्वप्नात त्याला रंजन जशी बसलेली दिसत होती तशीच प्रत्यक्षच बसलेली दिसली होती हेही खरेच! मग त्याचे चुंबन कोणी घेतले? स्वप्नातल्या रंजनने की जागेपणीच्या?

स्वप्न पुरे होता होता जाग आली. तेव्हा जो प्रसंग प्रथम पाहिला तोच प्रसंग पुन्हा आपल्याला स्वप्नात घेऊन गेला तर? असे अनेकदा झालेलेही आहे.

'का, दचकायला काय झालं?' रंजनने मुरका मारीत विचारले. रंजनचा मुरका अरुणचे काळीज कुरतडत गेला.

'उगीचच.'

'उठायच्या आधी तर हसू येत होतं. तुमचं स्वप्न भंगलं तर नाही ना ?'

रंजनने त्याचे स्वप्न भंग केले नव्हते. तिने त्याच्या स्वप्नाची जागृतावस्थेशी जोड घालून दिली होती. हे खरे की खोटे ? अरुणला काही समजेचना. अरुण रंजनवर प्रेम करीत होता, हे योग्य होते का ? आपल्याला रंजन आवडू लागली आहे, अशी शंका त्याला कित्येक दिवसांपासून येत होती. दिवसेंदिवस त्याची ही शंका दृढ होत गेली. रंजनने झेंडा रोवल्याचे कळल्यापासून त्याच्या नजरेसमोरून रंजन हलतच नव्हती. काल रात्री तिचे गाणे ऐकले, गाता गाता तिच्या चेहऱ्यावर उमटलेल्या सौंदर्यरेषा त्याने पाहिल्या. आणि त्याला रंजनचे वेड लागले होते. रात्रभर त्याला रंजनचीच स्वप्ने पडत होती. ही स्वच्छंदी मुलगी कोणावर तरी प्रेम करील का ? आणि समजा कोणावर करीत असली तरी अरुणसारख्या फकीरावर प्रेम करून ती काय करणार होती ?

'अजून भीती गेली नाही वाटतं ? मी तर आणखी घाबरवून टाकणारी बातमी घेऊन आले आहे.'

अरुण विचारात पडला. त्याने काहीच उत्तर दिले नाही. तेव्हा रंजनने त्याला पुन्हा विचारले.

'कसली बातमी आणली असेल हिनं ? याच्यापेक्षा जास्त धक्का बसणारी कोणती बातमी असेल ?'

अरुणने उत्तर दिले,

'धक्का नाही बसला कसला. पण . . . तुम्ही कसली बातमी आणलीय ?'

'तुमच्यावर वॉरंट निघालंय', रंजनने सांगितले.

'ओहो, एवढंच ना ? मी त्याचीच वाट पाहात बसलो होतो ' अरुणला त्या बातमीचे फारसे महत्त्व वाटले नाही.

'मग मी ही बातमी जनार्दन आणि कंदर्पला द्यायला जाते. सूर्योदय होताच वॉरंट बजावलं जाईल. आता सूर्योदय व्हायचीच वेळ झालीय.' रंजन उठून उभी राहिली.

परंतु रंजनने आपल्या जवळून जावे हे अरुणला आवडले नाही. पकडवॉरंटची बातमी ऐकूनही त्याचे मन धास्तावले नाही. परंतु ती बातमी कळण्यापूर्वीचा हृदयाचा गोंधळ त्याला अजूनही बेचैन करीत होता. रंजनने एक-दोन पावले टाकली असतील, तेवढ्यात अरुणने विचारले,

'मला तुम्ही उठवलंत ना ?'

'हो. का बरं ?'

'मी जागा होतो का तेव्हा ?'

रंजनच्या चेहऱ्यावर लालीमा चढला. झोपलेल्या माणसाला उठवायचे अनेक उपाय आहेत. त्यापैकी कोणत्या उपायांनी अरुणला आपण उठवले ते जाणून घ्यायची त्याला काय जरूर होती ? की जागे असूनही झोपून राहिलेल्या अरुणने रंजनला चुंबन घेताना पकडले होते ?

'मला काय माहीत ? मला वाटलं तुम्ही झोपेतच हसत आहात !'

'पण मग तुम्ही उठवलंत कसं मला ?'

रंजनला आता मात्र खात्री पटली, की आपण अरुणचे चुंबन घेतले हे त्याला माहीत होते. ती क्षणभर लाजली. डोक्यावरचा पदर खाली पडला होता तो तिने पुन्हा वर ओढून घेतला– जरा पुढेच ओढला आणि एका हातातली बांगडी उगीचच दुसऱ्या हाताने फिरवली.

लगेच तिने आपल्या मनातली खळबळ शांत केली. आणि आपली स्वाभाविक उच्छृंखलता धारण करून तिने उत्तर दिले,

'तुम्ही चक्क खोटं बोलताहात, खरं ना ? माहीत असूनही विचारताय. बघाच तर मग. मी तुम्हाला हे असं उठवलं.'

असे म्हणून तिने लांब उभे राहूनच आपले बोट ओठावर टेकवले आणि 'चुक' असा आवाज केला. मग झटकन तिने पदराने आपल्या चेहऱ्याचा अर्धा भाग झाकून घेतला आणि धावतच ती तिथून बाहेर पडली.

# 31. पुष्पाची निराशा

**रस्ता माझा अजुनि नाही संपला**
**सूर्यदेवा तापू नको, तापू नको.**
**ज्याला शोधिते तो दूर चालला**
**सूर्यदेवा तापू नको, तापू नको.**

**—मेघाणी**

पुष्पा दारातच उभी होती. रंजनने लांबूनच करून दाखवलेल्या चुंबनाचा अभिनय तिने पाहिला होता. रंजनने चेहरा एका बाजूने झाकून घेतलेला तिने पाहिला, तशीच तिच्या नजरेतील व्याकुळताही तिला दिसली. रंजनची पावले पुढे पडत होती. पण तिची नजर मात्र समोर पाहात नव्हती. तिची नजर जमिनीला खिळली होती. या खोलीतून आता लवकरात लवकर निघून जावे असे रंजनला वाटत होते. दरवाजात येईपर्यंत तिने पुष्पाला पाहिलेच नव्हते. कितीही निर्लज्जपणा केला तरी स्त्री शेवटी लाजतेच !

'कोण पुष्पा ? तू इथे कुठे ?' दरवाजाच्या मध्येच उभ्या असलेल्या पुष्पाला पाहून रंजनने विचारले. रंजनचे गाल लाललाल झाले होते. पुष्पा त्या गालांकडे पाहातच राहिली. आपली दहाही बोटांची नखे रंजनच्या गालात खुपसावी, तिच्या गालातील नसांतून वाहणारे रक्त बाहेर काढावे अशी प्रबळ इच्छा पुष्पाला झाली. तिच्या डोळ्यां-तून अंगार वर्षत होता.

पुष्पा दारातून बाजूला सरकली. रंजनला समजले. तिच्या खांद्यावर हात ठेवीत रंजन म्हणाली,

'मला वाटलं तू अजून झोपलीच आहेस.' दाराच्या उंबरठ्यावरून खाली उतरत पुष्पाने रंजनचा हात खांद्यावरून काढून टाकला. पुष्पाच्या हातात एक मोठा कागद होता. तो कागद दोन्ही हातात धरून पुष्पाने तो टरकावला. कागद जाड होता. तो

सहजासहजी फाटत नव्हता. पण आज पुष्पाचे हात प्रत्येकालाच फाडायला उतावीळ झाले होते.

'ए वेडे, अग एवढं चांगलं चित्र फाडून कशाला टाकतेस ?' पुष्पाचा हात पकडत रंजन म्हणाली. परंतु त्या आधीच त्या चित्राचे दोन तुकडे झाले होते. त्या चित्राचे आणखी तुकडे करायला पुष्पाचे हात शिवशिवत होते. परंतु रंजनने तिच्या हातातला कागद हिसकावून घेतला.

'अख्खी रात्र जागून एवढं सुंदर चित्र काढलंस ते काय असं फाडून टाकायला ?' रंजन पुष्पाला रागावू लागली.

'माझं चित्र केव्हाच फाटून गेलं आहे.' पुष्पा उत्तरली.

'कोणी फाडलं तुझं चित्र ?'

'रंजनन फाडलं. तू.'

'मी ? काय बोलतेस काय तू ? मी तुझ्या चित्राला हातही लावला नाही.'

'आताच, दोनच क्षणांपूर्वी याच खोलीत तू माझ्या सगळ्या जीवनाचंच चित्र फाडून टाकलंयस.'

रंजनच्या आता कुठे लक्षात आले. तिचा खेळकर चेहरा गंभीर बनला. तिने पुष्पा-कडे एकवार रोखून पाहिले. आणि ती बोलली, 'इतके दिवस मी तुला विचारत होते. काल तर मी उघड उघड तुला विचारलं. पण तू काहीच सांगितलं नाहीस. मग मी तरी काय करणार ?'

तेवढ्यात बाहेर झोपलेला नोकर दरवाजा उघडून आत आला, आणि घाबऱ्या-घाबऱ्या म्हणाला,

'शिपाई आलेत. साहेबांना भेटायचं म्हणतात.'

'जा आत. आत भाई पूजा करीत असतील. त्यांना वर जाऊन सांग.' पुष्पा म्हणाली. रंजनबरोबरचा खटका ती विसरून गेली. तिला आता दुसरीच भीती वाटू लागली.

'आता अरुणला पकडून कैदेत टाकतील.'

आपल्या प्रेमसमाधीत आणि नंतरच्या प्रेमकलहात जनार्दन आणि कंदर्प यांना ही बातमी द्यायचे रंजन विसरून गेली होती. ती धावतच शेजारच्या खोलीत गेली.

पुष्पा एकटीच उभी होती. बाहेर बरीच माणसे जमल्याची चाहूल अरुणला लागली. बिछान्यावरून उठून तो खोलीबाहेर आला. पुष्पा विचारात गढून गेलेली होती.

मीच रंजनच्या आधी उठले असते तर ? खरं म्हणजे, ती जागीच होती. आपणच

तिच्या अगोदर खाली यायला हवे होते. रंजनसारखे निर्लज्ज होता आले असते का ? मी कसे म्हणू शकले असते की अरुणवर माझे प्रेम आहे म्हणून ? रंजनलाही मी सांगू शकले नाही, मग अरुणला कसे सांगणार होते ? मी रंजनसारखीच निर्लज्ज असते तर किती बरे झाले असते ?

'पुष्पावती, काय भानगड आहे ?' अरुणने विचारले.

'काही नाही. मी... मी... अशीच आपली उभी आहे इथं.'

'बाहेर पोलिसांची माणसं आलेली दिसतात.'

'हो. हो ना. मी तेच सांगायला आले होते.'

तेवढयात खडावा वाजवीत मोठमोठयाने बोलत धनसुखलाल येऊन पोचले.

'कोण आहे ? कुठे आहे तो फौजदार ? सरकारी नोकरांना काही लाज-लज्जा नसते की काय ?'

त्यांच्या बरोबरच जनार्दन, कंदर्प आणि रंजन हेही तिथे येऊन पोचले होते. दरवाजातून एक पोलीस अधिकारी आत आला. आणि त्याने धनसुखलालना अदबीने सलाम ठोकला.

'तुम्हीच राहिला होतात, हो की नाही ? माझ्या घरात कोणी चोर-दरोडेखोर घुसलेत की काय ? एवढी मोठी पलटण घेऊन आला आहात ते ?' त्यांच्या सलामाला उत्तर देत धनसुखलाल म्हणाले.

'धनसुखलालभाई, आम्हाला फक्त वॉरंट बजावायचंय. आम्ही हुकूमाचे ताबेदार.' अंमलदार हसून म्हणाला. त्याला धनसुखलालच्या भाषेची चांगलीच माहिती होती.

'दोन-तीन माणसांना घेऊन जाण्यासाठी ही एवढी मोठी फौज ?'

'एखादेवेळी दंगल झाली तर ?'

'मी दंगा करीन असं वाटलं ?' खरेच दंगा करणाऱ्या धनसुखलालच्या शब्दात काही कमी मस्ती नव्हती !

'नाही साहेब, तुम्हाला कुठे काय म्हणतोय ?'

'तर मग काय हे लोक दंगा करणार ? सगळेच शामळूभाई आहेत हे !'

'त्यांचंही नाही म्हणत मी. पण ऐनवेळी लोकांनीच दंगल केली तर काय करायचं ?'

तेवढयात बाहेर मोटारचा भोंगा वाजला. रंजन म्हणाली, 'भाई आला.'

कृष्णकान्त, सुरभी आणि साहित्यिक विमोचन घरात आले.

'चला, वरघोड्यात तुम्हीही सामील व्हा.' धनसुखलाल पुतण्याला म्हणाले.

'आताच समजलं मला. मला वाटलं की आतापर्यंत घेऊनही गेले असतील सगळ्यांना.' कृष्णकांत म्हणाला.

सुरभी आपल्या भावाकडे पाहात उभी राहिली. अरुण हसला.

'तू का असा चेहरा वाकडा केलायस ?'

'भाई, पुन्हा तू तुरुंगात जाणार ?' सुरभीचा गळा दाटून आला होता.

'ए, सुरभीसूनबाई, तू असं काय करतेस ? आता जामिनावर सोडवून आणतो बघ त्याला.' धनसुखलाल म्हणाले.

जनार्दन, कंदर्प आणि अरुण एकमेकांकडे पाहात राहिले. मग जनार्दन म्हणाला,

'आपण एवढा त्रास घेऊ नका. आम्ही जामीन देणार नाही.'

'तुम्ही गांधीमार्गी सगळेच वाकडे. तुमचं सगळंच तिरपगडं खरं. जामीन का नाही देणार ?'

'आम्ही गुन्हा केलेला नाही, म्हणून आम्ही जामीन देणार नाही.'

'ते सगळं खटला चालवल्यावर शाबित होईल. खटला उभा राहीपर्यंत जामीन द्यायचा.'

'पण आम्ही खटला चालविण्याच्याही विरुद्ध आहोत. अहिंसेचा पांढरा ध्वज फडकवण्यालाही जे सरकार मनाई करतं ते सरकार न्यायालयात तरी काय न्याय देणार आहे ?'

'काय साहेब ? हा हुकूम मला तुम्हा तिघांवर बजावायचा आहे. तो आता बजावू ना ?' राजकारणाची चर्चा करणाऱ्या त्या गुन्हेगारांना मध्येच थांबवीत पोलीस अंमलदार धनसुखलालना म्हणाला.

'अरे पण साहेब, त्यांना आंघोळ-बिंघोळ करायला, खाय-प्यायला तरी वेळ द्याल की नाही ?'

'हो हो. एक तास थांबीन ना मी. मग तर काही म्हणणं नाही ना ?' अनेकदा पोलीस अधिकारीही नम्रपणे वागून लोकांची सहानुभूती मिळवतात. धनसुखलालनी त्या अधिकाऱ्याला बसवले. आणि त्याची इतर व्यवस्था होईल याची तजवीज केली. सकाळची वेळ होती. भूक कोणालाच नव्हती. तेव्हा तुरुंगात जाणाऱ्या त्या तिघांची आंघोळीची त्यांनी व्यवस्था केली. आणि नंतर त्यांना आपल्या देवाच्या दर्शनासाठी नेले.

'या, जरा परमेश्वराचं दर्शन घ्या. ईश्वराखेरीज आपला भाग्योदय होणार नाही.'

तिघेही जण धनसुखलालच्या मागोमाग गेले. बरोबर पुष्पा, रंजन आणि सुरभीही होत्या. कृष्णकांत पोलीस अंमलदाराबरोबर गप्पा मारीत बसला होता. अरुणला आत गेल्यावर जरा हसू आले.

'भाग्योदय करून घेण्यासाठीसुद्धा ईश्वर? त्याला एवढी सवड मिळते तरी का?'

हल्लीचा तरुण स्वयंभू असतो. त्याला ईश्वराची मदत लागत नाही. 'ईश्वराने खूप दिवस हे जग चालवले. आता त्याला जरा आराम करू दे.' अशा प्रकारची टिंगलखोर वृत्ती त्यांची ईश्वराविषयी असते.

देवघराची ती खोली खूप स्वच्छ होती. सुशीला देशसेवेत गढून गेली होती. धनसुखलालने आत येऊन ठाकुरजींच्या मूर्तीसमोर जमिनीवरच झोपून साष्टांग नमस्कार घातला. आपले कपडे खराब होतील ही भीती त्यांना वाटली नाही. रुद्ध कंठांनी त्यांनी अंतःकरणापासून देवाची प्रार्थना केली.

मनः पुरस्तादथ पृष्ठतस्ते
नमोऽस्तु ते सर्वत एव सर्व ।
अनंतवीर्यामितविक्रमस्त्व
सर्व समाप्नोषि ततो ऽसि सर्वः ।।

'प्रभू, तुझ्या चरणाची धूळ आहोत आम्ही, देवा.'

मागे तिघेजण उभे होते. जनार्दनने डोळे मिटले होते. जणू काही आपण त्या देवावर आणि धनसुखलालवर उपकार करीत आहोत, अशा भावनेनेच अरुण आणि कंदर्पने थोडा वेळ हात जोडले आणि सोडून दिले. मूर्तिपूजेवर त्यांचा विश्वास नव्हता. त्यामुळे त्या मूर्तीला हात जोडले न जोडलेसे केले ते केवळ घरधन्याला नाराज करायचे नाही म्हणून.

धनसुखलालची प्रार्थना ऐकून मात्र अरुण गंभीर बनला. सर्वांना व्यापून राहिलेला, सर्वरूप ईश्वर या कल्पनेची भव्यता त्याला जाणवली. त्याची नजर खिडकीबाहेर गेली. लालसर आकाशातून सूर्य वरती येताना त्याने पाहिला. हा सूर्य केवढा आहे? हजारो पृथ्वी एकत्र केल्या तर त्यातून एक सूर्य तयार होईल आणि या अशा सूर्यासारखे कितीतरी सूर्य आकाशात आहेत. त्यांच्या तुलनेत आपला सूर्य एखाद्या धूलिकणासारखा दिसेल. असे असंख्य महासूर्य आकाशात फिरत होते. आणि तरीसुद्धा

आकाश रिकामे ते रिकामेच ! सूर्य आणि सगळी सूर्यमाला फुटून तुटून तिचा चुरा झाला तरी या सृष्टीत एखादा धूलिकण उडाल्यासारखेसुद्धा वाटणार नाही. या सर्वव्यापी आकाशालासुद्धा आपल्यात सामावून घेणारे एखादे महातत्त्व असेल काय ? मानव त्याच्या चरणरजासारखाच आहे का ? सर्व सृष्टीचा विचार करता मानवाला धूलिकण म्हणणे म्हणजे एखाद्या धूलिकणाला सूर्य म्हणण्यासारखेच विचित्र ठरेल !

अरुणने पुन्हा आपले मस्तक नमवले. थोडा वेळ त्याने डोळे मिटून घेतले. आपण ह्या असीम अवकाशात तरंगत आहोत असे त्याला वाटले. त्याचे मन शांत झाले.

प्रार्थना करणाऱ्या धनसुखलालनी सर्वांना प्रसाद दिला. फारसा कोणालाच मिळाला नसता, तरीसुद्धा धनसुखलालने दुसऱ्या खोलीत जाऊन तिथल्या सर्वांनाच प्रसाद वाटला. तेवढ्यात सुशीला तिथे आली. आणि त्या तिघा भावी कैद्यांजवळ तिने दहीसाखरेच्या वाट्या ठेवल्या.

'एवढं खावंच लागेल. दही खाल्लं नाही तर अपशकुन होतो.' धनसुखलाल म्हणाले.

शकुनाला संशय म्हणजे निराळे आणि संशय समजून तिची टर उडवणे वेगळे. ज्या भावनेमागे पावित्र्य असते ती भावना संशयास्पद असली तरी तिची टवाळी करणे योग्य नाही.

सगळ्यांनी दह्याचा शकुन घेतला. तेवढ्यात कृष्णकान्त आणि विमोचन आले. त्यांनाही दही-साखर मिळाली. खाली थांबलेल्या फौजदारालाही देवाचा प्रसाद मिळाला. तो खाऊन त्याने तिघांच्या हाती त्यांची पकडवॉरंटे दिली.

बाहेर लोकांचा मोठा जमाव गोळा झाला होता. त्यांच्या गर्दीगोंगाटातून बाहेर पडून जनार्दन, अरुण आणि कंदर्प पोलिसांच्या मोटारीमध्ये जाऊन बसले. ते आता कैदी झाले होते.

मागून धनसुखलाल, कृष्णकान्त, सुरभी आणि विमोचन यांची मोटार निघाली. पुष्पा आणि सुशीला खिडकीत उभ्या राहून या कैद्यांच्या प्रयाणाकडे पाहात होत्या.

मोटार दिसेनाशी झाली तशी पुष्पा वडिलांच्या खोलीत आली. फाडून टाकलेले चित्र तिने पुन्हा पाहिले. आणि एकदम उशीवर डोके टेकून ती हुंदके देऊन रडू लागली.

## 32. आशा संपली

**डोळे माझे पाझरती**
**धरा कोणी डोळयांची धार**
**सागर माझा उसळतो**
**धरा कोणी सागराची लाट**

**—न्हानालाल**

जगात रडे नसते तर मानवी जीवन गुदमरून गेले असते. राग, संताप आणि दुःख यामुळे अनेकदा रडू येते. पुष्पा खूप रडली. आपलीच मैत्रीण आपल्या प्रेमाच्या आड येणार. तिच्या रागाला पारावार राहिला नाही. आता काय होईल ? रंजनच्या जाळयातून अरुणला बाहेर काढायचा मार्ग कोणता ?

पुष्पा रडत होती. तिच्या डोक्यात हे विचार घोळत होते. ती रडत राहिली. रडण्यामुळे तिचे दुःख जरा हलके झाले. तेवढयात तिला जाणवले की आपल्या डोक्यावर कुणाचा तरी मऊमऊ हात फिरत आहे. तिने वर पाहिले, रंजन तिच्या डोक्यावरून हात फिरवत होती. पुष्पा उठून बसली.

'का ग ? रडत का बसलीस ?' रंजनने विचारले. तिचे डोळे आश्चर्याने चमकत होते.

'मी रडेन नाही तर हसेन. तुझं काय गेलं त्यात ?' पुष्पा म्हणाली.

'असं काय ग, तू माझी बहीण ना ? तुला दुःख झालेलं मला आवडेल का ?'

'तुला जायचं नाही बाकीच्यांबरोबर ? तू कचेरीत गेली नाहीस ? आश्चर्य आहे.'

'मला जायचं नाही.'

'का ?'

'मला तुला पाठवायचंय, म्हणून.'

'राहू दे ! मला कुठेही जायचं नाही.'

'असं नाही करायचं. बहुधा सगळ्यांना शिक्षा होईल. जनार्दनला अनुभव आहे. कंदर्पचे वडील आहेत. पण अरुणकान्तना मात्र कोणीच नाही.

'अरुणकान्तचं नाव घेऊन तू मला खिजवायला आली आहेस. हो की नाही ?'

'तसं असतं तर मी कशाला आले असते ? मी तुझी समजूत घालायला आले आहे.'

'पटली माझी समजूत.'

'तुला अरुणकान्तचं प्रेम मिळावं म्हणून मी तुझ्या आणि अरुणकान्तच्या मधून दूर हटणार आहे.'

'म्हणजे ?'

पुष्पाने चमकून विचारले.

'तू परवानगी दिली नाहीस तर मी अरुणकान्तशी बोलणार नाही. आणि शक्य तोवर त्याला भेटणारही नाही. मग तर झालं ?'

'पण मी कुठे तुला तसं करायला सांगते आहे ?'

'तू सांगत नाहीस तसं. तरीसुद्धा मला तसंच करायचं आहे. पण तू तुझा संकोच जरा कमी कर. तूसुद्धा गेली नाहीस तर अरुणकुमार अगदीच एकटे पडतील.'

'तुला सोडून मी नाही जाणार.'

'तू तशीच्या तशीच राहणार, झालं ! मी आता घरी जाते. आता तू एकच लक्षात ठेव. तू आणि मी दोघीच्याही हातांतून ते सुटून जाणार नाहीत याची खबरदारी घे.' रंजनने पुष्पाच्या गालावर एक हलकीशी चापट मारली. आणि ती उठून दरवाजाकडे जाऊ लागली.

'रंजन, ए रंजन . . .' पुष्पाने हाक मारली.

'ए, उगाच ओरडू नकोस. ताई धावत येईल.' असे सांगून रंजन पुढे चालू लागली.

'रंजन, माझ्याच्यानं जाववणार नाही ग. आणि मग . . .'

'मीही जाणार नाही. अरुणकान्तबद्दल तुला एवढं प्रेम आहे तर कचेरीत जाऊन त्यांच्याजवळ बसून त्यांना जरा धीर दे. माझी वाट नको पाहूस.' असे म्हणून रंजन खोलीबाहेर पडलीसुद्धा. पुष्पाला काही समजलंच नाही. ती गोंधळलेल्या चेहऱ्याने दरवाजाकडे एकटक पाहातच राहिली.

'रंजन काय म्हणाली ? हे काय झाले ?' हाच प्रश्न पुष्पाच्या मनात सारखा घोळत राहिला. थोड्या वेळाने या प्रश्नाचे उत्तर तिच्या लक्षात आले. ती हसली आणि

मनाशीच म्हणाली,

'रंजनने अरुणकान्त मला देऊन टाकला!'

स्वत:च फाडलेल्या चित्राकडे तिने पुन्हा एकदा पाहिले. दोन्ही तुकडे एकत्र जुळवून तिने पाहिले.

'कागद फाटला असेल पण माझं चित्र मात्र पुरं आहे' तिच्या मनात विचार आला.

ती विचार करीत बसून राहिली. जवळजवळ दोन तास ती तशीच बसून होती. माणसाचे डोळे कुठपर्यंत पाहू शकतात? नजर अडखळत नाही तोपर्यंत. परंतु त्या नजरेलाही मर्यादा असतातच. पुष्पाचे डोळे उघडे होते, पण तरीही तिला जवळ पडलेले काहीही दिसत नव्हते. तिची दृष्टी भविष्याचा ठाव घेत होती. घटकेत तिचे गोरे गाल गुलाबी बनत. तर घटकेत तिच्या स्थिर पापण्यांची उघडझाप होऊ लागे. घटकेत तिच्या चेहऱ्यावर आनंद उभारून येई तर घटकेत तोच चेहरा रागाने फुलून येई.

कल्पनाशक्ती हे माणसाचे सगळ्यात मोठे सुख. सुखस्वप्ने पाहता पाहताच पुष्पाच्या मनात एकदम विचार आला.

'ज्यांच्यावरून मी हे माझं चित्र रेखाटलं ते तर तुरुंगाच्या वाटेवर आहेत. आणि मी इथं बसून काय करते आहे?'

तिने डोळ्यांवरून, तोंडावरून हात फिरवला. आपली स्वप्ने बंद करून टाकली. तेवढ्यात एका माणसाने येऊन सांगितले.

'ताईंनी जेवायला बोलावलं आहे.'

'चल, आलेच मी. भाई आले की नाही अजून?' धनसुखलालना त्यांच्या मुली 'भाई' म्हणत असत.

'नाही जी. ते इतक्यात येणार नाहीत. कचेरीत गेलेत ना. तिथलं काम पुरं झाल्यावर येतील.'

पुष्पा घाईघाईने सुशीलेजवळ गेली.

'तू आणि रंजन, दोघी जेवून घ्या पाहू.' सुशीला म्हणाली.

'रंजन नाही इथे.'

'कुठे गेली? तिला थांबायला नाही का सांगायचेस? शांत बसायचं तिला माहीतच नाही! गेली असेल कचेरीत!'

'नाही, नाही. ती घरी निघून गेली.'

'लहरी पोरगी आहे. तुला नाही का जायचं?'

'जायचंय तर.'

'तर मग जा, तयार हो. मी पण येणार आहे.' सुशीलेने सांगितले.

मंदिराखेरीज इतर कुठेही न जाणारी सुशीला न्यायालयात यायला कशी तयार झाली ते पुष्पाला समजेना. एकटे जायचे तिलाही जमलेच नसते. आता बहीण बरोबर येत आहे असे कळल्यावर तिचे मन जरा शांत झाले.

कचेरीसमोर हजारो माणसे जमली होती. सगळे प्रक्षुब्ध झाले होते. प्रक्षुब्ध बनणे हे सामान्य माणसाचे लक्षण आहे, असे मानून काही असामान्य देशसेवक चेहऱ्यावर हसू कायम ठेवीत जमावाला शांत राखण्याचा प्रयत्न करीत होते. प्रत्यक्षात मात्र ते गर्दीत आणि तिथल्या गोंगाटात भरच घालीत होते. पोलीस शिपाई जमावातल्या माणसांना शिस्तीत राखण्याचा प्रयत्न अधूनमधून करीतच होते.

जमाव शांत राहात नाही. परंतु तो सभ्य, विवेकी राहू शकतो.त्या दोघी तरुणींना येताना पाहिल्याबरोबर जमावाने त्यांना जायला रस्ता करुन दिला. त्यामुळे पुष्पा आणि सुशीला सहजपणे न्यायालयाच्या त्या प्रचंड खोलीत प्रवेश करू शकल्या. त्या दालनातही माणसांची खच्चून गर्दी झाली होती. कुठेही जरासुद्धा जागा शिल्लक राहिली नव्हती. पुष्पा आणि सुशीला दरवाजाजवळच उभ्या राहिल्या.

अरुणची नजर वारंवार सगळीकडे फिरत होती. जणू काही तो कोणाला तरी शोधत होता. तिघांही आरोपींना बसायला खुर्च्या दिल्या होत्या. धनसुखलाल कृष्णकान्त आणि सुरभी हे तिघे त्यांच्याजवळ बसले होते. गावातले इतर प्रतिष्ठित गृहस्थ आणि काही बायकाही पुढे बसल्या होत्या. न्यायालयात वकील असणारच• अनेकांना बसायला जागा नव्हती. त्यामुळे ते उभेच राहिले होते. मॅजिस्ट्रेट आणि जनार्दन एकमेकांशी काहीतरी बोलत होते. पण ते दरवाजापर्यंत ऐकू येत नव्हते.सुशीला आणि पुष्पा लांब उभ्या राहिलेल्या अरुणने पाहिल्या. त्याने सुरभीला सांगितले, तिने कृष्णकान्तला सांगितले. कृष्णकान्तने मागे वळून पाहिले आणि तो उठून उभा राहिला. गर्दीतून हळूहळू वाट काढीत तो त्यांच्याजवळ पोचला, आणि त्याने आपल्या रिकाम्या खुर्चीवर सुशीलेला बसवले. जवळच एक गृहस्थ खुर्चीवर बसले होते. त्यांनी आपली खुर्ची पुष्पाला दिली आणि ते स्वतः उभे राहिले. शेजारचेच आणखी एक गृहस्थ उठले आणि त्यांनी हलक्या आवाजात कृष्णकान्तला म्हटलं, 'आपण बसा ना.'

'Thank you so much(फार फार आभारी आहे.) आपण दोघंही बसू या.'

कृष्णकान्तने त्या गृहस्थांनाही आपल्याबरोबर त्या खुर्चीवर बसवून घेतले.

धनसुखलाल जनार्दनला काही समजावून सांगण्याचा प्रयत्न करीत होते. काही वकील मंडळी अरुण आणि कंदर्पशी बोलत होती. न्यायाधिशांनी टेबलावर कोपरे टेकवली होती. आणि चेहरा दोन्ही हातांच्या ओंजळीत ठेवला होता.

थोडा वेळ गेला. मग त्यांनी विचारले,

'मग तुम्हा तिघांचा काय निश्चय झाला आहे.?'

दालनात शांतता पसरली. बोलले शब्द ऐकण्यासाठी सगळ्यांनी आपले कान टवकारले.

'मी माझा निश्चय नामदारांना पूर्वीच सांगितला आहे. न्यायालयाचा अपमान करण्याची आमची मुळीच इच्छा नाही. परंतु हे न्यायालय ज्या राज्यसभेचे प्रतिनिधी आहे त्या सत्तेलाच आमचा विरोध आहे. म्हणूनच न्यायालयाच्या कोणत्याही कामात आम्हाला भाग घेणे शक्य होणार नाही.' जनार्दनने उभे राहून जाहीर केले.

'अरे पण, जामीन द्यायला काय हरकत आहे?' धनसुखलालना मध्ये बोलायचा अधिकार नव्हता, तरी ते बोलून गेले.

'मी जामिनाचाही आग्रह धरत नाही. मी देईन त्या मुदतीत हजर होण्याची हमी तुम्ही लिहून देत असाल तर मी तुम्हाला सोडून देतो.' मॅजिस्ट्रेटने आग्रहाने म्हटले.

'आम्ही असली कसलीही लेखी आश्वासनं देणार नाही.' अरुणने उभे राहून सांगितले.

'आम्हीसुद्धा असली हमी देणार नाही.' कंदर्प म्हणाला.

नृसिंहलालनी कपाळावर हात मारून घेतला.

'तुम्ही जामीनही देत नाही आणि लेखी आश्वासनही देत नाही. मग मी तुम्हाला कसा सोडणार?' वैतागून मॅजिस्ट्रेटने आपली अगतिकता स्पष्ट केली. कोणत्याही सबबीवर आरोपींना सोडून द्यायला तो तयार होता. परंतु खुद्द आरोपींनीच त्याच्यापुढे अडचणी उभ्या केल्या होत्या.

'आपल्याला योग्य वाटेल ती सजा द्या आम्हाला.' जनार्दनने सांगितले.

शेवटी मॅजिस्ट्रेटनी लेखणी हाती घेतली. आणि थोड्या वेळाने त्यांनी वाचून दाखवायला सुरुवात केली.

'आरोपींच्यासारखे बुद्धिमान लोकनेते न्यायाच्या कामात मला कोणतेही सहाय्य

करायला तयार नाहीत. त्यामुळे त्यांना जामिनावर अथवा जामिनाशिवाय सोडण्याचा प्रश्नच येत नाही. खटल्याचे काम रीतसर चालू होईपर्यंत मी त्यांना तुरुंगाच्या कोठडीत ठेवण्याचा हुकूम मोठ्या खेदाने देत आहे.'

'वंदे मातरम्' लोकांनी घोषणा केली. कोणाकडेही न पाहता मॅजिस्ट्रेट एकदम आपल्या मागच्या बाजूच्या चेंबरमध्ये निघून गेले. ज्यांना ज्यांना आरोपींना भेटायचे होते त्यांना त्यांना भेटायची परवानगी दिली होती.

अरुणला पोलीस घेऊन जायला लागले तेव्हा पुष्पाजवळ जाऊन त्याने विचारले, 'पुष्पावती, रंजनगौरी आल्या नाहीत?'

'नाही!'

'का बरं?'

'कुणास ठाऊक?'

'ती वरवरच दिसायला तशी आहे. पण मनातून ती हळवी आहे. तुला तुरुंगात जाताना तिला पाहवणार नाही.' कृष्णकान्तने कारण सांगितले.

जमावाचा जयजयकार चालू असताना, मित्रांच्या डोळ्यांतून अश्रू ओघळत असतानाच पोलीस आपल्या बसमधून आरोपींना घेऊन गेले.

डोळ्यांत उभे राहिलेले अश्रू पुसत असताना पुष्पाच्या मनात विचार आला, 'शेवटी आठवण रंजनचीच झाली!'

## 33. किसनचा आजार

**नाते रडण्याशी जडले**
**रडणे अंगांगी भिनले**
**रडतच जगणे रडतच मरणे**
**दु:ख कुणाला मम मरणाचे ?**

**—कलापी**

सुरभी, सुशीला आणि पुष्पा या तिघींचेही डोळे पाण्याने भरून आले होते. ज्यांना सजा झाली होती त्या वीरांच्या चेहऱ्यावर मात्र हसूच होते. हृदयात अभिमान होता. नावडत्या सरकारविरुद्ध नाराजी व्यक्त करण्याचा एक सुरेख प्रयत्न त्यांनी आज केला होता. त्याबद्दलचा तो अभिमान होता. स्त्रीहृदय मात्र सुखातही रडते आणि दु:खातही रडते. कृष्णकान्तही गंभीर होता. आर्थिक आपत्तीमुळे त्याच्या ओठावरचे हसू मावळले नव्हते. परंतु आपली मित्रमंडळी कैदेत जाताना पाहून मात्र त्याच्या तोंडावरचे हास्य ओसरले होते. त्याचे सिगार ओढणे कमी झाले होते. गेल्या काही दिवसांत तर त्याने मुळीच सिगार ओढली नव्हती. आता त्याचे डोके जड झाले होते. ते उतरवण्यासाठी त्याला काहीतरी उपाय पाहिजे होता. धनसुखलालही गोंधळून गेले होते. त्यांची बेचैनी त्यांच्या बोलण्यावागण्यातून स्पष्ट दिसून येत होती. कोणी भेटेल त्याच्याशी ते बोलत. कधी चिडून, कधी हसून, जणू, गडबडीने आपल्या मनावर झाल्या घटनेचा काहीही परिणाम झालेला नाही असे दाखवण्याचा प्रयत्न करीत. नृसिंहलाल हताश होऊन एका खुर्चीवर बसले होते.

आरोपींनी जामीन न देण्याचा हट्ट धरला, त्यामुळेच त्यांना तुरुंगात जावे लागले होते. आरोपींना घेऊन मोटार निघून गेली तेव्हा दुपारचे चार वाजले होते. कृष्णकान्त, सुरभी, धनसुखलाल सकाळपासून जेवले नव्हते. आरोपींच्याबरोबर जाण्यात, त्यांना

पटवून देण्यात, मॅजिस्ट्रेटचा सल्ला घेण्यात आणि अधिकारी मित्रांशी वशिले लावण्यातच त्यांचा सगळा वेळ गेला होता.

हळूहळू माणसे पांगू लागली. आरोपींना जिथे कैदेत ठेवले होते ती जागा शोधून काढून त्या जागेसमोर माणसे जमा होणार होती. म्हणून मग न्यायालयातली माणसे हळूहळू कमी होऊ लागली.

'काका, तुम्ही जा आता. मी जरा पोलिसस्टेशनवर जाऊन येतो.'

'मी पोलिस अधिकाऱ्याला सांगून ठेवलंय. काहीही अडचण पडणार नाही त्यांना. तुम्ही दोघंही आता माझ्याबरोबर चला. जरा जेवा-खा. आराम करा. मग आपण सगळेच जाऊन येऊ' धनसुखलाल म्हणाले.

'नाही नाही काका. रंजन एकटीच आहे तिकडे. मी घरीच जातो.'

'आपण तुझ्या घरून घेऊन येऊ या तिला. मोटारीनं किती वेळ लागणार आहे?' धनसुखलालनी आग्रह धरला.

कृष्णकान्तला या आग्रही म्हाताऱ्याशी वाद घालायचा नव्हता. आपल्या घरी पोचल्यावर मग काहीतरी कारण देऊन नकार देऊ असा विचार करून त्याने मोटार आणायला सांगितले. कृष्णकान्त पुढे बसला. बाकीची चारीजण कशीबशी मोटारीत मागे बसली. मोटार निघाली. तेवढ्यात समोरून एका मोटारीतून रंजन जाताना दिसली. रंजनने हसून त्यांच्याकडे पाहात रुमाल हलविला. रंजनबरोबर आणखी एक पुरुष गाडीत होता. पण त्याची ओळख कोणालाच पटली नाही.

'रंजन गेली?' पुष्पाने विचारले.

'हो ना. कुठे गेली बाई ती?' सुशीलाने विचारले.

'चौकीवर.' पुष्पाने शब्दांवर जोर देत म्हटले.

'अग पण, चौकी इकडे कुठे आली? ती तिकडे आहे.' धनसुखलालनी पुष्पाला तिची चूक दाखवून दिली.

'आता?' सुरभी उद्गारली.

'तिची मोटार दिसतेय पाहा अजून. आपण गाठू शकू तिला. आपल्या सगळ्यांना पाहूनही ती थांबली का नाही तेच समजत नाही मला.' असे म्हणून कृष्णकान्तने शोफरला गाडी मागे वळवायला सांगितले. अगदीच थोड्या वेळाचा प्रश्न होता. त्यामुळे कोणी काही म्हटले नाही.

परंतु रंजनची मोटार कल्पनेपेक्षा जास्त वेगाने चालली होती. कृष्णकान्तने

ड्रायव्हरला वेग वाढवायला सांगितले. वेग जुगारासारखाच मोहमयी असतो. कोण-त्याही वाहनाला वेग कमी करणे अपमानास्पद वाटते. कृष्णकान्तची मोटार आता भर वेगाने चालली होती. तरीसुद्धा रंजनची मोटार खूपच पुढे होती. म्हणून मागच्या मोटारीने आपला भोंगा वाजवला. तरीसुद्धा रंजनची गाडी थांबली नाही. शहर-भागात येताच एका बोळकांडीसमोर मात्र रंजनच्या मोटारीचा वेग कमी झाला. तेवढ्यात कृष्णकांतची मोटारही जवळ आली.

'रंजन', कृष्णकान्तने हलकेच हाक मारली.

मोटर ड्रायव्हरने गाडी उभी केली, तशी काहीशी रागावून रंजन त्याला म्हणाली,

'गाडी का थांबवलीस? समजत नाही का तुला?'

घुर्रर करून गाडी पुन्हा चालू झाली. रंजनचे हे चमत्कारिक वागणे कोणालाच समजेना. कृष्णकान्तने आपली गाडी तिच्या मागोमाग चालवली. खाचखळग्यातून गाडी जात होती. धनसुखलालनी विचारले,

'आपण आलोत कुठे? महारवाडा आहे की भंगी वस्ती?' त्या गल्लीचे स्वरूप पाहूनच त्यांनी काहीशा तिरस्कारानेच त्या हलक्या समजल्या जाणाऱ्या जातींचा उल्लेख केला होता. ज्यांच्यामुळे उच्चवर्णीयांनी हलक्या वर्णीयांचा तिरस्कार करावा असे या हलक्या जातीच्या लोकांनी उच्च वर्णीयाचे काहीही बिघडवलेले नाही. तरीसुद्धा हिंदू समाजातील उच्च वर्ग हलक्या वर्गाबद्दल तिरस्कार पसरवतात. आणि हलका वर्गही आपण या तिरस्काराचेच धनी आहोत असे मानतो. धनसुखलालना आणखीनच धक्का देणारे उत्तर पुष्पाने दिले.

'भाई, हा धेडवाडा आहे.'

'काय?' धनसुखलाल हबकल्यासारखे ओरडले.

'होय भाई. ही गल्ली धना भगतच्या घराजवळच जाते.'

'का बरं? या भ्रष्टाचाराची आता काय गरज आहे? आता मला सगळे कपडे बदलावे लागतील.'

'रंजनच्या मागे जाता जाता आपण इथे येऊन पोचलो.'

तेवढ्यात रंजनची मोटार थांबली. तशी मागचीही मोटार थाबली. धना भगतच्या ओसरीवर बरेच पुरुष आणि स्त्रिया जमा झाल्या होत्या.

'इथे कशाला आलीस रंजन?' धनसुखलालनी विचारले.

'सध्या काहीही विचारू नका. तो बिचारा किसन . . . . शेवटची घटका मोजतोय

म्हणे. . . .' मोटारीतून उतरता उतरताच रंजन उतरली. रंजनच्या मागोमाग कृष्णकान्तच्या कुटुंबाचे डॉक्टर खाली उतरले. हातातली बॅग सांभाळीत झपाट्याने ते रंजनच्या मागोमाग धना भगतच्या झोपडीत शिरले.

'अग आई ग. पोरगं एवढं का आजारी आहे?' सुशीलाही खाली उतरत उद्‌गारली.

'अहो भाई, डोस्कं फुटून जाईल एवढा ताप आहे त्याला. छातीवर एक अन् पायावर एक असे दोन डाग दिले तरी अजून ताप उतरला नाही.' त्याच्या ओसरीवर उभी असलेली एक बाई म्हणाली.

सुशीलेने डोळे विस्फारले. दोन डाग? त्या कोवळ्या पोराला हे औषध? ती धावतच झोपडीत शिरली. पाठोपाठ पुष्पाही होती. धनसुखलाल गोंधळून जाऊन उभे होते. ह्या पोरी काय करताहेत तेच त्यांना समजेना. धेडाच्या घरात कसे जायचे? वैष्णवाच्या घरी जन्म घेणाऱ्या या पोरी मुळीच कशा अडखळत नाहीत?

'काका, जरा आत या ना. भगतला बरं वाटेल.' कृष्णकान्तने सुचविले.

'नको रे बाबा. मी इथेच बरा आहे. ते तुम्हा सुधारकांचं काम.'

कृष्णकान्तने आत डोकावून पाहिले. आत बरीच माणसे जमा झाली होती. डॉक्टरांनी त्यांना हाताला धरून बाजूला केले, तेव्हा कुठे त्यांना स्वतःला आजाऱ्याजवळ जाता आले. डॉक्टर आणि मडमेसारखी देखणी तरुणी आत आलेली पाहताच सर्वांनी त्यांना जागा करून दिली. बडबड करीतच सर्वजण अर्धवट बाजूला सरकले.

'बिचाऱ्या भगतचं नशीब म्हणायचं!' 'ही चांगली माणसं कुठून आली?' 'पोरगं वाचत नाही.' झपाटलेलं दिसतंय!', 'छट, ही नजर लागलीय.', 'नजर लागावी असंच होतं ते पोर.' असे आयाबाया आपसात बोलत होत्या.

किसन एका गोधडीवर झोपला होता. त्याच्या अंगावर दुसरी एक गोधडी पांघरली होती. भगत मनात काही पुटपुटत होता. डॉक्टरांनी शुक्‌शुक् करून सर्वांना गप्प बसायला सांगितले.

'भगत, मी डॉक्टरांना घेऊन आलेय. इंग्रजी शिकलेले वैद्य.' रंजनने सांगितले.

'मोठा वैद्य तो परमात्मा. आणि त्याचं नाव म्हणजे मोठं औषध. ताई, कशाला त्रास घेतलात हा तुम्ही?' मुलाच्या डोक्यावरून हात फिरवीत भगत म्हणाला.

'इतका ताप आलाय त्याला. जरा डॉक्टरांचं औषधपाणी दिलं की ठीक होईल तो.' रंजन म्हणाली.

'ईश्वरानं दिला. ईश्वर त्याला वाचवणार नाही? हे प्रभू, तुझ्या पायावर त्याला घातलंय. तुझ्या गरीब भगतला मरायच्या वेळेला रडवायचं असेल तर तुझी मर्जी!' भगतचे डोळे थरथरले.

'दादा, प्रभू कुठे आहे?' किसन बोलला.

'पोरा, जिथे नजर टाकशील तिथे परमात्मा आहे. जिथे मन लावशील तिथे प्रभू आहे. माझा दयाघन!'

'दयाघन', किसनने पुनरुच्चार केला.

'म्हण बेटा म्हण. दयाघन!'

'दयाघन. दादा परमेश्वर दिसतो?'

'हो ना, बेटा'

'मला दिसतोय दादा.' किसन म्हणाला. चेहऱ्यावर हसू ठेवून तो शांत पडून राहिला.

डॉक्टरांचा कंठ दाटून आला. त्या आंधळ्या वृद्धाच्या कारुण्यपूर्ण श्रद्धेने त्यांचे निष्ठुर हृदयही हेलावून सोडले होते. खाली बसून त्यांनी किसनचा हात हातात घेतला. हात हातात घेतल्याबरोबर त्यांचा चेहरा गंभीर बनला. त्यांनी रंजनकडे पाहात डोके हलवले.

ते पाहताच सुशीलेला चक्कर आली. आपले हृदय शरीरातून निघून जात आहे, असा तिला भास झाला.ती एकदम जमिनीवर कोसळली. कृष्णकान्त धावतच आत गेला. पुष्पाने सुशीलेला सावरून धरले. परंतु सुशीलेचे शरीर खाली घसरत होते. तेवढ्यात एका बाईने बाहेर जाऊन धनसुखलालना सांगितले.

'आत ताईसाहेब बेशुद्ध झाल्या आहेत.'

धनसुखलाल धावतच आत गेले. ढेडाच्या झोपडीत जायचे नसते हे धर्मतत्त्व त्यांच्या लक्षातच राहिले नाही. आजारी माणसाची शुश्रूषा त्यांच्याच्याने झाली नसती. कारण ते स्वतःच इतके घाबरून जात की त्यांचे सगळे काम शेवटी उलटसुलटे होऊन जाई. आजूबाजूला उभ्या असलेल्या अस्पृश्य स्त्रियांना ते सांगू लागले,

'ए बायांनो, जरा पाणी आणा. पाणी शिंपडा तिच्या तोंडावर.'

डॉक्टरांनी सर्वांना झोपडीबाहेर काढले. एका-दोघा अस्पृश्य बायकांनी आपल्या लुगड्याच्या पदराने सुशीलेला वारा घालायला सुरुवात केली. सुशीलेचे शरीर ताठरले होते. आणि तिच्या घशातून कण्हण्याचा आवाज ऐकू येत होता.

'काय झालं ताई ?' धना भगतने रंजनकडे पाहात हलक्या आवाजात विचारले.

'ताईंना चक्कर आली आहे.'

'अरेरे, त्या देवता इथे कुठे ?'

'किसनला पाह्यला. काकासुद्धा आलेत. भाईही आलाय.'

'काय म्हणता काय ताई ? गरिबाच्या घरी सगळा राजवाडाच आलाय की. परमेश्वरा, तूच रे बाबा ! हा तुझा बालक तुला धुंडीत आहे.'

सुशीलेची चक्कर कमी झाली. तिचे कण्हणे बंद झाले. तिने डोळे उघडले. धनसुखलालच्या जिवात जीव आला. डॉक्टरांनी सांगितले, 'ताईंना बाहेर घेऊन जा. इथली गर्दी त्यांना सहन झाली नाही.' डॉक्टर त्या सर्वांनाच ओळखत होते.

'होय, होय, चला बाहेर.' धनसुखलाल कसेबसे सुशीलेला धरून तिला उठवू लागले.

'आपण थांबा काका. मी आणि सुरभी घेऊन येतो त्यांना.'

'हो रे बाबा. तसंच करा. मी आता म्हातारा झालो.'

सुशीला उठून बसती झाली. तिला सुरभी, कृष्णकान्त आणि डॉक्टर आधार द्यायला लागले.

'नको नको. काही जरूर नाही. मी उठते आपली आपण.' किसनच्या बिछान्याकडे नजर टाकीत सुशीला म्हणाली. तिने उठायचा प्रयत्न केला खरा पण उठता-उठताच तिला पुन्हा चक्कर आली. लगेच तिने कृष्णकान्तच्या खांद्याचा आधार घेतला.

'मला किसनला पाह्यचंय.' सुशीलेने सांगितले.

'नको ताई. परत चक्कर येईल तुम्हाला.' डॉक्टर म्हणाले. आजोबा आणि त्यांचा नातू यांच्यातला मगाच्या ईश्वरस्मरणाच्या प्रसंगाने डॉक्टरचेही हृदय हेलावले होते. त्याच प्रसंगामुळे सुशीलेचेही भान हरपले असावे असे डॉक्टरांना वाटत होते. म्हणूनच ते तिला आजाऱ्याजवळ जायची मनाई करीत होते.

'डॉक्टरसाहेब, आता मला काहीसुद्धा होत नाही. माझं मन पुरं ताळ्यावर आलंय आता.' असे म्हणत सुशीला पुढे गेली. आणि जाऊन रंजनजवळ बसली. त्या मुलाचे डोके आपल्या मांडीवर घेऊन बसावे अशी तीव्र इच्छा तिला होत होती. परंतु मोठ्या प्रयत्नाने तिने आपली ती इच्छा दाबून टाकली. ती किसनच्या तोंडाकडे पाहात राहिली.

'आजोबा, कोण रडत होतं?' किसनने विचारले. तापाच्या जोरात तो कधी शुद्धीवर असे अन् कधी ग्लानीत पडत असे.

'बेटा, रडायच्या गोष्टीच बोलायच्या नाहीत आता. देव स्वतः हसतो तसाच इतरांनाही हसवत असतो. बघ, तुला आई नाही ना, आज ईश्वरानं तुला आई दिली— एक नाही, चांगल्या चार-चार!' धना भगत त्याला म्हणाले. कोणकोण तरुणी तिथे आल्या आहेत हे आता त्यांना समजले होते. आपल्या हृदयाचे ठोके क्षणभर बंद पडल्याचा भास सुशीलेला झाला.

धनसुखलालांच्या मनातील स्पृश्यास्पृश्यतेची भावना आतापर्यंत लुप्त झाली होती. ती आता पुन्हा उफाळून आली. त्यांना धना भगतबद्दल थोडा आदर होता. ईश्वराची मार्मिक भजने ऐकवून मन पवित्र बनवणाऱ्या त्या महाराबद्दल त्यांना एक प्रकारचे प्रेमही वाटू लागले होते. मात्र हा आदर आणि प्रेम जातिभेद विसरायला लावण्याइतके सामर्थ्यवान नव्हते. तो भक्त असेल, परंतु त्याचा स्पर्श चालत नाही. ईश्वराचे नाव घेणारा अस्पृश्य पवित्र असला तरी त्याला ओसरीवरच बसायचे असते. त्याच्या भक्तिभावाने स्वतःच्या हृदयातल्या ऊर्मी उफाळून आल्या तर चालतील. परंतु त्याच्या शरीराचा स्पर्श आपल्या शरीराला होता कामा नये. हल्लीच्या संस्कारात वाढलेल्या लोकांना कदाचित ही अतिशयोक्ती वाटेल. परंतु उमद्या मनाच्या भाविक हिंदूंपैकी अनेकांवर असेच संस्कार झाले आहेत.

एका अस्पृश्याला स्पर्श केल्यामुळे धनसुखलालांच्या चेहऱ्यावर बेचैनी दिसू लागली होती. या भ्रष्टाचारी वातावरणातून सगळे हलतील तर बरे असे त्यांच्या मनात आले. तेवढ्यात त्यांचे लक्ष किसनकडे गेले. किसन डोळे उघडून आजूबाजूला पाहात होता.

'आजोबा, हे सगळे भजनं का ऐकायला आलेत?' त्याने विचारले.

'नाही रे पोरा, तुला पाह्यला आलेत.'

'मग सगळ्यांना आता आंघोळी कराव्या लागतील ना.' रोज धनसुखलालच्या घरी जात असल्यामुळे छोट्या किसनलाही धनसुखलालच्या घरची पद्धत माहीत झाली होती. म्हणूनच त्याला आता काळजी पडली.

धनसुखलालची बेचैनी नाहीशी झाली. किसनचा हा शेवटचा प्रश्न ऐकून ते गंभीर बनले. सुशीलेलाही राहवले नाही. तिने किसनच्या कपाळावर हात ठेवला.

किसन दचकला. त्याने डोके बाजूला वळवीत समोर पाहिले आणि तो म्हणाला

'मोठी आई, कशाला हात लावलास मला ? सगळे कपडे बदलावे . . .' दम लागला म्हणून त्याला वाक्य पुरे करता आले नाही. त्याने डोळे मिटून घेतले. एरवी स्पृश्या-स्पृश्यतेच्या भेदभावाबद्दल वाद घालणारा हा किशोर आपल्या हितचिंतकांच्या धार्मिक भावनांची जपणूक आपल्या आजारीपणातसुद्धा करीत होता.

'अशा वेळी केलेल्या स्पर्शात कसला आला आहे दोष ?' धनसुखलालच्या मनात आज पहिल्यांदाच स्पर्शभेदाच्या रूढीबद्दल शंका उत्पन्न झाली. जुन्या भावना टाकून देताना मनात भारी संघर्ष होत असतो. या युद्धाची आगाऊ सूचना देणारे वैफल्य त्यांच्या मनाला आतापर्यंत ग्रासत होते. रंजनच्या बोलण्याने ते त्या वैफल्यातून बाहेर पडले. रंजन म्हणत होती,

'ताई, आता तुम्ही जा. काका किती वेळ खोळंबून राहिले आहेत. तुम्ही सगळेच मोठी हिमत करून इथे आलात.'

'आम्ही आपले तुझ्यामागून अचानक इथे आलो. आलो ते बरंच झालं. कचेरीच्या धांदलीत आम्ही भगतना विसरूनच गेलो होतो. आता तूसुद्धा चल परत.' पुष्पा म्हणाली.

'नाही ग बाई. या किसनचा ताप उतरेपर्यंत आता मी इथेच बसून राहणार आहे. भगत काय त्याच्या डोक्यावर बर्फ धरणार आहे की त्याची दुसरी सेवा करू शकणार आहे ?'

'मग मीसुद्धा बसते तुझ्याबरोबर इथे. आपण आळीपाळीने मुलाजवळ बसू.' सुशीला म्हणाली.

'परंतु डॉक्टरांनी गंभीरपणे सुशीलेला तिथे जास्त वेळ थांबायची मनाई केली. धना भगतही आग्रहपूर्वक म्हणाला,

'माई, तुम्ही सगळ्या जगन्माता आहात. माझ्या घराला तुमचे पाय लागले हे माझ्या किसनचे मोठे भाग्य. आता तुम्ही जा. तुमचा आशीर्वाद किसनचं रक्षण करील.'

मोठ्या मुष्किलीने सुशीला बिछान्याजवळून दूर झाली. रंजनही सगळ्यांना पोचवायला बाहेर आली. तिने आपल्या भावजयीला म्हटले,

'माझी काळजी करू नका. किसनचा ताप उतरला की मी परत येईन. रात्री नऊ वाजेपर्यंत मी आले नाही तर कॉफी पाठवून द्या.' रंजनने सगळी रात्र जागून काढायची तयारी चालवली होती.

सुशीलेने डॉक्टरांना एका बाजूला नेऊन म्हटले,

'डॉक्टरसाहेब, आता कसं आहे?'

'काही विशेष नाही. उगीच आपलं तुम्हाला . . .'

'मी माझ्याबद्दल नाही विचारत. त्या मुलाबद्दल विचारतेय.'

'मी आलो तेव्हा नाडी जोरात होती. आता मात्र नाडी व्यवस्थित आहे. तेव्हा थोडीफार आशा आहे.'

'डॉक्टर उपचारात हयगय करू नका. तुम्हाला कल्पना नसेल, एवढं मोठं बक्षीस मी तुम्हाला देईन. पण मुलगा वाचला पाहिजे.'

'तुम्हाला आनंद झाला, तर त्यातच मला मोठं बक्षीस मिळेल. कृष्णकान्तचं आणि आपलं कुटुंब यांच्यासाठी काहीही करायची माझी तयारी आहे.'

'तुम्ही सगळी रात्र मुलाजवळ बसून राहाल ना?'

'बहुतेक तसंच करावं लागेल. रंजनताई सोडणार नाहीत.'

'सुशीलेने खिशातून नोटा काढल्या, आणि ती म्हणाली, 'डॉक्टर ही तुमची रात्रीची फी.'

'हे काय बोलताय ताई? मी काही फी घ्यायला आलो नाही आता.' डॉक्टरनी हात पुढे केला नाही. ते तिथून निघून गेले.

दोन्ही मोटारी निघाल्या. रंजनच्या मोटारीत तिघी स्त्रिया बसल्या होत्या. आणि कृष्णकान्तच्या मोटारीत दोघे पुरुष.

'मोटार परत लवकर पाठवून द्या, बरं का. गरज पडेल एखादवेळी.' रंजनने मोटारीतून निघालेल्या आपल्या भावजयीला सांगितले.

# 34. धर्माचे मंथन

**आत्मतापाच्या अश्रूंनो**
**कशासाठी हा मानवदेह ?**
**झिजत जाय हा क्षणोक्षणी**
**शेवटी जाणार निःसंदेह !**

**—बळवंतराय**

कृष्णकान्तने गाडी प्रथम धनसुखलालच्या घराकडे वळवली. घरी पोचताच धनसुखलालनी पुन्हा सगळ्यांना तिथे उतरायचा आग्रह केला. परंतु कृष्णकान्तने नकार दिला.

'तुला फार वेळ नाही थांबवून घेणार. उशीर कसला होतोय.'

'नको नको. रात्र होत आलीय. आपल्याला अजून आंघोळ करायची असेल. मी नंतर भेटेनच.' कृष्णकान्त म्हणाला.

धनसुखलालच्या मनात अजूनही ती लहानशी झोपडी आणि त्यातला कोणतेही उपचार न झालेला तो आजारी मुलगा यांचाच विचार घोळत होता. त्यांना आंघोळीचा विसरच पडला होता. कदाचित त्यांनी आंघोळ न करताच आपल्या ठाकुरजीचे दर्शन घेतले असते. परंतु आता कृष्णकान्तने त्यांच्या अशुद्धतेची आठवण करून दिली होती त्यांनी आपला आग्रह सोडून दिला. कृष्णकान्तने तिथूनच एक मोटार रंजनसाठी परत पाठवून दिली. आणि तो आणि सुरभी दुसऱ्या गाडीत बसून गेले.

'सुशीला, पाणी तापलेलं असेल ना ? तू स्नान करून घे. मग मी करीन.' पायऱ्या चढता-चढता धनसुखलाल म्हणाले.

'ताईची तब्येत ठीक नाही. आता स्नान नाही केलं तर ?' पुष्पाने विचारले.

'तिची इच्छा. माझा काही आग्रह नाही. नंतर तिचा स्पर्श झालेली अंथरुणं-पांघरूणं सगळी धना भगतकडे पाठवून देऊ. त्यात काही बिघडत नाही.' धनसुखलाल

म्हणाले. हे बोलत असतानाच आपल्या बोलण्यात कुठेतरी काहीतरी विसंगती आहे हे त्यांना जाणवत होते.

सुशीलेच्या भिवया जरा उंचावल्या.

'बिचारा तो अस्पृश्य. आपल्या अंगावरून काढलेले कपडे त्यांना चालतात ना?' तिच्या मनात विचार आला. पण तिने तो बोलून दाखवला नाही. ती एवढेच म्हणाली,

'नाही, नाही. मी स्नान करते. त्यात काय आहे?'

ती खोटे बोलत होती. तिचे मन हे खोटे शब्द ऐकून ओरडून उठले, 'त्या अस्पृश्याला शिवलं म्हणून स्नान कशाला करायला हवं? दुसऱ्या कोणाला शिवलं तर कुठे आपण स्नान करतो?'

'पण त्यांचा धंदाच तसला आहे.' तिच्या खोटया संस्काराने वाद सुरू केला. अस्पृश्यतेबाबतचा तिरस्कार आता उरला नव्हता. परंतु व्यवसायामुळे निर्माण झालेल्या अस्पृश्यतेवर काही बंधने असायला हवीत. इतकेच काय पण आजच्या या विज्ञानयुगात जंतूंचा प्रसार होण्याच्या भीतीने अस्पृश्यतेला पाठिंबाच मिळतो. म्हणूनच आपल्या जुन्या धर्मसंहितेमध्ये फार मोठा अर्थ भरलेला आहे.

'दगड आणि माती! .... आपणच अस्पृश्य असतो तर? .... सगळ्या जगातली अस्वच्छता दूर करणाऱ्या जातीनाच आपण अस्वस्थ म्हणून दूर केले! कारण? ते घाणेरडा धंदा करतात म्हणून.... त्याबद्दल त्यांचे उपकार मानायचे बाजूलाच राहिले! .... एक दिवस हेच लोक म्हणतील, 'राहू द्या तुमचं ते काम! आम्हाला तुम्ही शिवत नाही तर हा धंदा तुमचा तुम्हीच सांभाळा!' मग काय करायचे? आपल्या सगळ्यांनाच आळीपाळीने अस्पृश्य नाही का व्हावे लागणार?

वडिलांना बरे वाटावे म्हणून आणि ज्या रूढीत ती स्वतः वाढली होती, त्या रूढीचा रुळलेला रस्ता न सोडण्याचा दीर्घकालीन संस्कारांचा परिणाम पक्का होता, म्हणूनच सुशीलेने त्या दिवशी स्नान केले. परंतु तिचे मन बंड करून उठले. स्नान करता करताच तिच्या मनात परस्परविरोधी मतांचे वादळ उठले होते. परंतु तिच्या मनाला तिचे करणे पटले नाही. अशातऱ्हेने स्नान करून आपण सगळ्या अस्पृश्य जनतेचा अपमान करीत आहोत, अशी टोचणी तिला लागली. त्या अस्पृश्य जनतेत धना भगतसारखा पवित्र आणि किसनसारखा... !

'कोण? किसन? कोण?' तिला आपल्या मुलाची आठवण झाली. तोच तो किसन की काय याची चौकशी करणे अवघड होते. कोणत्याही परिस्थितीत आपले

मूल जिवंतच राहावे अशीच इच्छा मातृहृदय करीत असते.

धर्मनिष्ठ सुशीलेने एका प्रसंगी– दुर्बलतेमुळे असेल किंवा माणुसकीच्या भावनेने असेल– रूढीचा भंग केला होता. त्याच रूढीने तिला दाबून ठेवले होते. परंतु ज्या व्यक्तीमध्ये तिला आपल्या मुलाचा भास कित्येक वर्षे होत होता त्याच व्यक्तीचा आपणच अपमान केलेला पाहिला तेव्हा मात्र ती चिडून गेली.

'सगळंच ढोंग ! धेडाला शिवले म्हणून मी स्नान करावं एवढी मी कुठे पवित्र आहे ?'

तिने ठाकूरजींची पूजा केली. सांजआरती करायची राहिली होती तीही करून टाकली. हे सगळे करीत असताना देवाच्या मूर्तीच्या ओठावर स्मित चमकत आहे असा तिला सारखा भास होत होता. देवाला हात लावायचा तर पावित्र्य राखावे लागते परंतु हे पावित्र्य मृत्युशय्येवर पडलेल्या अस्पृश्याला शिवल्याने नाहीसे का व्हावे ? अस्पृश्याची सेवा केल्याने देह पवित्र होतो की निव्वळ स्नान केल्याने ? परमेश्वर आपल्याला हसत हसत हाच प्रश्न विचारत आहे. असा तिला भास होत होता.

'भाई, जेवण वाढते. तुम्ही तयार आहात ना ?' देवघरात पूजा करायला बसलेल्या धनसुखलालना पुष्पाने विचारले.

'अजून थोडं वाचायचं शिल्लक आहे. पंधरा मिनिटांत आलोच मी.' धनसुखलाल म्हणाले.

गीतेचा ठराविक अध्याय वाचल्याखेरीज धनसुखलाल जेवत नसत. आज त्यांच्याही मनावर अचानक आघात झाला होता. आपल्याला अस्पृश्यवस्तीत जायचा प्रसंग येईल असे त्यांना कधी स्वप्नातसुद्धा वाटले नव्हते. तिथे जाऊन एखाद्या अस्पृश्याच्या झोपडीत जावे लागेल अशीही त्यांना कल्पना नव्हती. त्याहीपेक्षा आपली मुलगी अस्पृश्याच्या मुलाला शिवेल आणि अशा स्थितीत तिच्या शरीराला आपल्याला स्पर्श करावा लागेल, ह्या सगळ्या अघटित घटनांनी साऱ्या जीवनभर जोपासलेल्या धर्मविचारांना आणि आचारांना चांगलाच हादरा दिला होता.

'मुद्दामहून कोण शिवलंय कोणाला ? नाइलाज झाला की सगळंच करावं लागतं,' गीता म्हणता म्हणता त्यांच्या मनात विचार येत होते. भगत आणि किसन या दोघांना आपण ओळखतो. बिचारे गरीब आहेत. निराधार आहेत. अशा वेळी आपण त्यांच्याकडे गेलो तर त्यात काय चुकले ? आपद्धर्मात सगळेच माफ असते. . . . . पण या स्पर्शाला तरी आपद्धर्म का म्हणायचे ? नुसते जाऊन आले म्हणजे झाले का ? त्याला

झोपडीतून बाहेर का नाही आणले ? त्याला चांगल्या हवेत राहायला का नाही आणले ? त्याला शिवून त्याच्या डोक्यावर बर्फ का नाही ठेवला ? . . . अशा वेळी त्याला शिवणे म्हणजे काय आपद्धर्म ? अशा विचारात गढून गेलेले धनसुखलाल तोंडाने गीता म्हणत होते. वाचता वाचता ते एका ओळीवर आले. त्यांनी ती ओळ वाचली आणि आपल्याला काही नवीन ज्ञान मिळाल्यासारखे त्यांना वाटू लागले.

'ईश्वरः सर्व भूतानां हृद्देशेऽर्जुन तिष्ठति।'

हे अर्जुना, ईश्वर सर्व प्राणिमात्रांच्या हृदयात वसतो ! धनसुखलाल ह्या ओळीवर अडखळले. त्यांनी पुढे वाचायचे बंद केले. आणि या महावाक्यात सामावलेल्या अर्थाचा ते विचार करू लागले.

'देवाला कोणताही देह अपवित्र वाटत नाही. मग पामर मानव हा भेदाभेद का करतो ? ईश्वर सगळ्यांच्या हृदयात राहातो. पापी मनुष्य देवाच्या निवास-मंदिराला शिवून अपवित्र होतो ? प्रभूला भेटायचा मार्ग म्हणजेच धर्म. आणि ईश्वर जिथ राहातो त्या स्थानापासून दूर राहाणे हा धर्म का अधर्म ? मग आतापर्यंत आपण केलेले आचरण चुकीचेच म्हणायचे का ?'

'भाई, पाठ संपत आला ना ?' पुष्पाने विचारले.

'झालंच, थोडाच वेळ आहे.' विचारातून जागे होत धनसुखलाल उत्तरले. दोन-तीन श्लोक वाचून झाल्यानंतर ते पुन्हा अडखळले.

'मन्मना भव मद्भक्तो मद्याजी मां नमस्कुरु।'

ईश्वर तर म्हणतो की 'माझं भजन कर. मला नमस्कार कर.' अस्पृश्याला शिवल्यानंतर मनात जे भाव उत्पन्न होतात किंवा त्याला शिवल्यामुळे स्नान करण्याची जी वृत्ती निर्माण होते त्यामध्ये ईश्वराला नमस्कार करण्याची भावना असते का ? प्रामाणिकपणे उत्तर मागितले तर मन नकारच देते.

'परमेश्वरा ! आम्हाला काहीही समजत नाही. आंधळ्याचा हात धरून त्याला पुढे ने !'

विचारांचा हा मारा धनसुखलालच्याने सहन होईना. म्हणून त्यांनी ईश्वराची करुणा भाकली. ताबडतोब त्यांच्या हृदयात कोणीतरी बोलले,

'ईश्वर तुझ्यासारख्या डोळे असून आंधळ्या असणाऱ्या माणसाचा हात धरील खरा; परंतु तू स्वतः कोणा खऱ्या आंधळ्याचा हात क्षणभर तरी हातात धरला आहेस का ?'

धनसुखलालनी पुढचे वाचन झपाट्याने संपवले. आतापर्यंतच्या आपल्या धर्माचरणाबद्दल त्यांच्या मनात गाढ नाराजी उत्पन्न झाली. अहंला धर्माची महत्ता मिळवून देणाऱ्या धर्मात ही स्पृश्यास्पृश्यता कुठून निर्माण झाली ?

रात्री बऱ्याच उशिरापर्यंत त्यांच्या मनात विचारांचे हे द्वंद्व चालू होते. ते धर्मनिष्ठ होते. धर्माचाराचे उपासक होते. नवीन विचाराची अनिष्ठता त्यांना समजत होती. तरीसुद्धा त्यांच्या मनातील प्रामाणिक सरलतेमुळे ते कधी दुराग्रही बनले नव्हते. त्यांचे स्वतःचे आचरण कडक असले. त्यांच्यासारखे कडक आचरण न करणाऱ्यांवर ते कडक टीकाही करीत. परंतु त्या लोकांचा त्यांनी कधी द्वेष केला नाही. या त्यांच्या गुणांमुळेच कृष्णकान्तच्या कुटुंबाशी तीव्र मतभेद असले तरी ते त्यांच्यावर गाढ प्रेम करू शकत होते. जुने विचार सोडून द्यायचे हे सर्व मानवजातीला अत्यंत अवघड वाटते. एका दिवसात होणारे हे काम नाही.

धनसुखलालना जे अशक्य वाटले ते सुशीलेने मात्र शक्य करून दाखवले. रात्रीतल्या रात्रीत तिची खात्री पटली की स्पृश्यास्पृश्यतेचा भेदभाव म्हणजे, कर्तव्य म्हणून लादलेल्या वैधव्यासारखे हिंदू समाजाचे दुसरे दूषण आहे, एखादी विधवा किंवा एखादा अंत्यज ह्यांच्याबाबतच ही दूषणे कशी जोपासली जातात, त्या दूषणांना बळी पडलेल्यांचे तुकडे तुकडे कसे सगळीकडे विखुरले जातात हे समजते.

सारी रात्र तिच्या डोळ्याला डोळा लागला नाही. उघड्या डोळ्यांना जे दृश्य करुणाजनक वाटत होते तेच दृश्य मिटलेल्या डोळ्यांना भीषण वाटत होते. रात्रीतून चार वेळा माणसे पाठवून तिने किसनच्या प्रकृतीची माहिती काढून आणली. दर वेळेला प्रत्येकजण एकच उत्तर देई, 'आहे तसंच आहे'.

धडधडत्या हृदयाने विचारलेल्या प्रश्नाचे एकच एक उत्तर ऐकून मात्र ती चिडली. आपण स्वतःच जाऊन पाहून आलो तर ? तिच्या मनात आले. असे करणे शहाणपणाचे ठरले नसते. बापाला काय वाटेल ? लोक काय म्हणतील ? हे अग्नीसारखे पवित्र कुटुंब एकाएकी असे धेडवाड्यात जायला का लागले ? या न विचारल्या जाणाऱ्या प्रश्नाचे समाधान करणे अवघड होते.

मानवाचे शहाणपण अनेकदा त्याला सत्याच्या मार्गाने जाऊ देत नाही.

सकाळी तिला जरा झोप लागली. तिच्या निद्रित कल्पनाशक्तीने अंत्यजवासाचे अस्पष्ट चित्र तिच्या डोळ्यांसमोर उभे केले. तेवढ्यात एका बाईने हाका मारायला सुरुवात केली. सुशीला दचकून उठली. तिचे हृदय धडधडू लागले. 'किसनचे कसं

असेल ?'

'खाली रंजनताई आल्यात.'

'मग वर का नाही आली ती ? जा, जा. बोलावून आण तिला.'

'मी सांगितलं त्यांना. पण त्या म्हणतात स्नान केल्याशिवाय वरती येता येणार नाही.'

सुशीला धावतच खाली गेली.

'रंजन, किसनचं कसं आहे ?'

'ठीक आहे. ताप उतरलाय. सकाळी वहिनी आल्या. त्या तिथे बसल्यात म्हणून मी आता घरी जातेय. मला वाटलं जाताजाता तुम्हाला सांगून जावं. रात्री तुमचा जीव टांगणीला लागला असेल. चार वेळचा तुमचा माणूस येऊन गेला.'

'येऊन सांगितलंस ते फार बरं केलंस. आत ये ना.'

'तुम्ही मला शिवणार नाही ! लांब बसवाल !'

'चौकापर्यंत भगत येऊन बसत होताच की. ये आत. चहा पाजते तुला. रात्रभर जागरण केलंयस.' सुशीला तिला घेऊन आत आली. चौकात तिने पाट मांडला. आणि रंजनला त्याच्यावर बसवले. तेवढ्यात पुष्पाही उठून आली. आणि चौकात चटई अंथरून तिच्यावर बसली. सुशीलेने चहा करून आणला आणि चुकून तिने पेला पाटावर ठेवून दिला.

'हां, हां, ताई, मला शिवलात ना ? आता स्नान करावं लागेल.' रंजन हसत म्हणाली.

'तू कशी इथे ?' वरच्या सज्जातून धनसुखलालनी विचारले.

'मी किसनची बातमी सांगायला आले, तर ताई मला शिवल्याच.'

सुशीला रंजनजवळच पाटावर बसली.

'आता चहा पिऊन टाक बघू तो. बडबड बंद कर तुझी.' सुशीलेने प्रेमाने दटावले.

किसनचं बरं आहे ना ?' धनसुखलालनी विचारले.

हो, आता बरं आहे.'

'चला, बरं झालं. देवानं भगतवर कृपा केली. असे म्हणत धनसुखलाल तिथून निघून गेले. चहा पिता पिता रंजनने टीका केली, 'प्रभूनं पाहिलं भगतकडे. पण माणूस त्याच्याकडे पाहातही नाही, की त्याला शिवतही नाही. तुम्ही स्नान केलंत ना ?'

'काय करणार ? पद्धत आहे. भाईंना वाईट वाटलं असतं.'

'काकांना वाईट वाटेल एवढ्याचसाठी स्नान केलं असेल तर वेगळं.'

'अगदी खरं तेच सांगते. नाहीतर मी अस्पृश्याला शिवले म्हणून स्नान नसतं केलं' असे सुशीलेला सांगावेसे वाटले. परंतु ती काहीच बोलली नाही.

रंजन गेल्यावर सुशीलेने स्नान केले आणि ती मंदिरात गेली. धनसुखलालनी आपला धार्मिक परिपाठ सुरू केला होता. पुष्पाने म्हटले, 'भाई, ताईनं एक घोटाळा करून ठेवलाय.'

'कसला ग ?'

'भाई, त्याचं असं झालं, मी एक नवस बोलून बसलेय.' ओशाळवाणे हसत सुशीला मध्येच म्हणाली.

'कसला ?'

'त्या किसनला पायावर घालण्याचा.'

'कोणाच्या पायावर घालणार आहेस ?'

'आपल्या ठाकुरजीच्या. त्याला बरं वाटलं म्हणून.'

देवघरातले वातावरण गंभीर बनले. थोडा वेळ कोणीच काही बोलले नाही. नंतर धनसुखलाल म्हणाले,

'पुढच्या बाजूला जिना लावला की सरळ मंदिरात जाता येतं. ज्याला दर्शन करायचंय तो करू शकेल. मी मिस्त्रीला बोलावून सांगतो त्याला.'

सुशीला आणि पुष्पाची हृदये थोडा वेळ थांबली. अस्पृश्याला दर्शन करता यावे म्हणून धर्मनिष्ठ पिता अशी व्यवस्था करतो आहे ! त्यांना आश्चर्य वाटले.

# 35. हृदयाची व्यथा

**एकान्ती दाटे हुरहुर मनी**
**येई प्राणप्रिया जिवाचा गडे**
**प्रेम उचंबळे मनी न मावे**
**वेल तराळून आशेची चढे!**

**—न्हानालाल**

रंजन घरी परतली तेव्हा कृष्णकान्त तिची वाट पाहात बसला होता. ती आल्या-बरोबर कृष्णकान्त तिला म्हणाला, 'चला, एक रात्र जागरण केलंस त्याचा मोबदला चांगला मिळाला.

'कसला मोबदला रे भाई?' भावाच्या शेजारी बसत तिने विचारले.

'हे बघ ना, तू एकदम पेपरात चमकायला लागलीस. तुझी रेखाचित्रं यायला लागली.'

रंजनने भुवया उंचावल्या. आणि ती हसली.

'कशात आलंय रे? एवढं कोण मूर्ख आहे?'

'हे बघ ना. बिचाऱ्यानं दोन कॉलम्स भरून लिहिलंय, तुझा फोटो छापलाय आणि तरी तू त्याला मूर्ख म्हणतेस.'

रंजनने वर्तमानपत्र हातात घेतले. आणि थोड्याच वेळात ते जमिनीवर टाकून दिले.

'असला फोटो? हट्!'

'त्यात काय वाईट आहे? अस्पृश्याची सेवा करायचं व्रत तू घेतलंस असं हे वृत्तपत्र म्हणतंय. हे खरं असेल तर तुझा फोटो एखाद्या हबशिणीसारखाच असायला पाहिजे. अस्पृश्य आणि हबशी यांची स्थिती सारखीच आहे.'

'माझा फोटो तू दिला होतास, भाई?'

'तुझा फोटो तूच दिला असशील. मी कशाला देऊ? माझं चित्र छापणार असते तर मी माझा फोटो दिला असता. काय रंजन, हे रेखाचित्र म्हणजे काय भानगड आहे?'

'माझं जे चित्र छापलंय त्याला रेखाचित्र म्हणतात?'

'छट्. तुझं फार कौतुक केलंय. ऐक, मी वाचून दाखवतो तुला.'

'एका श्रीमंत घराण्यातल्या मुलीचे नवेच दर्शन! राजकीय झंझावातात झेलपाटणाऱ्या तरुणांना जीवनभर टिकणारी चमक दाखवून, अस्सल देवपण कुठे केंद्रित झाले आहे हे दाखवून देणाऱ्या एका शूर वीरांगनेचा हा त्रोटक परिचय.'

'रंजन, ही झंझावात, झेलपाटणारी, चमचमणारी, ही काय भानगड आहे?'

'फेकून दे ते. लिहिणाऱ्याचं डोकं ठिकाणावर नसावं बहुधा.' कृष्णकान्तच्या हातातले वर्तमानपत्र हिसकावून घेऊन फेकून देत रंजन म्हणाली.

'तुझ्या मित्रावर अशी टीका करतेस?'

'माझा कोण मित्र?'

'का बरं? विमोचन!'

'तो कसला माझा मित्र? तो तुझा मित्र आहे. तूच त्याला पहिल्यांदा आणलंस इथे.'

'त्याचं बोलणं मोठं मजेदार असतं म्हणून मी त्याला घेऊन आलो. पण नंतर तो तुझाच मित्र झाला.'

'आलाय माझा मित्र!' खांदा उडवीत रंजन म्हणाली.

'तो बघ, आलाच तो साहित्यिक.' कृष्णकान्त खिडकीतून बाहेर पाहात म्हणाला. साहित्यिक विमोचन घरात शिरत होता.

'त्याला सांग मी झोपलेय म्हणून. खरंच मला झोप येतेय. पुन्हा बारा वाजता जायचंय. मग वहिनींना घरी पाठवायचंय.' असे म्हणत रंजन खोलीच्या बाहेर पडली.

धीरगंभीर चाल, विचारात गढलेल्या भिवया. काहीतरी शोधीत असलेली, जमिनीला खिळलेली नजर, असा साहित्यिक विमोचन हातात एक पुस्तक आणि एक वर्तमानपत्र घेऊन आत आला.

'या साहित्यिक' कृष्णकान्त म्हणाला.

'कोणालाही साहित्यिक म्हणून तुम्ही साहित्यिक या शब्दाला अगदीच क्षुल्लक बनवून टाकलंय.' बसता बसता विमोचन म्हणाला. आपण आणि आपल्यासारखेच

इतर एकदोन गुजराती सोडले तर दुसऱ्या कोणालाही साहित्यिक म्हणू नये असा कायदा करायला हवा, असे विमोचनचे मत होते.

'अरे दोस्त, अजून कुठला शब्द एवढा क्षुल्लक बनलाय? मला तर तो शब्द उच्चारायलाही अवघड जातो. (इटस ए टंगट्विस्टर !')

'रंजनगौरी नाहीत का? मी एकदोन ठिकाणी जाऊन आलो तर त्या घरी गेल्याचं कळलं.'

रंजन परत आली आहे. पण जागरण झालंय, म्हणून झोपलीय.'

'ठीक, ठीक. त्यांना विश्रांती घेऊ द्या. मी थांबतो इथे.'

विमोचन निश्चितपणे बसून राहिला. एका विनोदी लेखकाने ढिंकाचे वर्गीकरण केले होते. त्यात चिकट साहित्यिकांना स्थान दिले होते की नाही ते कृष्णकान्त आठवू लागला. साहित्यिकांचा असला उपद्रव काही नवा नाही.

थोड्या वेळाने कृष्णकान्त म्हणाला, 'रंजन रागावलीय तुमच्यावर.'

'का बुवा? मी लिहिलेलं शब्दचित्र वाचलं की नाही तिनं?'

'अरे, तिनं ते चित्र पाहूनच तुमचं वर्तमानपत्र फेकून दिलं. मूळ चित्रच जिथे तसं• तिथे रेखाचित्र कसं काय चांगलं असणार. दॅट्स व्हॉट शी थॉट अबाऊट इट (असं तिचं मत पडलं).

'चुकलंच ते माझं. तिची रसिकता माझ्या लक्षात यायला हवी होती. वृत्तपत्रात चित्रं उठून दिसत नाहीत हे खरं आहे. मी तिची क्षमा मागेन.'

'ती पुन्हा बारा वाजता जाणार आहे.'

'कुठे?'

'तो भगत येत होता ना त्याच्याकडे!'

•अस्सं. मग कालच्या सारखाच आजही मी त्यांच्याबरोबर जाईन.'

'तुम्ही काल तिच्याचबरोबर होता?'

'हो ना. त्याशिवाय मी हे चित्र कसं काढलं असतं?'

'तुम्ही कसे तिच्याबरोबर गेला होता?'

'कचेरीत रंजनगौरी दिसल्या नाहीत म्हणून मी पुष्पाला विचारलं. तिनं सांगितलं की रंजनगौरी घरी गेल्या आहेत. त्याचं कारण तिला सांगता आलं नाही, म्हणून मला जरा काळजी वाटली. मी सगळं तसंच टाकलं आणि इथे आलो तर रंजनगौरी रडत बसल्या होत्या. कशासाठी कोणास ठाऊक, पण माझ्या येण्यानं त्या खूष झाल्या.'

'मला ह्यातलं काहीच माहीत नाही. नंतर मी तुम्हाला शोधलं. पण तुम्ही कुठेच दिसला नाहीत.'

'मी परत येणार होतो. परंतु रंजनगौरींनी कचेरीत यायला नकार दिला. त्यांना आठवलं की धना भगतचा किसन आजारी आहे. त्याला पाह्यला जायचं होतं. मग मीसुद्धा त्यांच्याबरोबर गेलो. तिथून मग प्रेसला गेलो. तिथे रंजनगौरींचं शब्दचित्र लिहून काढलं. आणि कालच्या काल छापून आणलं.' रंजनगौरी हा शब्द उच्चारायची एकही संधी वाया न घालवता साहित्यिक विमोचनने त्या शब्दचित्राचा सगळा इतिहास सांगून टाकला.

ज्या वेळेस विमोचन रंजनचे नाव मोठ्या रसिकतेने घेत होता, तेव्हा रंजन आपल्या खोलीत झोपेची आराधना करीत होती. प्रयत्नाने सर्व काही साध्य होते असे म्हणतात. पण झोप मात्र प्रयत्नानेसुद्धा येत नाही. रंजनने अरुणला पुष्पाच्या हाती हसत हसत सोपवले होते. त्याच रंजनला घरी येऊन असा एकान्त शोधावा लागला होता. तिचे मन भरून आले होते. एकदा मोकळ्या मनाने अश्रू ढाळल्याशिवाय बरे वाटणार नाही असे तिला वाटत होते. आणि खरोखरच घरात येऊन स्वतःच्या खोलीत तिने पाऊल टाकताक्षणीच तिच्या डोळ्यांत आतापर्यंत थांबून राहिलेले अश्रू तुटलेल्या मोत्याच्या सरातील मोत्यांप्रमाणे ओघळून येऊ लागले.

कोणासाठी ? कशासाठी ? दुसरे कोणी असे रडताना पाहिले असते तर रंजनला केवढे हसू आले असते ? स्त्रीचे स्वतंत्र जीवन तिला पुरे समाधान देणारे पाहिजे असे रंजनचे मत होते. आणि आपल्या या मताप्रमाणे ती सर्वांशी चांगले संबंध राखीत असे. सर्वांशी गोडीने वागे, अनेक पुरुषांच्या हृदयांत तिने हुरहूर निर्माण केली असली तरी ती स्वतः मात्र अलिप्त राहात होती. स्त्रीला पुरुषाची अनिवार्य गरज असते असे तिला आतापर्यंत कधी जाणवले नव्हते. स्त्रीच्या एकाकी जीवनातही परिपूर्तता असते असे मानणारी रंजन पुरुषद्वेष्टी बनली नव्हती. ती ज्या साधेपणाने स्त्रियांच्यात मिसळत असे त्याच सरळ बुद्धीने पुरुषांच्यातही मिसळत असे. स्त्री आणि पुरुष या दोघांचीही ती आवडती बनली होती. कृष्णकान्तप्रमाणे तिच्याही शब्दांत कडवटपणा नव्हता. त्यामुळे तिलाही कोणी विरोधक नव्हता. तिच्या या साध्यासाध्या स्वभावामुळे कित्येक तरुण तिच्यामागे पतंगासारखे लागले होते, याची मात्र तिला मुळीच जाणीव नव्हती.

बंडखोर अरुणबद्दल तिने आपल्या भावाकडून आणि भावजयीकडून खूप ऐकले होते. त्याच्याबद्दल तिच्या मनात कुतूहल निर्माण झाले होते. तिने त्याचे काल्पनिक

चित्र आपल्या मनात उभे केले होते. अरुणला प्रत्यक्ष पाहाताच तो आपल्या कल्पने-तल्या चित्राशी एकदम जुळलेला पाहून तिला आनंदाश्चर्य वाटले होते. बंडखोराचा सहवास वाढता राहावा असे सर्वांनाच वाटते. तसेच तिलाही वाटत होते. त्याच्याशी तिचा सहवास वाढत गेला तेव्हा कित्येक दिवस तिला वाटत होते की हा इतर सगळ्याच पुरुषांपेक्षा वेगळा आहे, वेगळाच राहणार आहे. इतरांपासून असा वेगळा राहताना फक्त रंजनच्या निकट येणार आहे. पुरुषाबद्दल प्रथमच तिच्या मनात आसक्ती जागी झाली. ती दचकलीच. तिच्या स्वतंत्र जीवनाच्या कक्षेत कोणतेतरी अगम्य सत्व प्रवेश करीत आहे, असे तिला वाटले. स्त्री-पुरुषांच्या आकर्षणाचा ईश्वरी म्हणा, राक्षसी म्हणा, नियम शेवटी तिलाही बंधनात टाकीत होता.

काही बंधने गोड असतात. त्यांतून सुटायची इच्छा असली तरी ती मनापासूनची नसते. त्यातून सुटण्यासाठी जोर केला तरी खोलवर कुठेतरी हा पाश कायम राहावा अशीच इच्छा असते. प्रेमाचे नियम, प्रेमाची उत्पत्ती काहीशी अलौकिक, चमत्कृति-पूर्ण असते. या चमत्कृतीतून निसटण्याचा प्रयत्न करणाऱ्या रंजनला ह्या चमत्कृतीने आपल्याभोवती आणखीनच जाळे पसरावे, असे मारखे वाटत होते. स्त्रीजीवनात पुरुषाचे महत्त्व वाढत होते.

तिच्या चलाख नजरेला लवकरच समजून आले की हाच बंडखोर अरुण, पुष्पाच्याही जीवनात हास्य निर्माण करीत आहे. आणि मग तिची खात्री पटली की स्त्रीच्या जीवनाला पुरुषाच्या अस्तित्वाखेरीज उजळा येत नाही. ती अरुणसाठी झुरू लागली आणि त्या झुरणीमुळेच ती मिरवणुकीत सामील झाली होती, तिने ध्वज उभारला होता, जखमीची शुश्रूषा केली होती. अरुणला पकडून नेण्यासाठी बाहेर शिपाई येऊन उभे असल्याचे जेव्हा तिला समजले तेव्हा आपली अवस्था दिव्यावरच्या पतंगाप्रमाणे झाली असल्याचे तिला जाणवले. ती पकडली गेली. अरुण आणि पुष्पा या दोघांनीही तिला पकडले. पुष्पाच्या मनाची निराशा तिने स्वतःवरून अंदाजली. आणि एका अनाकलनीय औदार्याने तिने आपल्या बहिणीसारख्या मैत्रिणीचा फायदा व्हावा म्हणून, महान त्याग केला. तिने अरुणला सोडून दिले.

एवढे औदार्य जितके दुर्लभ तेवढेच त्या औदार्याच्या फलाचा स्वीकार करणेही दुर्लभच आहे. अरुणला सोडले म्हणून काय झाले ? उसळत्या सागराने चंद्राकडे झेप घेतली ? नाही, झेपेचे फळ नेहमीच गोड असते. अरुणला सोडले म्हणजेच जीवनातील आशा-अभिलाषाही सोडून दिल्या. रंजनचे मन रिकामे रिकामे झाले. तिच्यात उठून

उभे राहायची ताकद उरली नाही. पुष्पाजवळून उठून ती धावतच घरी आली. आणि घरात येताच तिच्या डोळ्यांतून अश्रुधारा वाहू लागल्या.

मानवी मनाचे प्रतिबिंब तीन गोष्टींत पडते. त्याच्या बोलण्यात, त्याच्या संगीतात आणि त्याच्या अश्रूत. अरुणला सोडणे सोपे होते, परंतु त्याची आठवणही न काढणे तितकेसे सोपे नव्हते. अश्रू संपले तेव्हा तिने डोळे पुसून वर पाहिले. एखाद्या खंदकासारखे आपले घर भयाण एकान्तात असल्याचा भास तिला होऊ लागला.

तेवढ्यात आपल्यावर फिदा झालेला साहित्यिक विमोचन तिला दिसला. एकाकी असले की भुतांचीसुद्धा सोबत आवडते. घोर निराशेत बुडलेल्या मनाला आधार मिळाला. रंजन विमोचनबरोबर गप्पा मारू लागली. ती स्वत: खूप हसली, आणि एरवी क्वचितच हसणाऱ्या साहित्यिक विमोचनलाही तिने खूपखूप हसवले. आपण आपल्या मनाला एखाद्या कामात गुंतवून ठेवले नाही तर ऊर फाडून आपले काळीज बाहेर पडेल अशी भीती तिला वाटत होती. पण विमोचनबरोबरच्या गप्पाही कायम थोड्याच चालणार होत्या ?

मनाला शांती मिळावी म्हणून उपाय शोधत असतानाच रंजनला धना भगतची आठवण झाली. त्याच्याबरोबर त्याच्या किसनचीही. किसन आजारी होता. काय झाले असेल त्याला ? त्याचा म्हातारा आजा त्याची शुश्रूषा कशी काय करीत असेल ? त्याला पाहायला गेलो तर ? श्रीमंतांचे जीवन इतरांना निरुपयोगीच ठरते. त्या जीवनाचा काही फायदा करून घ्यायचा असेल तर असा काही मार्ग मिळू शकतो. लगेच रंजन तयार झाली. रंजनवर भाळलेला विमोचनही तिच्याबरोबर जायला तयार झाला. किसन ऐन तापात पडला होता. त्याच्यासाठी डॉक्टरांना आणायला रंजन निघाली. तिला काहीही करून जिंकायचेच असे ठरवलेल्या विमोचनला ही उत्तम संधी मिळाली. त्याने झपाट्याने रंजनचे एक शब्दचित्र तयार केले. किसनच्या शुश्रूषेसाठी ती जे काही करत होती ते सगळे अस्पृश्योद्धाराचे प्रयत्न आहेत असे ठरवून विमोचनने त्याचाही आपल्या लेखात उल्लेख केला. आपल्या लेखनाचा चांगला परिणाम झालेला प्रत्यक्षच पाहावा या हेतूनेच तो तिथे येऊन हजर झाला होता.

पण रंजन त्याला पाहून आपल्या खोलीत निघून गेली. रात्रीचे जागरण होते. आपल्याला आता चांगली झोप येईल अशी तिची कल्पना होती. त्या नाजूक तरुणीला थकवाही आला होता. त्या गरीब मुलाच्या भयानक आजाराने तिचे मन दुसरीकडे वळवले होते. तो आता जगेल अशी आशा डॉक्टरांनीही दाखवली होती. त्यामुळे

तिच्या मनाची जखम जरा भरून येत होती. डोळे मिटण्याचा रंजन प्रयत्न करीत होती. पण तिचे मन बेचैन झाले होते. तिच्या मिटलेल्या डोळ्यांसमोर आश्चर्यचकित झालेला अरुण उभा होता. तो रंजनला विचारू लागला,

'तुम्ही मला उठवलंत, खरं ना ?'

'हो. का बरं ?'

'मी त्या वेळी जागा होतो का ?'

हे दृश्य जसेच्या तसे रंजनच्या मिटलेल्या डोळ्यांसमोर उभे राहू लागले. अरुणचा निरागस स्वभाव लक्षात येऊन ती हसली. मनाशीच म्हणाली, 'हे मला विचारताय ? काही समजत पण नाही ?'

दृश्य चालूच होते, 'पण मला तुम्ही उठवलंत कसं ?'

एखादा चमत्कार होऊन एखादा भिकारी राजकुमारीच्या खोलीत यावा आणि घाबऱ्याघाबऱ्या त्याने काही विचारावे असा अरुणचा चेहरा दिसत होता. लाजेमुळे उच्छृंखल बनून रंजनने उत्तर दिले,

'ऊंऽऽ मी तुम्हाला असं उठवलं.' रंजनने स्वतःच त्या वेळेला काढलेला चुंबनाचा आवाज आताही तिला स्पष्ट ऐकू आला. तिने डोळे उघडले. ती जरा घाबरली. ज्याला आपण सोडून दिले तोच का नजरेसमोर यावा ? हे कसे चालेल ?

ती बिछान्यावर उठून बसली. इकडे तिकडे पाहू लागली. या दृश्यातून आपली सुटका कोणी नाही का करू शकणार ? तिची नजर आपल्या दिलरुब्यावर गेली, पण संगीत आणि प्रेम यांचा संबंध जुना आहे. त्यामुळे ती काही करू शकली नाही. तिने उठून एक पुस्तक घेतले. ती एक उत्तेजक, रसाळ रहस्यकथा होती. बिछान्यात पडल्या-पडल्या ती वाचू लागली. पण दोन-तीन पाने वाचून झाली असतील. पुन्हा तिच्या कानात मिरवणुकीचा ध्वज घेऊन निघालेल्या अरुणची पावले निनादू लागली. अरुणच्या हातातून रंजनने ध्वज घेतला ते सारे दृश्य रंजनच्या मिटलेल्या डोळ्यांसमोर नाचू लागले. बेशुद्ध झालेल्या अरुणला धनसुखलालच्या घरी घेऊन जाताना तिने पुन्हा पाहिले आणि रंजन दचकली. तिने झटकन पुस्तक फेकून दिले.

'डोळे उघडे ठेवले तरी तेच !' ती वैतागून म्हणाली, त्या न मानवणाऱ्या एकान्तातून ती बाहेर पडली. एकटे बसून मन अस्वस्थ होण्यापेक्षा विमोचनबरोबर गप्पा मारल्या तर ते फायदेशीर ठरेल असे तिला वाटले. ती आलेली पाहताच विमोचनने चेहरा केविलवाणा केला.

## 36. बदलते रंग

जळता जळता महालामध्ये
एक दिवा विझला
पाण्यावरती लाटा आल्या
आल्या अन् गेल्या
चमचम करतो गगनामध्ये
एकटाच एक तारा
कुमुद उमलले रात्री, मिटले
खेळ संपला सारा.

—न्हानालाल

आयुष्यात अनेक नाटके करावी लागतात. विमोचनने आपल्या चेहऱ्यावर दुःखाची छटा आणली. चेहरा केविलवाणा केल्याने जर रंजनला त्याच्याबद्दल प्रेम वाटू लागले असते तर तसा चेहरा करायलाही त्याची ना नव्हती. रंजनने जेव्हा आपल्या भावाकडे पाहिले तेव्हा त्याचा चेहरा मात्र हसरा होता.

'का रे भाई ? हसतोस का ? काय झालं ?' रंजनने विचारले.

खळाळून हसत कृष्णकान्त म्हणाला.

'या विमोचनने एका भाजीवरच कविता केली आहे. कोणती भाजी रे ती विमोचन ?'

कोणत्याही कवीला असे काही म्हटले की त्याला तो अपमान वाटतो. कवी असल्या क्षुद्र विषयांकडे कधी ढुंकूनही पाहात नाहीत. ते पाहतात एक तर आकाशाकडे नाहीतर खोल पाताळात. नेहमी नजरेला पडणाऱ्या वस्तूंचे अस्तित्व त्यांना कधी जाणवतच नाही.

विमोचनचा चेहरा गंभीर बनला.

'अस्सं होय ? बरोबरच आहे. फुलांवर त्यांनी कविता केल्याच आहेत, आता

फळांची पाळी!'

'नाही, नाही. कृष्णकान्तना माझं म्हणणं समजलंच नाही.' साहित्यिकाने मुद्दा काढला. साहित्यिक नक्की काय म्हणतात हे नाहीतरी बऱ्याच वेळेला कोणाला समजतच नाही.

'हं, आता आठवलं. काय बरं ते? हां. लचकणारी कारली की मुरडणारी कारली की लचकणारी आणि मुरडणारी दोन्ही तऱ्हेची कारली, असलं काहीतरी होतं खरं त्यात.' आपल्या आठवणीला उजळा देत कृष्णकान्त म्हणाला. रंजन आणि कृष्णकान्त दोघेही हसू लागले.

'हट भाई, तूसुद्धा घोटाळे करतोस. अरे हे तर लहान मुलींचं गाणं आहे. 'लचके मुरडे कारेली.'

'तेच हो रंजनताई, मी तेच भाईंना समजावून सांगत होतो की कारेली म्हणजे भाजीची कारली नव्हेत. पण 'का रे अली' (का ग पोरी) याचं त्रोटक रूप आहे. मी असं म्हटलं तर त्यांनी हसायलाच सुरुवात केली.' विमोचनने आपली व्यथा सांगितली. साहित्यिक फक्त कवीच नसतात. आपण वाटेल ते करू शकतो अशी त्यांची भावना असते. ते काव्य करतात, बातम्या लिहितात, नाटके लिहितात तशा कादंबऱ्याही लिहितात. टीका लिहितात तशी व्युत्पत्तीही लिहितात. साहित्यिक काय लिहीत नाहीत हे कोणी सांगेल काय?

आपल्याला जे समजले, जे जाणवले ते इतरांनाही समजावून देण्याच्या वृत्तीतूनच साहित्यिकांचा जन्म झाला आहे. कारेली हे 'का रे अली' याचे संक्षिप्त स्वरूप आहे हे विमोचनच्या लक्षात आले तेव्हा आपल्या या माहितीचा प्रसार करण्यासाठी तो खूप अधीर झाला होता. त्याला भेटलेल्या बहुतेक सगळ्याच माणसांना त्या दिवशी हे ज्ञान मिळाले असेल. एकदा तर त्याने तिकीट तपासणाऱ्याला शब्दांची व्युत्पत्ती समजावून सांगायला सुरुवात केली होती.

विद्वानांच्या सहवासात वेळ कसा जातो समजत नाही. बाराचे टोले घड्याळात पडले, तशी रंजन उठून उभी राहिली. विमोचनला रंजनच्या कार्यक्रमाची पूर्ण कल्पना होती म्हणून तो म्हणाला,

'मी पण येतो तुमच्याबरोबर.'

'कितीही प्रयत्न केला तरी भिंतीवरची पडछाया आपल्याला टाळता येत नाही. रंजनने विमोचनलाही बरोबर येऊ द्यायचे ठरवले. तिच्या मोटारीचे इंजिन उंची होते

तरीही विमोचन एका जागेवर स्थिर राहू शकला नाही. त्याचे शरीर सारखे हादरत होते. त्याचे डोके हलत होते. आणि डोळे सगळीकडे फिरत होते. रंजनने त्याला विचारले,

'का हो विमोचनभाई, तुमची प्रकृती ठीक आहे ना ?'

'हो तर, तब्येत ठीक आहे की.'

'मला वाटलं, तुम्हाला घबराट होतोय.'

'नाही, नाही. तसं काही नाही. पण... मला जरा तुम्हाला काहीतरी सांगायचंय.'

'मग सांगा ना. बेलाशक सांगा.'

'तुम्हाला राग नाही ना येणार ?'

'छे, छे. मुळीच नाही.'

'मग सांगू ? बघा हं. राग नका येऊ दे.'

'अगदी खात्रीपूर्वक सांगते, मग तर झालं ?'

विमोचनची जीभ टाळूला चिकटून बसली. त्याला जे सांगायचे होते ते सांगायची वेळ आली तेव्हा त्याची जीभ अडखळू लागली. मोठ्या मुश्किलीने तो म्हणाला,

'नको, नको. आज नको. पुन्हा कधीतरी.'

'असं काय करताय ? माझी शपथ ! जे सांगायचे ते सांगून टाका की.' रंजनने मोठ्या प्रेमाने आश्वासन दिले. तेव्हा विमोचनने सगळे धैर्य एकवटले आणि साहित्यिकांना शोभणार नाही अशा साध्यासीध्या शब्दात, हलक्या आवाजात, धडधडत्या हृदयाने तो बोलू लागला,

'रंजनगौरी.... मी तुमच्यावर प्रेम करतो.'

'तुमची आभारी आहे.'

'कारण ?'

'तुमच्यासारखा साहित्यिक माझ्यावर प्रेम करतो हा मान काय कमी आहे का ?'

साहित्यिकाचे प्रेम ज्या स्त्रीला मिळते,ती खरोखरच मानाला पात्र ठरते. विमोचनची बेचैनी रंजनचे उद्गार ऐकल्यापासून जरा कमी झाली. आपल्या साहित्यिकतेचा त्याला सकारण गर्व वाटू लागला. साहित्यिक गुण म्हणजे सर्व प्रकारचे यश मिळवण्याची चावी आहे अशी त्याची खात्री झाली, रंजनच्या अधिक निकट जावे असे त्याला वाटू लागले.

'माझं मोठं भाग्य आहे.' रंजन आणि आपण यांच्यामध्ये असलेल्या रिकाम्या जागेवरून हात फिरवीत साहित्यिक म्हणाला.

'असं का बरं?' रंजनने विचारले.

'माझा आदर्श आता सिद्ध होईल.'

'मला नाही काही समजलं.'

'आता मी तुम्हाला भेटू शकेन.' साहित्यिकाला आता जरा धीर आला होता. 'साहित्यिकांच्यात धैर्य असत नाही, हे म्हणणे मात्र योग्य नाही.'

'कशावरून?''

'तुम्ही माझ्यावर प्रेम करता म्हणून.'

'असं मी कधी म्हटलं?'

'आताच तर म्हणालात ना, तुमच्यावर मी प्रेम करतो यात तुमचा मानच होतो, म्हणून...'

'ते खरं आहे हो. पण मी तुमच्यावर प्रेम कशी काय करू शकणार? माझी झेप ती केवढी? माझी हिंमत नाही होत.'

साहित्यिकाचे प्रेम संपादन करणारी स्त्री आदराला पात्र आहे खरी, पण जी साहित्यिकावर प्रेम करते ती स्त्री तर जाहीर मानपत्राला लायक ठरते.

'स्वतःची किंमत एवढी कमी नका समजू तुम्ही. तुमचं—माझं साहचर्य सतत राहिलं तर तुमच्या लेखन-वाचनात मदत करता येईल मला.' धीर करून विमोचन म्हणाला.

साहचर्याची रसाळ गीते गाणाऱ्या साहित्यिकांनी आपल्या सहचरींना त्यांच्या लेखन-वाचनात केलेल्या साहाय्याच्या भगीरथ प्रयत्नांतून आणखी एक गंगा स्वर्गातून पृथ्वीवर येईल. असे हे रसिक पण गुप्त प्रकरण स्त्रियांच्या उन्नतीच्या इतिहासातला बराच मोठा भाग व्यापील. हा इतिहास केव्हातरी लिहिला जाईल, तोपर्यंत तरी साहित्यिक या आपल्या प्रयत्नांची नोंद ठेवीतच राहतील.

'नाही हो विमोचनभाई. माझं साहचर्य तुम्ही पत्कराल तर तुम्ही रौद्र रसापासून सुरुवात करूण करुन रसाच्या कविता करायला लागाल. तुम्हाला ललितलेखन करायला लावणं मला आवडणार नाही.' रंजन हसून म्हणाली.

तेवढ्यात विमोचनचे ऑफिस आले. रंजनने गाडी उभी केली, आणि विमोचनला त्याचे उतरण्याचे ठिकाण आल्याची जाणीव करून दिली. विमोचन जरा नाखुषीनेच खाली उतरला. मात्र उतरता उतरता त्याने एक खबरदारी घेतली.

'तुम्हाला वाटतंय तसं काही नाही. मी तुम्हाला समजावून देऊ शकेन. तुम्ही म्हणाल तर मी बरोबर येतो तुमच्या, आपण आपली चर्चा चालू ठेवू.'

'दुसऱ्या एखाद्या वेळी आपण ही चर्चा करू. एकदम सगळं ऐकलं की मी घाबरूनच जाते.'

'चालेल, चालेल. परत एखाद्या वेळी.'

दोघेजण दूर झाली. विमोचनच्या हृदयात आशा जागी झाली होती. रंजनचा आतापर्यंतचा वेळही मोठ्या आनंदात गेला होता. विमोचनचा तिला राग आला नव्हता. पुरुषाच्या बरोबर फिरणाऱ्या स्त्रियांना आता फार हळवे राहून चालणार नाही.

रंजन धना भगतच्या घरी गेली. तिने आपल्या भावजयीला घरी परत पाठवले. किसनची तब्येत आता बरी होती. मध्ये एकदा डॉक्टर येऊन गेले होते. सुशीलेने त्यांच्या-कडूनही किसनच्या तब्येतीची खबर मिळवली होती. रंजन परत आल्याचे ऐकले तेव्हा धना भगतला गहिवरून आले.

'ताऔ, अहो तुम्ही हे काय करता आहात? केवढे उपकार आमच्यावर!'

'त्यात काय आहे? आम्हाला दुसरं कामच नसतं काही. मला इथं यायला फार आवडतं. तुमचं बोलणं ऐकलं की माझ्या मनाला शांती मिळते.' रंजन म्हणाली.

'मी तर पामर आहे, ताई! माझ्या बोलण्यात कसली आली आहे गोडी? काहीतरी वेड्यासारखं देवाचं नाव घेतो आणि किसनकडे पाहात दिवस अन् रात्र घालवतो मी.'

'भगत, तुम्हाला खूप कष्ट पडतात, नाही? डोळ्याचं दुःख आहेच, नाही?'

'नाही हो ताई. आता सवय झालीय. ज्या दृष्टीला देव दिसत नाही ती दृष्टी असली काय नि नसली काय सारखीच!' अशा तऱ्हेने गप्पागोष्टी करीत वेळ काढत रंजन अरुणला विसरायचा प्रयत्न करीत होती. परंतु दिवसभर विमोचनची करमणूक किंवा धना भगतच्या गप्पा चालू राहाणे शक्य नव्हते. धना भगत गप्प बसला की रंजनला अरुणची आठवण होत असे.

'हे काय भलतंच?' ती पुटपुटली. पण वेडाला वेड म्हणून ओळखले तरी त्यामुळे त्या वेडाचा परिणाम कमी होत नाही.

मध्ये एकदा पुष्पा आणि सुशीला येऊन किसनची खुशाली विचारून गेल्या.

'तुम्ही कशा आता?' रंजनने विचारले.

'का बरं ? किसनला पाहायला आलो होतो.' सुशीलेने म्हटले.

'तुम्ही अशा येऊ शकलात बऱ्या ?'

'बघ ना, आलो की नाही ?'

'काकांना समजलं तर ?'

'पण आम्हाला भाईनीच पाठवलं असलं तर ?' सुशीलेने सरळ प्रश्न केला. ते ऐकून रंजन आश्चर्यचकित झाली. चुकूनमाकून वैष्णव धेडवाड्यात येतात क्वचित. परंतु असे जाणूनबुजून ते इथे येतात हे जरा असंभवनीय होते. त्यातून धनसुखलाल आपल्या मुलींना असे उगीच इकडे पाठवतील हे अशक्यच वाटत होते.

'खरं सांगताय ताई ? माझा नाही विश्वास बसत.'

'मी या किसनला आमच्या ठाकुरजीच्या पायावर घालीन तेव्हा तर तुझा विश्वास बसेल की नाही ?'

बराच वेळ त्या तिथे बसल्या होत्या. नंतर पुष्पाने निघायचा बेत केला.

'चल ना ताई, नाहीतर उशीर होईल.'

'कुठे जायचंय ?' रंजनने विचारले.

'चौकीवर.'

'ते कशाला ?'

'सगळ्यांना भेटायचंय ना.' पुष्पाने सांगितले.

'सगळे म्हणजे अरुणकान्त ! हो की नाही ?' रंजनने हसत हसत विचारले. तिच्या त्या हास्यातही उरी शूळ खुपसल्याच्या वेदना होत्या.

सुशीलेने रंजनकडे रोखून पाहिले. मग तिने पुष्पाकडे पाहिले. झोपडीतल्या अंधुक प्रकाशातसुद्धा पुष्पाच्या गालावरची लाली तिच्या नजरेतून सुटली नाही. सुशीलेचा चेहरा जरा कठोर बनला. या कठोर छटेच्या मागे तिच्या तारुण्यातील घटनेची स्मृती होती. तिला आपला पूर्वेतिहास पुन्हा एकदा आठवू लागला.

'मुली एवढ्या मोठ्या झाल्यावर त्यांनी तरी काय करायचं ?' अशा औदार्यपूर्ण विचारात तिचा कडवटपणा मिसळला होता. थोड्या वेळाने तिने रंजनला विचारले,

'रंजन, तू अरुणकान्तचं नाव का घेतलंस ?'

'ते पुष्पालाच विचारा.'

'तू तिच्या नादी नको लागूस. ताई. पक्की खट्याळ आहे ती.' पुष्पा उठून उभी राहिली होती. सुशीला आणि पुष्पा दोघी गेल्या आणि रंजनच्या हृदयाला

वेदना झाली.

'पुष्पा त्यांना भेटणार आणि मी भेटायचंही नाही ?'

किसनला पुन्हा थोडा ताप चढला होता. म्हणून डॉक्टरना बोलवावे लागले. किसनच्या देखभालीत रंजनची सारी संध्याकाळ निघून गेली. आता भीतीचे काही कारण नव्हते खरे, तरीही रंजन ताप उतरल्यावरसुद्धा तिथेच बसून राहिली. रात्री घरी परतताना मात्र तिचे मन तिच्या ताब्यात राहिले नाही. रात्री तुरुंगात जायची परवानगी मिळत नाही, हे तिला पक्के माहीत होते. रस्त्यावरून जाणाऱ्या माणसांना आतले कैदी सहजगत्या दिसू शकतील अशा तुरुंगातल्या खोल्या नसतात, हेही तिला माहीत होते. तरीसुद्धा तिने मोटार तुरुंगाच्या बाजूने काढली.

तुरुंग दिसताच तिने मोटार थांबवली. रात्रीचे दहाचे टोले पडले तेव्हा आसपासच्या शांततेची तिला तीव्र जाणीव झाली. एखाद्या प्रचंड महालासारख्या असलेल्या त्या पोलीसठाण्याच्या एका बाजूला पोलीस अधिकाऱ्याच्या निवासस्थानाची सोय होती. तर दुसऱ्या बाजूला पोलीस कचेरी होती. त्या दोन्हींच्या मध्ये लोखंडाच्या सळयांनी बनवलेल्या एका भक्कम पिंजऱ्यात अरुण व त्याचे सोबती जमिनीवर निजले आहेत, असे दृश्य रंजनने आपल्या डोळयांसमोर आणले. तिला राग आला. भिवया उंचावून ती मनाशीच बोलली,

'हे सगळे तुरुंग मोडून तोडून टाकायला हवेत.'

तेवढयात एका पहारेकऱ्याने आरोळी दिली. आणि जगातले सगळे तुरुंग जिवापाड जपले जातात हे सत्य रंजनला समजून चुकले.

'कोण आहे ?'

'रयत' बंदुकीच्या धास्तीने शोफर उत्तरला. आणि त्याने गाडी पुढे काढली.

अरुणला कैदेत डांबणाऱ्या राज्यसत्तेची प्रजा म्हणवून घेण्यात, रयत म्हणून पळून जाण्यात रंजनला फार अपमान वाटला. तिच्या मनात विचार आला, 'हिंदुस्थानात जितके पुरुष आहेत तितक्याच बायकाही आहेत. १६ कोटी स्त्रियांच्यातल्या एक कोटी स्त्रिया जरी एकत्र आल्या तरी स्वराज्य मिळू शकेल.'

'पण हे होणार कसे ? एक कोटी पुरुष जिथे एकत्र येत नाहीत तिथे स्त्रियांचे काय ? स्त्रिया स्वतःच आपापल्या घरी, आपापल्या बुरख्यात कैद नाहीत का ?'

जगातले हे सगळे तुरुंग म्हणजे स्त्रियांच्या या जयड्व्याळ पण गुप्त तुरुंगाचे प्रतीक तर नाहीत ना ?

घरी गेल्यावर ती बिछान्यावर पडली.

स्त्री-जातीला कैदेत डांबणारे, कैदेत ठेवणारे पुरुषच. स्त्रिया या कैदेतून बाहेर का नाही येत ? जाणूनबुजून त्या या कैदेत कशा प्रवेश करतात ? प्रत्येक लग्नामुळे एकेक कैदखाना तयार होतो, हा विचार त्यांच्या मनात कसा येत नाही ?

'रंजन' खोलीच्या बाहेरून कृष्णकान्तने हाक मारून तिची विचारशृंखला तोडली. भाऊ आपल्याला ह्या वेळी का बोलावीत आहे हे रंजनला कळेना. ती उठून खोलीच्या दाराशी आली.

'का रे भाई, काय झालं ?' तिने विचारले. कृष्णकान्तचा चेहरा चिंताग्रस्त होता. कृष्णकान्त सहसा चिंतामग्न होत नसे. म्हणूनच रंजनचे काळीज धडधडले.

'हे बघ, तू जरा सुरभीजवळ बस. मला बाहेर जायला हवं.'

'कुठे ?'

'तुरुंगाला आग लागलीय. जनार्दन, अरुण आणि कंदर्प आत आहेत.'

रंजन नखशिखान्त थरथरली.

'मी येते बरोबर भाई.'

'सुरभी पण तेच म्हणतेय, पण तुम्हाला जमणार नाही. तुम्ही दोघी एकत्र झोपा.'

'जमेल आम्हाला. आमच्यानं घरी नाही बसवणार.' रंजनने लगबगीने चप्पल घातली आणि ती खोलीच्या बाहेर आली.

सुरभीचा चेहरा पांढराफटक पडला होता. तिचे पाय गळून गेले होते. एकुलता एक आपला भाऊ ! कैदेतही त्याच्या भोवती आग ! घाबरून ती रडूही शकत नव्हती.

'चला वहिनी.' रंजनने तिला हात देऊन उठवले. तिघेही गाडीत बसली. रंजनने विचारले,

'तुला कोणी बातमी दिली, भाई ?'

'दोन टेलिफोन आले होते. एक काकांचा होता, आणि दुसरा एका पोलीस अधिकाऱ्याचा.'

धडधडत यांत्रिक गाडी पाहता पाहता तुरुंगाजवळ येऊन थडकली. सगळीकडे माणसे जमा झाली होती. प्रचंड कोलाहल माजला होता.

माणसांच्याने तुटू न शकणारा तो तुरुंग अग्नीच्या प्रचंड ज्वाळांसमोर लाचार बनला होता. एखाद्या बळी जाणाऱ्या पशूप्रमाणे आपली स्वतःची आहुती तो अग्नीला देत होता.

इमारतीत शिरलेला तो अग्नी खिडक्या आणि जाळयांमधून आपल्या राक्षसी जिव्हा बाहेर काढीत होता. त्या जाळात लाकडे तुटून पडत होती, लोखंड गळून पडत होते. आणि विटा-चुन्याची राख बनत होती. लालपिवळया ज्वाळा वर उफाळत होत्या आणि सोनेरी रंगाचे आगीचे एकामागोमाग एक झोत उठत होते. शंभर फुटां-वरून बंबवाले पाणी मारीत होते. ते सगळे पाणी शोषून घेऊनही अग्नीची तहान भागत नसावी. अग्नी त्या पाण्याला आणि मानवाला हसत होता. रात्रीच्या चित्र-विचित्र रंगांनी यमपुरीचे चित्र रंगवीत होता.

वेडे नशीब आपल्या हाती राहात नाही तेव्हा आपल्या आधीन असलेल्यांना गडप करते. आपल्या आधीन असलेल्याचे अस्तित्वच नाहीसे झाले तर स्वत:चेही अस्तित्व नाहीसे होईल याची त्याला फिकीर असत नाही. आपल्याला निर्माण करणाऱ्याच्या देहात परत जाताना विजेला आचका लागत नाही. ज्या लाकडांच्या आधारावर अग्नी जगत असतो त्याच लाकडाचे अणुरेणू जाळून टाकताना अग्नीला मुळीसुद्धा फिकीर वाटत नाही.

माणूसही वेडा असतो ना, हेही दैवाचेच एक वेडे सत्व आहे. तसे नसल्यास तो आत्मघातकी बनेल काय ? माणसे परस्परांचे गळे घोटतील ? एकमेकांच्या छातीत खंजीर खुपसतील ? अग्नीचे आंधळेपण आणि माणसाचा अविचार यात काही फरक आहे ?

असेल, जरूर काहीतरी फरक असेल ! नाहीतर सुरभी अशी किंचाळली नसती. धुराचे लोट उसळत असलेल्या एका खिडकीत एक पुरुष उभा असलेला दिसत होता. सगळा जमाव भयानक किंचाळत उठला. त्या पुरुषाच्या हातात काहीतरी होते. ते हालताना दिसत होते. पुरुषाने आपला दुसरा हात त्याच्याभोवती लपेटला होता आणि त्याला आपल्या छातीशी घट्ट धरले होते. ते एक मूल होते. अग्नीची तेजस्वी वलये आणि धुराचे लोट यांच्यामध्ये किंचित काळ उभे राहून त्या पुरुषाने अग्नीकडे पाहिले. मनुष्यभक्षक राक्षस जसा मानवाला पाहिले की एक झेप घेतो तशाच रीतीने अग्नीने अनपेक्षितपणे वरच्या बाजूने एक झेप टाकली. धुराचे लोट चमकदार बनले. त्या पुरुषाच्या भोवती अग्नी पुन्हा घोटाळू लागला. आपल्या भक्ष्याची सगळयांना ओळख पटवावी म्हणून की काय अग्नी एक क्षण मागे सरला आणि दुसऱ्याच क्षणी त्याने पहिल्यापेक्षा जास्त लांबलचक जीभ बाहेर टाकली !

त्याच क्षणी त्या पुरुषाची पावले डगमगली. त्याचे डोके एका बाजूला झुकले.

छातीशी कवटाळून धरलेल्या त्या बालकाला त्याने आणखीनच घट्ट धरले. आणि त्याने खिडकीतून खाली उडी मारली. भडकलेल्या अग्नीने त्याचा पाठलाग केलाच.

सगळ्या लोकांनी श्वास रोखून धरला. कोणीच काही बोलत नव्हते. मात्र त्या जमावात थांबलेल्या मोटारीतून आलेली सुरभीची किंकाळी सगळ्यांनी ऐकली.

'भाई रे.'

कडकड आवाज करीत अग्नीच्या ज्वाला आकाशाला भिडू लागल्या. सगळ्यांना आव्हान देत अग्नी आपल्या शेकडो जिव्हांनी हसत होता. त्याला मानवी नात्याची पर्वा नव्हती.

## 37. अग्निस्नान

**थंड होई अग्नी ।**
**ज्वाला वर वर उठती ।**
**सीमा नसे काळाला ।**
**तो वर वर चढत जाई ।।**

**—न्हानालाल**

तीनच तासांपूर्वी रंजन तिथे थांबली होती. तेव्हा तिथे सर्वत्र शांतता होती. समजूतदार माणूसही बऱ्याच वेळा न समजण्यासारखे काहीतरी करून बसतो. तुरुंगातला अरुण तिला दिसणार नव्हता हे माहीत असूनसुद्धा अरुणला अडकवून ठेवणाऱ्या भिंती निरखून पाहण्याचा प्रयत्न करण्यात तरी काय अर्थ होता? पण स्वतः अरुणही त्या भिंतीच्या पलीकडे नजर टाकीत होता. गेले दोन दिवस नजरेला न पडलेली रंजन त्याच्या नजरेसमोर तरळत होती. त्याच्या स्थूल नजरेला रात्रीच्या शांत वेळी तुरुंगाच्या भिंतीपलीकडून त्याला शोधणारी रंजन दिसू शकली नाही. ती बाहेर होती त्यावेळी अरुण, कंदर्प आणि जनार्दन यांच्याबरोबर हिंसा-अहिंसेच्या तत्त्वांवर चर्चा करीत होता.

'हिंसेखेरीज हिंदुस्थान स्वतंत्र होणारच नाही. कंदर्पने वाद घातला.

'तसं असेल तर हिंदुस्थान परतंत्र राहिलेलाच चांगला. रक्तरंजित स्वातंत्र्य मिळालं नाही तरी आम्हाला चालेल.' जनार्दन ठामपणे म्हणाला.

'हे तुमचं मत झालं. पण नव-हिंद स्वातंत्र्याची वाट पाहात आहे. ते अहिंसेनं मिळालं तरी चालेल. पण तसं नाही मिळालं तर आम्हाला सांगा. आम्ही हिंसेनं स्वातंत्र्य मिळवायला तयार आहोत.' कंदर्प म्हणाला.

'हिंसेवाचून स्वातंत्र्य मिळाल्याचा दाखला इतिहासात तर कुठेच नाही.' अरुण कंदर्पचा पक्ष घेत म्हणाला.

'इतिहास घडलेल्या घटना नोंदवतो. त्यातून आपण बोध काढायचा असतो. जे भूतकाळात घडलं नाही ते भविष्य काळातही होणारच नाही, असं म्हणणं म्हणजे

इतिहासावर अन्याय केल्यासारखं होईल.' जनार्दनने मत मांडले.

'आपण ज्याच्यावर श्रद्धा ठेवू असं काही मानवाच्या मनात आहे का ? धाका-शिवाय कोणी काही देत नाही.' कंदर्पचे मत पडले.

'तू कोणाच्या धाकामुळे इथे, या तुरुंगात, आला आहेस? तुझी फाशीवर लटकायचीही तयारी आहे असं तू म्हणतोस ना ? मग त्यात तू कुठला स्वार्थ साधू पाहातोस ? तू तुझा जीव कोणाच्या भयानं द्यायला निघाला आहेस ?' जनार्दनने विचारले.

'भीती नाही. पण स्वार्थ निश्चितच आहे.'

'कसला स्वार्थ ?'

'देशाला स्वतंत्र करायचा.'

'पण त्यात तुला काय मिळणार आहे?' ते मिळण्यापूर्वीच कदाचित तू फाशी जाशील. तुझ्या मृत्यूनंतर मिळालेल्या स्वातंत्र्याचा तुला काय फायदा ?'

'माझे भाऊ उपभोगतील.'

'तुला कुठे भाऊ आहेत? तू तुझ्या आईवडिलांचा एकुलता एक मुलगा आहेस ना ?'

'सख्ख्या भावाबद्दल नाही म्हणत मी. सगळेच देशबांधव माझे भाऊ आहेत की.'

'हा देश तुझा कसा झाला ?'

'माझ्या भावनांमुळे.'

'ज्या भावनेने तू तुझ्या घराच्या मर्यादा या विशाल भारतवर्षापर्यंत आणून भिडवल्यास त्या भावनांसाठी तुला माणसं कुठे मारावी लागली होती?'

'नाही ना. पण तुम्हाला काय म्हणायचंय तेच मला कळत नाही.' गोंधळून गेलेल्या कंदर्पने विचारले.

'देशाला आपल्या प्रजेची हिंसा करावी लागत नाही, असं जनार्दनचं म्हणणं आहे. ते खरंही आहे. पण आपल्या देशाला कैदेत डांबणाऱ्या परकीयांचे काय?' अरुणने विचारले.

'मलासुद्धा तेच विचारायचंय. ज्या भावनांमुळे तुझ्या घराच्या कल्पना तुझ्या देशाशी जाऊन भिडतील, त्याच भावना आणखी थोड्या विशाल केल्या तर ?'

'त्यातून कदाचित आशियाईत्वाची भावना निर्माण होईल." अरुण म्हणाला.

'ही स्वाभाविकच पायरी आहे. भूगोल आणि संस्कार यांची बंधनं पूर्णपणे नाहीशी करता येत नाहीत. पण एवढं शिकल्यानंतर आपण सगळी पृथ्वीच आपली मानू शकणार

नाही का ? आपण देशाभिमान राखतानाच आशियाभिमानीही बनलो तर तोच अभिमान सगळ्या जगाबद्दल बाळगायला किती वेळ लागणार ? पण गुजराती असूनही आपण हिंदी म्हणवून घ्यायला किती विलंब लावतो ? हिंदी असूनही आपण आशियाई संस्कृतीचा अभिमान बाळगू शकतो. मग मानवाबद्दलचा अभिमान बाळगण्यात आपल्याला अवघड काय वाटावे ?

'मग इंग्रजांचं राज्य आपल्यावर कायम असावं असंच सरळ सरळ का म्हणत नाही ?' कदर्पने चिडून म्हटले.

'कोणीही कोणावर सत्ता गाजवू नये, अशीच माझी इच्छा आहे. सत्तेपासून दूर जाऊन सर्वांनी जगातले व्यवहार करावे.'

'असं कोणी आपल्याला करू दिलं तर ना ? आपल्या देशातच आपली मान्यता आहे की नाही हे तरी कोण विचारतंय ? मग जगाच्या व्यवहाराच्या गोष्टी कशाला ?'

'तेवढ्यासाठीच तर आपण स्वातंत्र्य मागत आहोत. मागून काहीही मिळालं नाही, म्हणूनच त्यांचं तंत्र निष्फळ ठरवण्याचा आपण प्रयत्न करीत आहोत.'

'ते हिंसेशिवाय होणार नाही.'

'हिंदुस्थानला नेमकं तेच करून दाखवायचं आहे. हिंसा न करता, म्हणजेच शत्रू न बनता कसं लढता येतं ते हिंदुस्थान दाखवून देईल. त्यातून मानवी महा-राष्ट्राचा पाया घातला जाईल.'

'हा उजेड कसला दिसतोय ?' बोलता बोलता अरुणने मध्येच विचारले. सगळ्यांचे लक्ष तिकडे गेले. तिघेही दचकले.

सामान्य कोठडीच्या बाजूच्याच एका घरात या कैद्यांची रात्रीची व्यवस्था करण्यात आली होती. धनसुखलाल आणि कृष्णकान्तनी त्यासाठी खूप खटपट केली होती. शिवाय नृसिंहलाल आणि अरुणचे वडील हे दोघेही सरकारी नोकर होते. त्यांनी आपापल्या मुलांना कैदेतही आराम मिळावा यासाठी प्रयत्न केलेच होते. म्हणूनच वरच्या मजल्यावरच्या ऑफिसच्या शेजारी, एका भरपूर उजेडाच्या एकान्त बाजूच्या खालीत या तिघांच्या राहण्याची सोय करण्यात आली होती.

या रिकाम्या खालीच्या पुढेच मोकळी गच्ची होती. ही गच्ची ओलांडली की तुरुंगाधिकाऱ्याचे निवासस्थान होते. गच्चीला जाळ्या लावून ती बंद करण्यात आली होती. ऑफिस आणि निवासस्थान यांच्या दरम्यान एक बोळकांडीसारखा भाग होता. तो बंद केला की आतली माणसे कैद होऊन पडत. गच्चीच्या वर आलेल्या एका

खिडकीतून जाळ दिसत होता.

तिघेही जाळीजवळ आले. त्यांनी पाहिलं तर धुराच्या लोटाआडून आग आत–वर वर चढत होती.

'काय जळत असेल ?'

'आसपास कोणी आहे की नाही ?'

ते एकमेकांना विचारत होते. तिथंच उभे राहून ते पाहू लागले. सगळे जग झोपले होते. आग विझून जाईल असे प्रथम त्यांना वाटले होते. तेवढ्यात आगीने दुसऱ्या खिडकीतून डोके बाहेर काढले.

'कोणी दिसत नाही तिथे' जनार्दन म्हणाला.

'नक्कीच आग लागलीय' अरुण म्हणाला.

'अहो शिपाई, अहो पहारेकरी' कंदर्पने हाका मारायला सुरुवात केली.

खाली पहारेकरी बदलत होते. त्यांनी 'आल्बेल' दिली खरी. परंतु ते कंदर्पच्या हाकेचे उत्तर नव्हते. कंदर्पची हाक खाली पोचलीही नसावी. एका लाकडावरून दुसरीकडे अशी पसरत पसरत आग वर वर चढत होती.

'रस्त्यावर कोणीच दिसत नाही !' कंदर्प चिडला होता.

'सगळा माळा जळून गेला तरी खालच्या शिपायांना पत्ता लागणार नाही. फार भयंकर आग लागली आहे' जनार्दन म्हणाला.

'म्हणजे तिचाही आरोप आपल्याच माथ्यावर येणार' कडवटपणे हसत कंदर्प म्हणाला.

'येऊ दे की. सगळा देश पेटवल्याच्या आरोपापुढे एक घर जाळल्याच्या आरोपाचं काय मोठंसं ?' अरुण म्हणाला.

तेवढ्यात त्यांना समोरच्या घरातून एक बारक्या आवाजातली किंकाळी ऐकू आली.

'अरेरे, कोणी मूल दिसतंय.' कंदर्प म्हणाला, त्याचा चेहरा दृढनिश्चयी बनला होता. त्याने समोरच्या जाळीला एक धक्का मारला. त्या मजबूत लोखंडी सळया त्याला हिणवत तशाच उभ्या राहिल्या.

अरुणचा चेहराही तसाच कठोर झाला होता. त्याने घोगऱ्या आवाजात विचारले,

'कंदर्प, जाळी तुटली तर आपण बाहेर जाऊ शकू नाही का ? आत एखादं मूल अडकून पडलेलं दिसतं आहे.'

सगळी ताकद एकवटून अरुणनेही जाळी खेचली. पण जाळी थोडीसुद्धा हलला

नाही. तिघांनीही आपल्या सगळ्या शक्तीनिशी जाळी हलवायला सुरुवात केली. एकदोन सळया जरा हलल्या पण त्यातून वाट कशी मिळणार ? त्यांनी दुसऱ्या दाराला जोरात लाथ मारली. परंतु सरकारी घरांची बंद दारे इतक्या चटकन थोडीच उघडणार ?

पुन्हा एकदा त्या मुलाची किंकाळी ऐकू आली. जनार्दन हात जोडून उभा राहिला. कंदर्पचा संताप मात्र वाढत होता. तो जाळीजवळ गेला. दातओठ खात त्याने दोन्ही हातांनी जाळी गदगदा हलवली. पुन्हा एकदा तो ती जाळी हलवणार तेवढ्यात जवळच उभ्या असलेल्या अरुणने जाळीला एक जोराचा धक्का मारला. जाळीची चौकट भिंती-तूनच निखळली. दुसऱ्या धक्क्याने जाळी तुटून खाली पडली आणि कैदी बंधनातून सुटले. कायद्याच्या दृष्टीने त्यांनी आणखी एक गुन्हा केला होता.

बाहेरून थोडा गलका त्यांच्या कानावर आला.

'मी इथेच थांबतो' जनार्दनने सांगितले.

'चालेल. आम्ही आसपास पाहून परत येतो' अरुण म्हणाला.

'बरं. जा तर लवकर पाहून या' जनार्दन म्हणाला. ते दोघे तरुण खोलीबाहेरच्या गच्चीवर गेले. समोरच्या खिडकीतून आग दिसत होती. त्या खिडकीतून आत कसे शिरावे याचा विचार करीत असतानाच त्यांना घराच्या भिंतीमधला एक लोखंडी खांब दिसला. त्याच्यावर उभे राहून समोरच्या खोलीचे व्हेंटिलेटर पकडणे शक्य होते. अरुण खांबावर चढला. मागोमाग कंदर्पही चढला. जाळीला असलेला काचेचा मोठा दरवाजा त्याने शक्ती लावून उघडला आणि आत डोकावून पाहिले. सगळीकडे आग पसरली होती. मात्र त्यांच्या जवळच्या भागापर्यंत अजून आग पोचली नव्हती. दोघेही जण उड्या मारून खोलीत उतरले. त्याबरोबर एका सात वर्षांच्या गोऱ्या मुलाने त्या दोघांना मिठी मारली.

'मला वाचवा ना' त्याने गोड पण केविलवाण्या आवाजात विनवणी केली. त्याच्या डोळ्यांत मृत्यूची छाया दाटली होती. त्याचे भान अर्धवट गेले होते. त्या दोघांना पाहून त्याला आशा वाटू लागली आणि त्याने त्या दोघांकडे संरक्षण मागितले.

रक्षण मागणाऱ्या माणसाला रक्षण न देणाऱ्या माणसाची पाळेमुळे उखडून काढा-यला पाहिजेत. दोघांच्याही हृदयात माणुसकीचा महासागर उफाळला. अरुणने त्या मुलाला उचलून घेतले आणि तो जवळच्या जिन्याकडे वळला. जिन्याजवळ तो पोचतो न पोचतो तोच जिन्यातून अग्नीची ज्वाला वर उफाळली. अरुण मागे म्हटला.

'आपण आलो त्याच रस्त्यानं ह्याला घेऊन जाऊ या' कंदर्पने सुचवले. अजून ते

शक्य होते. गच्ची ओलांडून तुरुंगाच्या त्या भागापर्यंत पोचायला आगीला अजून थोडा वेळ लागला असता. तोपर्यंत त्या बाजूने आपल्याला वाचवता येणे सोपे होईल, अशी त्याला खात्री वाटत होती. अरुणलाही कंदर्पची सूचना पटली. तो म्हणाला,

'होय कंदर्प, आपण याला जनार्दनकडे पोचवू या.'

'पण माझी आई आणि बहीण. त्यांचं काय ?' त्या मुलाने आपल्या गोड इंग्रजी भाषेत विचारले.

'त्यांनापण घेऊन येतो हं आम्ही.' अरुणने त्या मुलाची समजूत घातली.

जाळीचा दोर पकडून कंदर्पने त्या मुलाला पाठुंगळी घेतले. क्षणभरातच कंदर्प वरती चढून बाहेर पडला, गच्चीत उतरला. धावत जाऊन त्याने त्या मुलाला जनार्दनच्या हवाली केले. त्याच क्षणी जनार्दनच्या खांद्यावर एका पोलिसाने हात ठेवला. त्याने कंदर्पलाही पाहिले. कंदर्प त्या मुलाला जाळीजवळ उभे करत जनार्दनकड बोट दाखवून त्याला सांगत होता.

'ते बघ, ते उभे आहेत ना, त्याच्याजवळ जा तू. मी तुझ्या आईला घेऊन येतो हं.'

'माझ्या बहिणीलाही विसरू नका हं' त्या मुलाला आपल्याजवळ झोपलेल्या आपल्या छोटचा बहिणीची आठवण झाली. इंग्रजी पद्धतीप्रमाणे आईवडील आणि मुले वेगवेगळ्या खोलीत झोपतात. नेहमीच्या सवयीप्रमाणे आयाने मुलांना झोपवले आणि ती जिना उतरून गुपचूप बटलर नाहीतर शोफरला भेटायला खाली निघून गेली होती. त्यामुळे आग लागली तेव्हा मुले एकटीच होती. आयाला शोधत शोधत मुलगा खोलीतच अडकून पडला आणि आईला उठवायला दुसऱ्या खोलीत धावलेली त्याची पाच-सहा वर्षांची बहीण त्याच्यापासून दूर गेली. तिची त्या मुलाला सारखी आठवण येत होती.

'आणतो ना. तिला पण घेऊन येतो' त्याला समजावीत कंदर्प परत वळला. जनार्दनजवळ उभ्या असलेल्या शिपायांपैकी एक कंदर्पच्या मागे धावला. पण कंदर्प झटकन आधीच समोरच्या जाळीवर चढला होता. त्याने पुन्हा आत उडी टाकली. आणि अग्नीने त्याही जाळीला वेढले. मागे फिरायचा मार्गच बंद झाला होता. जिना आता धडाधडा जळू लागला होता.

अरुणच्या समोर एक युरोपियन स्त्री उभी होती. तिने रात्रीचा पोशाख केला होता. तिचे डोळे विस्फारलेले होते. केस थोडे विस्कटले होते. तिच्या सुंदर गौर मुखावर आईची माया दाटलेली होती. कंदर्प उडी मारून आत येताच ती धावतच त्याच्याजवळ आली. आणि तिने कंदर्पचा हात पकडून त्याला विचारले,

'माझा मुलगा कुठे आहे?'

'तो अगदी सुखरूप आहे बाईसाहेब' कंदर्पने तिला आश्वासन दिले. लहानमोठ्या कोणत्याही इंग्रजी माणसाला पाहिले की ज्याचे हात शिवशिवत आणि जो दात-ओठ खाऊ लागे त्या कंदर्पने आताच मोठ्या प्रेमाने आणि काळजीपूर्वक एका इंग्रज बालकाला अग्नीतून बाहेर काढले होते. तोच कदर्प आता एका इंग्रज आईचे दु:ख पाहून कळवळला होता. या आईचे दु:ख दूर करण्यासाठी मरावे लागले तर जीवाचे सार्थक होईल असे त्याला वाटले.

दैवासमोर, ईश्वराच्या सान्निध्यात, मानव हा फक्त मानवच राहातो. तो हिंदू बनतो, मुसलमान बनतो, ख्रिस्ती बनतो, तो कृत्रिमपणामुळे. आपापसांतील माणुसकी जाणवली की तो गांगरतो.

'आता मात्र आपल्याला सुरक्षित जागी जायला हवं. चहूकडून आग पसरते आहे. जलदी करा, आणि माझ्या मागून या' अरुणने सांगितले.

'पण माझी मुलगी कुठे आहे?' त्या आईचे मनही आपल्या मुलामुलीसारखेच झाले होते.

'तिलासुद्धा शोधून काढू आपण' असे आश्वासन देत अरुण पुढे झाला.

सगळी खोली आता आगीच्या ज्वालांनी आणि धुरांनी भरली होती. आग पसरून जेमतेम सात-आठ मिनिटेच झाली असतील. पण तेवढ्यात ती खोली आणि त्याच्या आसपासची गच्ची सगळेच आता पेटले होते. कसेबसे ते तिघेजणं खोलीच्या बाहेर पडले. पण आता जिकडे पहावे तिकडे तो भयानक अग्नी नाचत होता. एकदोन खोल्या ओलांडल्या तरी त्यांना ती मुलगी कुठे दिसेना.

आता कुठेही उभे राहाता येण्यासारखी परिस्थिती नव्हती. आग आता प्रचंड भडकली होती. विजेच्या वेगाने ती सगळ्या घरभर पसरत होती. खांब, खिडक्या, दारे आणि भिंती हळूहळू तुटून पडत होत्या. बाहेरचा गलकाही आता वाढत होता. खाली उतरायचा रस्ता बंद झाला होता. क्षणभरच अरुण आणि कंदर्प यांनी एकमेकांकडे पाहिले. दोघांच्याही डोळ्यांत मृत्यूची छाया दाटली होती. अरुण म्हणाला,

'कंदर्प, तू तालीमबाज आहेस. पळून जा इथून.'

'हट. तुम्हाला सोडून? मुळीच नाही' निर्भयपणे कंदर्पने उत्तर दिले.

'पण आपण या बाईंना बाहेर कसं काढणार?' अरुणने विचारले.

'ती एक खिडकी अजून रिकामी आहे. बघू या तिचा काही उपयोग होतो का!' असे म्हणून कंदर्प त्या खिडकीवर चढलाही. अजून आग तिथपर्यंत पोचली नव्हती.

त्याला पाहून खाली जमलेल्या हजारो माणसांनी मोठ्याने ओरडायला सुरुवात केली. बंबवाल्यांनी झटकन त्या बाजूला बंब वळवले. काही माणसे जाळे घेऊन धावत आली. त्यांनी खिडकीखाली जाळ पसरून धरले, आणि कंदर्पला खाली उडी मारण्यासाठी खुणा केल्या.

कंदर्प आत वळून म्हणाला,

'आपण सगळे वाचू शकू. खिडकीतून खाली उडी मारूया.'

'आधी तुम्ही उडी टाका.' अरुणने त्या गोऱ्या बाईला सांगितले.

'माझ्या मुलीला न घेता ? नाही, नाही, मी तिच्याबरोबर जळून जाईन इथं.' बाई म्हणाली.

'हे बघा, आता बोलत बसायला वेळ नाही. ईश्वराची मर्जी असेल तर तुमची मुलगीही वाचेल पण तुम्ही इथे राहिलात तर तुम्ही तिला वाचवू शकणार नाही उलट . . '

'नाही, नाही, नाही मी इथून हलणार नाही.' ती वेड्यासारखी किंचाळली. लगेच तिने स्वतःला सावरले. आणि ती आर्जवाने म्हणाली,

'पण मित्रांनो, तुम्ही कोण आहात ? तुम्ही का नाही जात ? तुम्ही जा ना. वाचवा स्वतःला.'

'तुम्हाला इथे ठेवून आम्ही जाणार नाही. बघा, तुम्हीच इथे राहिलात तर आपण तिघंही जळून मरू. तुम्ही इथून हललात तर आपण तिघंही वाचू शकू' अरुणने तिला समजावले.

'नाही हो नाही. माझ्यासाठी मी तीन जीवांची हत्या कशाला करू ? चला, चला, मी पण उडी मारते' असे म्हणून ती लगबगीने खिडकीपाशी आली. खिडकीतून वाकून तिने खाली पाहिले. आणि तिला पुन्हा आपल्या मुलीची आठवण झाली.

'नाही ग नाही. मी तुला सोडून मुळीच जाणार नाही' असे म्हणत ती खिडकीतून खाली उतरली.

आग आता त्या खिडकीलाही गिळायचा प्रयत्न करीत होती. वेळ फारच थोडा होता. कंदर्पने आपले मन कठोर केले आणि तो त्या युरोपियन स्त्रीजवळ आला. त्याने तिला ढकलले, तशी ती स्त्री खाली पडली. पडता पडता तिच्या थरथरणाऱ्या डाव्या हाताचा धक्का कंदर्पच्या पायाला लागला. कंदर्पने कसाबसा आपला तोल सावरला आणि त्याने त्या बाईच्या पाठोपाठ उडी घेतली.

पडता पडता तो ओरडला,

'अरुणभाई, लवकर!'

आणि दोघेही खालच्या जाळीत पडले आणि एकमेकांवर आपटले.

अरुण खिडकीत पाय ठेवू लागला तेवढ्यात त्याला मागून एक किंकाळी ऐकू आली. आता? धुरात त्याला काही सुचत नव्हते. किंकाळी आता जवळजवळ ऐकू येऊ लागली. तसेच कसे जायचे? तो मागे वळला. त्याचा श्वास गुदमरू लागला. त्याचे डोळे मिटू लागले. परंतु गुदमरणाऱ्या श्वासाकडे त्याने लक्ष दिले नाही. धुरामुळे आणि अग्नी-मुळे मिटणारे डोळे मोठ्या कष्टाने उघडून तो पुढे सरकला. तो किती पुढे गेला ते त्याला पण समजले नाही.

अचानक त्याच्या शरीराला येऊन कोणीतरी अडखळले.

'आई, ए आई, मी आहे ग.' एका छोट्या मुलाचा बोबडा आवाज त्याला ऐकू आला.

धुरातच अरुणने आपले हात पुढे केले, आणि त्या मुलाला उचलून घेतले. तीच ती मलगी! किती वेळ ती त्या खोलीत होती कुणास ठाऊक. आगीने सगळी खोली पेटवून दिली होती. घाबरून जाऊन त्या मुलीने आपले मस्तक अरुणच्या छातीवर टेकवले. आपण कोणातरी परक्या माणसाच्या हाती आहोत, हे तिला जाणवले.

अरुण त्या मुलीला घेऊन धावतच त्या खिडकीजवळ आला. त्याच्या पाठीमागे अग्नीने आपली अक्राळविक्राळ काया पसरली होती. कसाबसा तो त्याच्या तावडीतून बचावला. आपले बळ आणखी ताकदीने वापरावे या विचारानेच की काय अग्नी किंचित मागे हटला. म्हणूनच अरुण खिडकीजवळ पोचू शकला.

पण तिथे अग्नीचे तांडव सर्वव्यापी बनले होते. त्या खिडकीवरसुद्धा आता अग्नीचा नाच चालू होता. दुसरा मार्गच नव्हता. क्षणा-दोन क्षणांतच आग आता वरून आणि आतून उफाळून येणार याबद्दल अरुणला खात्री होती. शक्य तितक्या काळजीपूर्वक तो खिडकीवर चढला. धुराचा एक प्रचंड लोट त्याच्या मागून आला आणि दाराच्या चौकटीवर नाचणाऱ्या अग्नीने आपली ज्वाला लांबवर पसरली.

अरुणने तोंड वळवले. ती आग त्याला सहन झाली नाही. त्याने डोळे मिटून घेतले. आणि मुलीला छातीशी घट्ट दाबून धरले. ताबडतोब त्याची शुद्ध हरपली. त्याचे पाय लटपटले आणि तो खाली कोसळला.

सगळ्या खिडकीतून आता आगीच्या ज्वाळा पसरल्या होत्या. सुरभीने एक किंकाळी फोडली आणि तिची शुद्ध हरपली. लोकांनी ती किंकाळीसुद्धा खाली पडू दिली नाही. आतापर्यंत शांत असलेला तो जमाव एकदम बेभान झाला.

भान हरपलेली ती स्त्री शुद्धीवर आली. तिला कंदर्प आणि एका गोऱ्या माणसाने आधार दिला होता. तो गोरा माणूस त्या युरोपियन बाईचा नवरा होता. आणि आग लागल्याचा ओरडा ऐकून तो आपल्या निवासस्थानाकडे धावत आला होता. त्याने आपल्या बायकोला खाली पडताना पाहिले होते. तिला त्याने जाळ्यातून बाहेर काढले होते. आणि आता तो तिला आधार देऊन उभा होता.

ती बाई धावतच जाळ्याकडे आली. तिची मुलगी जिवंत होती. ती बाई एकाएकी ओरडून म्हणाली,

'अहो, धावा धावा. हा फार भाजलाय. त्याला कोणीतरी दवाखान्यात घेऊन जा.'

धनसुखलालच्या आणि कृष्णकान्तच्या मोटारी गर्दीतूनच पुढे झाल्या. थेट आगी-जवळ आल्या. बेशुद्ध अरुणला सगळ्यांनी उचलून मोटारीत निजवले.

त्याला उचलणाऱ्यात तो इंग्रज पोलीस अधिकारीही होता. त्याची पत्नी मुलीला हाताला धरून मोटारीजवळ उभी होती. अरुणकडे पाहात होती. मोटार चालू झाली तशा तिच्या डोळ्यांतून अश्रुधारा वाहू लागल्या. तिने आपल्या पतीला म्हटले,

'या दोन हिंदी माणसांनी आम्हाला वाचवलं' जवळच एक पोलीस शिपाई उभा होता. तो म्हणाला,

'पण साहेब, ते आपले कैदी आहेत. ते पळून चालल्येत.'

ते ऐकून ती छोटी इंग्रज मुलगी गुरकावून बोलली, 'चूप रे हरामखोर. कोणाला कैदी म्हणतोस ?'

## 38. डोळयांची खोली

**चित्त रुद्ध जाहले**
**नयनी अश्रु दाटले**
**जणू काय विश्व सारे**
**दिसते स्मशान झाले।**

**—कलापी**

अरुणला जाग आली. कित्येक दिवसांच्या बेशुद्धीनंतर आज तो जागा झाला होता. 'आपण जिवंत आहोत' याची जाणीव त्याला झाली तेव्हा त्याने डोळे उघडले. पण त्याला काही समजले नाही. त्यान पुन्हा डोळे मिटून घेतले.

'मी कुठे आहे?' त्याने मनातच प्रश्न केला.

या प्रश्नाचे उत्तर कोण देणार? डोळेच!

अरुणने डोळे उघडले. पुन्हा उघडले.

'डोळे का नाही उघडत?' अरुण जरा घाबरला. डोळे उघडून त्याने पापण्या जरा स्थिरावल्या.

'तरीसुद्धा काही दिसत नाही. म्हणजे?'

त्यान चटकन आपला हात उचलला आणि डोळयांवरून फिरवला. हात दुखायला लागला. कोणीतरी हळुवारपणे तो हात डोळयांवरून काढला आणि पुन्हा बिछान्या-वर ठेवला.

'डोळयांवर पट्टी तर नाही. मग दृष्टी का येत नाही?'

त्याने डोके फिरवून डोळ उघडले. कदाचित दुसऱ्या बाजूला पाहाणे डोळयांना अनुकूल ठरेल! पण छे! त्याही बाजूला काळोखच!

त्याचे काळीज धडधडू लागले. आपण अथांग पाण्यात बुडत आहोत अशा कल्पनेने त्याला गुदमरायला झाले. बुडणारा माणूस हातपाय मारून पाण्याच्या वर यायचा

प्रयत्न करतो. तसाच अरुणही चारीबाजूनी वेधणाऱ्या अंधाराच्या वर येण्यासाठी हात आणि डोके हलवू लागला. त्याच्या हालचाली रोखण्याचा प्रयत्न एक नाजूक स्पर्श करीत होता. पण हा स्पर्श कोणाचा ? त्याचा श्वास जोरजोरात होऊ लागला. हृदयाचे ठोके वाढू लागले. पापण्यांची उघडझाप जलद होऊ लागली.

'अरे पण मी आहे कुठे ?' शेवटी त्याच्या तोंडून शब्द फुटला. कोणापुढेही नमते न घेणाऱ्या शूर वीराला निराधार वाटू लागले.

तीन-चार कंठांतून फुटलेले हुंदके त्याला ऐकू आले.

त्याने डोळे उघडून कोण हुंदके देते आहे ते पाहण्याचा प्रयत्न केला. पण हटून बसलेले डोळे काहीच बघत नव्हते.

अंधार ! चहूकडे अंधार ! !

'मला दिसत का नाही ?' पुन्हा त्याने विचारले. कोणीच उत्तर दिले नाही. हुंदके मात्र चालूच होते. असे काहीच न बोलता हुंदके देणाऱ्या व्यक्तींना ओळखायचा त्याने खूप प्रयत्न केला. पण तो निष्फळ ठरला. तसा तो पुन्हा ओरडला,

'माझे डोळे कुठे गेले ?'

दोन-चार क्षण कोणीच काही बोलले नाही. भाजलेला अरुण दवाखान्यातल्या एका खोलीत निजला होता. आणि त्याच्या आसपास त्याचे स्नेहीसंबंधी गोळा झाले होते. आजपर्यंत तो बेशुद्धच होता. एक-दोन दिवसांपासून तो थोडी थोडी हालचाल करू लागला होता. आता वाटेल त्या क्षणी अरुण जागा होईल या आशेने तिथून उठायला कोणीही तयार नसे. पण तो जागा होईल तेव्हा ? – काय होईल ? तो काय म्हणेल ? – क्षणाक्षणाला होणारी ही जाणीव सगळ्यांनीच मोठ्या प्रयत्नाने दाबून ठेवली होती. अरुण जागा झाला. तो क्षण आता आला होता. सगळ्यांचे जीव टांगणीला लागले. डॉक्टरांनी अरुणच्या डोळ्यांबद्दल आशा सोडून दिली होती.

प्राण घ्यायला आलेल्या अग्नीने फक्त डोळे काढून अरुणला जिवंत सोडले होते. पण अरुणला हे समजेल तेव्हा काय होईल ? . . . हो ! पण त्याला आता जवळजवळ समजले आहे की त्याचे डोळे आता काम करणार नव्हते.

आवाजात येणारा कंप मोठ्या मुश्किलीने दाबीत कृष्णकान्तने अरुणला चुचकारले,

'नाऊ अरुण ! ओल्ड बॉय ! फेस इट ब्रेव्हली ! (अरुण, दोस्ता, धीर धर !')

अरुणने कृष्णकान्तचा आवाज ओळखला. कृष्णकान्तला पाहायचा त्यान प्रयत्न केला. पण डोळे स्वतःचे काम करायचेच विसरून गेले होते. अरुणने हात लांब केला. पण हात थोडेच पाहू शकणार होते ? हात पुन्हा गादीवर पडले. अरुणने ते तसेच

पडू दिले. क्षण-दोन क्षण तो विचार करीत स्वस्थ बसला. कृष्णकान्तच्या म्हणण्याचा अर्थ काय ? मग तो म्हणाला,

'म्हणजे माझे डोळे गेले ! हो ना ?'

अरुणला असे केविलवाणे बोलताना आजपर्यंत कोणी ऐकले नव्हते. आता त्याचा कंठ भरून आला होता . इतकेच नाही तर त्याच्या डोळ्यांच्या खाचेत पाणी चमकत होते.

डोळे पाहू शकत नाहीत. पण रडू शकतात. जगाबरोबरचा संबंध ते तोडून टाकतात. परंतु ज्याच्या शरीराचा ते भाग असतात त्याच्या हृदयाबरोबरचा संबंध यांना तोडता येत नाही !

सगळी खोलीच रडत होती. कृष्णकान्तने उघडपणे रुमाल आपल्या डोळ्यांना लावला होता. कंदर्प धावत खोलीतून बाहेर पडला. धनसुखलालनी आपल्या उपरण्याने तोंड पुसायचा प्रयत्न केला. जनार्दनला अश्रू लपवायची गरज भासली नाही. अरुणच्या वडिलांना दवाखान्यात आणणेही शक्य नव्हते. आपल्या मुलाचे सगळे आजार आपल्याला व्हावेत आणि आपला मुलगा वाचावा या खंतीने ते स्वतःच आजारी पडले होते. सुशीला आणि सुरभी मगाचपासून एकमेकांच्या खांद्यावर डोकी टेकून रडत होत्या. मन घट्ट करून अरुणच्या बिछान्याजवळ बसून राहिलेल्या पुष्पाला अरुणची ही तडफड पाहणे अशक्य झाले. तिनही आपले डोळे हाताने लपवले.

जगाला कवेत घ्यायचा प्रयत्न करणारा मनुष्य कधीकधी स्वतःच्या मर्यादा जाणवल्या की अत्यंत दीनवाणा होतो.

थोड्या अंतरावर बसलेल्या धना भगतने काही वेळाने म्हटले,

'भाऊ, बेटा अरुण, घाबरू नकोस. देवाने डोळे दिले होते. त्यानेच काढून घेतले. त्याची मर्जी ! आपण काय करणार !'

अरुणला वाटले एखादा देवदूतच त्याला आधार द्यायला आला आहे. रडव्या आवाजात त्याने विचारले,

'पण डोळ्यांवाचून मी जगू कसा ? कशाला मला जगवलं त्यानं ?'

'देव तुला शंभर वर्षांचं आयुष्य देवो, बेटा. जगणं-मरणं आपल्या हातात थोडंच आहे ? ईश्वराच्या मर्जीवाचून इथलं पानही हलत नाही.'

'हे पराधीन जीवन ! ते नसलं तरी काय बिघडतं ?'

'हे बघ बेटा, ईश्वराने तुझी दृष्टी काढून घेतली ना, आता तुझ्या प्रत्येक अवयवाला डोळे फुटतील. डोळे बंद करूनही जे दिसू शकतं तेच खरं. उघडे डोळे म्हणजे निव्वळ

भुलभुलैया आहे बेटा. सांग बेटा, तू पूर्वी पाहिलेल्यापैकी आता तुला काय काय दिसत नाही ?'

डोळ्यांसमोर अंधार असूनही अरुणला खेळकर रंजन दिसत होती. गंभीर पुष्पा दिसली. प्रेमळ सुरभी दिसली आणि टापटिपीचा कृष्णकान्तही दिसला. हे कसे झाले ? त्याचे डोळे तर फुटले होते. तरीसुद्धा हे सर्व तो कसे काय पाहू शकत होता ? माणसाला किती चक्षू असतात ? – त्यातले चर्मचक्षू तर गेलेच.

'तरीसुद्धा मला दिसतंय, असं का वाटतं ?' अरुणच्या मनात धना भगतचा प्रश्न घोळू लागला.

छोटया बुटांतली छोटी पावले दुडदुड धावताना त्याला ऐकू आली.

न पाहू शकणाऱ्या त्याच्या डोळ्यांनासुद्धा एक धावणारे बालक दिसू लागले.

'कोण असेल ते ?' डोळ्यांनी पाहायची सवय झालेल्या अरुणने डोळे ताणले. पण घोर अंधारच !

'ममा, ममा, जागे आहेत ते. ये, ये ' एक गोड आवाज इंग्रजी बोलत होता.

एका छोटया इंग्रज बालिकेचे चित्र अरुणच्या डोळ्यांसमोर उभे राहिले.

कोणीतरी हलक्या आवाजात त्या मुलीला दटावले, 'मोठयाने बोलायचे नाही '.

'मी अगदी हळू बोलीन. पण मला त्यांच्याजवळ जाऊ दे ना ममा !' मुलीचे शब्द ऐकू आले.

'कृष्णकान्त, कोण आलं आहे ?' संयम करून अरुणने विचारले.

कृष्णकान्त काही उत्तर देणार त्या आधी ती मुलगीच म्हणाली,

'मी आहे. इतक्यातच विसरलात का ? हो खरंच. तुम्ही खूप भाजला होतात नाही का. माझं लगेच बरं झालं. मी रोज तुम्हाला भेटायला येत होते. पण ममा आणि पपा मला तुमच्याजवळ येऊच देत नसत. आता मी रोज तुमच्याजवळ येईन. मी कशी तुम्हाला मिठी मारली होती ?' बोलता-बोलताच ती मुलगी हसू लागली. तिला खूप खूप बोलायचे होते.

अरुणला तो अग्निस्नानाचा प्रसंग आठवू लागला. घटनांची साखळी जमू लागली. ज्या मुलीला वाचवता वाचवता तो बेशुद्ध झाला होता, तीच ही मुलगी होती. अरुणला त्या मुलीबद्दल प्रेम वाटू लागले. ही त्याने जीवाच्या बदल्यात वाचवलेली मुलगी होती.

'तिला माझ्याजवळ बसवा ' अरुणने सांगितले.

पुष्पाने मुलीला आपल्या खुर्चीवर बसवले.

'तू कुठे बसली आहेस ?' अरुणने विचारले.

'ही काय इथे. खुर्चीवर बसले ना. दिसत नाही ?'

'माझ्याजवळ ये ना खाटेवर.'

मुलगी चटकन उठून खाटेवर जाऊन बसली. अरुणने हात लांब करून मुलीच्या अंगावरून फिरवायला सुरुवात केली.

'आता तुम्ही बरे झालात ना ?' मुलीने विचारले.

'ते समजून तुला काय करायचंय ?'

'मला तुम्हाला घरी न्यायचंय.'

'कशासाठी ?'

'माझी खेळणी दाखवायला ! नाही तर नको. आपण 'आग आग' खेळू या तुम्ही मला वाचवलंत ना तसं मी पण माझ्या बाहुलीला वाचवीन. पण तुमच्याएवढं भाजायचं नाही, बरं का' मुलगी मोठ्या गंभीरपणे आपल्या योजना सांगत होती.

अरुणला आता पहिल्यांदाच हसू आले. त्याने मुलीच्या गालावर हलकीशी चापट दिली. ती तिला लागली नाही. तो पुन्हा मुलीच्या अंगावरून हात फिरवू लागला. हात जणू अंधारात फिरत बारकाईने आपल्याला चाचपडत आहे, असे मुलीला वाटू लागले.

'अहो, हे असं काय करताय ? जसं काही दिसतच नाही तुम्हाला !' मुलीने विचारले.

तिच्या आईवडिलांनी तिच्यावर डोळे वटारले. तुरुंगावरचे वरिष्ठ पोलीस अधिकारी आणि त्यांची पत्नी अरुणला पाहायला रोज सकाळ-संध्याकाळ येत होते. सगळ्या कुटुंबाला आगीतून वाचवणाऱ्या त्या हिंदवासियाचे उपकार विसरण्याइतके कृतघ्न ते इंग्रज दांपत्य नव्हते. इंग्रज राक्षस नसतात. त्यांच्या राज्ययंत्रणेत राक्षसीपणा मुरून गेला असला तरी !

'खरं आहे तू म्हणतेस ते. मला दिसत नाही' अरुणने व्याकुळतेने सांगितले.

'इकडे ये बघू. नाठाळ पोरगी कुठली' मुलीच्या आईने तिला दटावले.

पण मुलगी अरुणच्या तोंडाकडे पाहात राहिली. थोडा वेळाने तिने काही चाळे सुरू केले. क्षणभर तिने आपले डोळे मिटून घेतले. मग उघडले. मग आपला एक डोळा मिटला. पुन्हा तो उघडला आणि दुसरा डोळा मिटला.

सगळेजण मुलीच्या त्या बालचेष्टा पाहात होते. मुलीने अरुणला विचारले, 'तुम्हाला का खरोखरच दिसत नाही ?'

'खरंच ग. मी तुला किंवा इतर कोणालाही पाहू शकत नाही.'

'मला एका डोळ्यानंही दिसू शकतं. आणि मला तर दोन डोळे आहेत. तुम्हाला मी माझा एक डोळा दिला तर चालेल का?'

मुलगी बोलून गेली. ती वेडी असेल. पण तिच्या वेडेपणाला कोणी हसले नाही. खरा हिंदू कोण? खरा मुस्लिम कोण? खरा ख्रिस्ती कोण? मूल! ज्याने आपली ओळख पटावी म्हणून अजून धर्माची चिठ्ठी आपल्या कपाळावर चिकटवलेली नसते, ते मूल! पण आपण मात्र मूल जसजसे मोठे होत जाईल तसतसे ते हिंदू किंवा मुस्लिम किंवा ख्रिस्ती यांपैकी कोणीतरी एक बनेल, अशी व्यवस्था करून टाकली आहे. आणि जेव्हा ते पूर्णपणे वयात येते तेव्हा त्याच्याभोवती धर्माचे एक प्रचंड जाळे विणले जाते. मात्र त्या धर्माचा आत्मा कधीच उडून गेलेला असतो.

डॉक्टर आले त्यामुळे मुलीचे बोलणे तेवढेच राहिले. डॉक्टर जरा रागावले. रोग्याला आता जरा विश्रांतीची गरज आहे, असे त्यांनी सांगितले. एवढ्या सगळ्या माणसांनी एकदम यायचे, त्यापेक्षा एक-दोन माणसे आळीपाळीने बसली तर रोग्याला जास्त फायदा होईल, असेही त्यांनी बजावले. म्हणून सगळे उठून दवाखान्याच्या व्हरांड्यात गेले. पुष्पा आणि कंदर्प यांनी पहिल्या रात्री दोन तास बसायचे स्वीकारले. मग रात्रीच्या पाळ्या वाटून घेऊन सगळे निघून गेले.

कंदर्पने ज्याला आगीतून वाचवले होते तो गोरा मुलगा कंदर्पचा जानी दोस्त बनला होता. त्याने आपल्या आई-वडिलांना सांगून टाकले,

'तुम्ही जा, मी यांच्याबरोबरच घरी येईन.'

'तू फार सतावतोस हं त्यांना. मुळीसुद्धा सोडत नाहीस' मुलाच्या पित्याने तक्रार केली.

'मी त्यांना बॉक्सिंग शिकवणार आहे' मुलगा गंभीरपणे सांगू लागला, तेव्हा सगळ्यांनाच हसू आवरेनासे झाले. कंदर्प हसत हसत म्हणाला,

'हो ना. यानं मला कवाईत करायला शिकवलं आहे. आता बॉक्सिंग राहिलं आहे. पण टॉम, तू मला जे काही शिकवतोयस ना, ते शिकून घेऊन मी तुझ्या वडिलांशीच लढणार आहे, बरं का?'

'मला जरा मोठं होऊ द्या हो, मग मी कोणालाच लढू देणार नाही.'

बॉक्सिंग खेळणाऱ्या त्या दोघा मित्रांना बाहेरच सोडून पुष्पा आत आली. अरुण आपल्या एका हाताची बोटे दुसऱ्या हातावरून फिरवीत होता. पुष्पाच्या हातातील बांगड्या किणकिणल्या. अरुणच्या चेहऱ्यावर थोडी प्रसन्नता आलेली पुष्पाला दिसली.

वरच्यावर राहिलेल्या अरुणचा हात तिने हलकेच गादीवर ठेवला. परंतु अरुणने पुष्पाचा हात लवकर सोडला नाही. अरुणच्या स्पर्शाने पुष्पाच्या अंगावर रोमांच उठले. परंतु तिला आवडणाऱ्या या भावनांवर अजून पावित्र्याचा शिक्कामोर्तब झालेला नव्हता. संयमाच्या संस्कारांत वाढलेल्या पुष्पाने स्वतःचा हात काढून घेतला.

'रंजनगौरी !' अरुणने हलक्या आवाजात हाक मारली.

पुष्पाने भिवया वाकड्या केल्या. तिने एकटक अरुणकडे पाहिले. चेहऱ्यावर चोरून चोरून प्रगट होणारा आनंदही नाहीसा झाला. अंगावरचे रोमांच नाहीसे झाले. तिने बोलायचा प्रयत्न केला, पण तिच्या गळ्यातून शब्दच बाहेर येईनात. मोठ्या प्रयत्नाने तिने उत्तर दिले.

'रंजन नाही.'

'मग कोण ? पुष्पाताई ?' ओशाळ्या नजरेने अरुणने विचारले.

'हो' बोलायचे मनात नसूनही पुष्पाने उत्तर दिले.

अरुणने एक खोल निःश्वास सोडला. पुष्पाला फार वाईट वाटले.

'मी एवढी शुश्रूषा, सेवा-चाकरी केली, पण शुद्ध आली तशी रंजनचंच नाव ओठावर ! बरं, रंजन नाही म्हटलं, तर एवढा खोल निःश्वास !' तिच्या मनात आले. काहीतरी मिळवण्याच्या आशेनेच सर्वजण सेवा करतात, असे नाही. परंतु कृतज्ञतेच्या ऐवजी निःश्वास ऐकू आलेले मात्र सहसा कोणाला आवडत नाहीत.

'रंजनगौरी इथे येत नाहीत, खरं ना ?'

'नाही ना. कधी आलीच की लगेच निघून जाते.'

'बऽऽरं.'

अरुण गप्प बसला. पुष्पाने विचारले,

'रंजनला बोलावून घेऊ ?'

'छे छे, नको. माझं काही काम नाही. त्यांची मर्जी नसेल तर आपण कशाला त्रास द्या ?'

तेवढ्यात आत येऊन कंदर्पने हालहवाल विचारली. पुष्पा उठून बाजूला बसली. थोड्या वेळाने अरुणने विचारले,

'पुष्पाताई गेल्या ! त्यांना फार कष्ट पडतात, नाही ?'

पुष्पा निघायच्याच बेतात होती.

# 39. पुष्पाने औदार्य परत दिले

**आली माझी बहीण ग। भेटू आपण प्रेमाने**
**धरते तुला हृदयाशी। ये ग ये ग लाडाने**
**तुझा माझा प्राणसखा। आहे एकच ग माझ्या सखये**
**परदेशवासी तो आहे। भटक्या पाखरासारखा॥**

**—न्हानालाल**

'अरे, काय मिस्त्री, एक जिना बनवायचा, त्याला इतका वेळ?' धनसुखलाल मिस्त्रीला रागावत होते. एक मोठा जिना जमिनीवर ठेवून तो वाळूच्या कागदाने (स्टॅन्डपेपरने) मिस्त्रीचे दोन-तीन मदतनीस घाशीत होते. मिस्त्री त्यांच्यावर देखरेख करीत होता.

'साहेब, आज एकदम तयार. मी असलो की वेळ लागायचाच नाही कधी. आपल्याला माहीत नाही का हे?' हातातली चिलीम एका कोनाड्यात लपवीत मिस्त्री धनसुखलालना म्हणाला. कारागीर उगीचच वेळ काढतात, असे सगळ्यांना वाटते. स्वतः कारागिरांना मात्र या समज-गैरसमजाबद्दल काहीही सुखदुःख नसते.

'आज संध्याकाळपर्यंत हा जिना तयार झाला नाही तर मी एक दमडीसुद्धा देणार नाही' मिस्त्रीने केलेल्या स्वतःच्याच शिफारशीची दखल न घेता धनसुखलाल त्याच्यावर डाफरले.

'पण साहेब, मी तुमच्याकडे पैसे कुठे मागितलेत? तुमचं काम झालं म्हणजे माझे पैसे मला पावले.'

धनसुखलाल काही न बोलता घरात निघून गेले. बरोबर कृष्णकान्तही होता. किसनला देवाच्या पायावर घालायची व्यवस्था करायची आहे, याची आठवण देऊन कृष्णकान्तला त्यांनी दवाखान्यातून ओढून आणले होते.

धनसुखलाल खोलीत निघून गेलेले पाहताच मिस्त्रीने चिलीम पुन्हा घेतली. कृष्णकान्तन ते पाहिले. आणि त्याला दिलेल्या धमकीतला फोलपणा जाणवून त्याला हसू आले.

'तू कशाला हसत होतास?' आतल्या खोलीत कृष्णकान्तला बसवीत धनसुखलालनी विचारले.

'तसं काही खास नव्हते.'

'तुला तुझा हा म्हातारा काका वेडपट वाटत असेल ना?'

'छे, छे. हे काय भलतंच? माझ्याकडून तुमचा अपमान झाला असेल तर माफी मागतो तुमची.'

'तुम्हा सुधारकांचा हा औपचारिकपणा मला पसंत नाही. जिथे तिथे अपमान व्हायचा आणि उठसूट माफी मागायची, हे कसलं तुमचं वागणं?

कृष्णकान्त आलेला पाहून सुशीला आणि पुष्पाही खोलीत येऊन एका बाजूला बसल्या होत्या. कृष्णकान्त म्हणाला,

'पण काका, अलीकडे तुम्हीसुद्धा थोडे सुधारक बनला आहात हं.'

'नाही रे बाबा, मुळीच नाही. मला ती सुधारणा मुळीच नको. तो स्वच्छंदीपणा मला मुळीच पसंत नाही. वाटेल त्याला शिवायचं. वाटेल त्याच्याकडे खायचं. स्नान करायचं नाही की कपडे धुवायचे नाहीत. पूजापाठ नाही. मनाला वाटेल ते करायचं. स्त्री-पुरुषांत काही फरक नाही. लग्न नाही. इकडे फिरायचं, तिकडे भटकायचं. ही असली सुधारणा मला नाही खपायची.

'त्या दृष्टीनं पाहिलं तर मी मुळीच सुधारक नाही. तुम्ही सांगितल्या त्या सगळ्या अटी मला मान्य आहेत. फक्त मी पूजापाठ करीत नाही, एवढंच.'

'तुझी गोष्ट सोडून दे रे. तूच काय, पण तुझ्या बापालाही चांगला ओळखतो मी. बाकी सगळं चांगलं आहे तुमचं— फक्त तो तेवढा सुधारकपणा सोडला तर! त्यामुळेच ती रंजन अजून बिनलग्नाची राहिली आहे.'

'काका, मी तिच्यासाठी एक नवरा शोधून काढलाय.'

'कोण रे?'

'आहे एक, महान कवी!' कृष्णकान्त चेष्टेने म्हणाला.

'आता फार फाजिलपणा करू नकोस. नाव सांग बघू त्याचं.'

'विमोचन.'

'अस्सं. रंजनला पसंत आहे ना?'

'तेच तर अवघड आहे. रंजनला लग्नच करायचं नाही.'

'आमच्याकडेही तसंच आहे ना. कुणाचंही नाव सुचवलं तरी पुष्पाचा आपला नकारच ! तुमच्या नादानं हिला शिकवलं. त्याचा हा परिणाम !'

बाराव्या वर्षीच मुलीचे लग्न करून टाकावे अशा मताचे आईवडील आता बाविसाव्या वर्षीही मुलीचे लग्न लावून देऊ शकत नाहीत. याचा दोष काळाच्या माथी मारावा हेच योग्य.

'पुष्पाच्या देखत लग्नाची चर्चा केली तर तिला मेल्याहून मेल्यामारखं होईल.' पुष्पाकडे वळून कृष्णकान्त तिला म्हणाला, 'पुष्पा दवाखान्यात नाही गेलीस ?'

पुष्पा खोलीतून बाहेर पडायच्याच तयारीत होती.

'नाही अजून.'

'का ग ?'

'सहज. आता माझी गरज नाही तिथे.' हे बोलताना पुष्पाचे काळीज कापत होते. ती तिथून निघून गेली.

आपल्या खोलीत गेल्यावर पुष्पाने आपल्या टेबलातून आपणच मागे फाडलेल्या त्या चित्राचे दोन्ही तुकडे बाहेर काढले. कृष्णाचे औक्षण करणारी राधा आणि तिला हसणारी एक स्त्री अशा दोघी एका तुकड्यात होत्या. तर दुसऱ्या तुकड्यात कृष्णाची गोड आकृती होती. तिने ते दोन्ही तुकडे एकत्र जुळवले आणि थोडा वेळ ती ते संपूर्ण चित्र पाहात राहिली.

तेवढ्यात खोलीत वारा आला, आणि कृष्णाचे चित्र उडून गेले.

'किती दुष्ट आहे हा कृष्ण. गोकुळातून निघून गेला तो पुन्हा कधी राधेला भेटलाच नाही.'

'खरेच. महाभारत घडवणारा, यादवी घडवून आणणारा कृष्ण अग्नीसारखाच क्रूर होता. किती सुंदर, पण केवढा निष्ठुर !'

'पण ही राधा औक्षण करायची थांबतच नाही. कृष्ण आहे कुठे आता ? मग कपाळावर बोटं कशाला मोडत बसलीय अजून ?'

प्रेमिकाच्या प्रेमाला मर्यादा नसते. त्यांचे जगच वेगळे बनलेले असते. पुष्पाही असेच एक विचित्र जग निर्माण करीत होती.

'तीही काय कमी अभिमानी होती ? ती कुठे कृष्णाच्या मागेमागे गेली ? कशी जाणार ? अशा स्त्रिया काय वाटेवर पडल्या आहेत ?'

पुष्पाला कोणाची तरी चाहूल लागली. म्हणून तिने चित्र झाकून टाकले. तो कृष्णाचा

तुकडा तर अजून बाहेरच पडला होता. आणि रंजन आत येऊनही पोचली होती.

'तू कशी ?' पुष्पाने विचारले.

'दवाखान्यातून इथे आले. तू तिथे दिसली नाहीस, म्हणून मग इथे आले.' रंजन रोज एक दोनदा दवाखान्यात जात असे. थोडा वेळ अरुणला पाहिले न पाहिले करीत असे. कोणाजवळ तरी त्याची खुशाली विचारीत असे. मग निघून येत असे. पुष्पा नेहमी अरुणजवळच बसलेली असे. एखाद्या आईने करावी अशी तिने अरुणची सेवा-शुश्रूषा केली होती. अरुण, सुरभी आणि कृष्णकान्तचा नातेवाईक होता. त्यामुळे धनसुखलालचे कुटुंबही त्याला परके मानीत नव्हते. शिवाय मिरवणुकीत जखमी झाल्यावर अरुण थोडे दिवस त्यांच्याच घरी राहात होता. त्यामुळे जो काही परकेपणा होता तो केव्हाच नाहीसा झाला होता. धनसुखलालच्या मनात आश्रमवासियांबद्दल प्रेम निर्माण झाले होते. सुरभी आणि कृष्णकान्त तिथे कायमच असत. त्यामुळे पुष्पा मनाला वाटेल तेव्हा तिथे बसत असे. यात धनसुखलालना काही वावगे वाटत नव्हते. उलट सुरभी विशेषकरून पुष्पाचीच मदत घेत असे. कारण रंजन तिथे जरासुद्धा बसत नव्हती की काही सेवा करीत नव्हती. रंजनचे हे विचित्र वागणे हा तिच्या मनाचा एकतर मोठेपणा तरी होता किंवा दुःख सहन करण्याची ताकद नसल्याचे लक्षण होते, असे मानले जाई. रंजन तिथे मुळीच येत नाही याचे कारण एकट्या पुष्पालाच माहीत होते.

पुष्पा असेल त्याच वेळेला फक्त रंजन दवाखान्यात जात असे. आज तिला पुष्पा दवाखान्यात दिसली नाही, म्हणून तिला शोधायला ती घरी आली होती. अरुणवर आपण किंवा पुष्पा यांपैकी कोणाचीही देखरेख असू नये, हे रंजनला पसंत नव्हते. तिने विचारले,

'आज तू गेली का नाहीस ?'

पुष्पाने रंजनकडे रोखून पाहिले. मग ती उत्तरली,

'नाही गेले.'

'पण का ?'

'माझी गरज नाही आता !'

'तुला कोणी सांगितलं ? चल चल, जलदी कर. तुझी आठवण करीत आहेत ते.'

'कोण ?'

'अरुणकान्त.'

'तुला सांगितलं का ?'

'मी कुठे त्यांच्याशी बोलते ? कंदर्पने सांगितले मला.'

'असं. पण रंजन तू एवढी वाळलीस कशानं ?' रंजनकडे टक लावून पाहात पुष्पाने विचारले.

'तुला तसं वाटतंय. उलट तुझ्यापेक्षा मी चांगली लठ्ठ आहे.' – रंजन आपल्या हाताकडे पाहात म्हणाली. तिची बांगडी हातावर सहज फिरत होती. आणि मग तिला जाणवले की आतापर्यंत अंगावर नीट बसणारे कपडे आता सैल व्हायला लागले आहेत.

'काय ? मी म्हणते ते खरं आहे ना ?' पुष्पाने विचारले.

'काय खरं ? आज तुझी जीभ एवढी का वळवळ करते आहे ? बरं, पण आता तिकडे जायचंय की गप्पाच मारीत बसायचं आहे ?'

'मी जाणार नाही.'

'मग कोण जाणार ?'

'तू !'

'म्हणजे ? मला जायचं नाही. असं करणार असशील तर मी मुळीसुद्धा येणार नाही मग ?'

'मग काही नाही. आताच वाळत चालली आहेस. मुळीच गेली नाहीस तर लवकर मरशील.'

'बरं, बरं. बडबड बंद कर. माझ्या मरणाची तू मुळीच काळजी करू नकोस.'

'नसती केली ग. पण कुणासाठी तरी काळजी करावी लागते आहे.'

'कोणासाठी ?'

'अरुणकान्तासाठी. तू मेलीस तर तेसुद्धा जगणार नाहीत.'

'काय बडबडतेस तू ! कालच तर त्यांना शुद्ध आली. तेवढ्यात त्यांनी तुला एवढं सांगितलं की काय ?'

'हो ना.'

'चल, खोटारडी ! डॉक्टरांनी त्यांना बोलायची परवानगीच कुठे दिली आहे ? आणि एवढी माणसे आसपास असताना अरुणकान्त सांगणारही नाहीत की मला रंजन-शिवाय जगताच येणार नाही, म्हणून.'

'अग मी खरं तेच सांगते आहे. अरुणकान्तनी असंच सांगितलंय.'

'माझा विश्वास नाही. मी विचारते ना दुसऱ्या कोणाला तरी.'

'दुसऱ्या कोणालाच माहीत नाही हे.'

'मग मी अरुणकान्तानाच विचारीन आणि तुला खोटं पाडीन.'

'पण ते तुलासुद्धा सांगणार नाहीत. ही तर शब्दांवाचूनची गोष्ट आहे.'

'मग तुला कशी समजली ?'

'हे लहान मुलालासुद्धा समजू शकतं. हे बघ, मी जवळ गेले ना तेव्हा अरुणकान्ताना वाटलं की रंजनच आली आहे. त्यांनी रंजनला बोलावलं. पण उत्तर मी दिलं. तेव्हा त्यांनी असा दीर्घ निःश्वास टाकला की मलाच मरून जावंसं वाटू लागलं.'

'तुझ्या डोक्यात हे काय भूत शिरलंय ? अशी मत्सरी केव्हापासून झाली आहेस तू ?'

'तुला काय वाटेल ते म्हण तू. पण मी आता मुळीच जाणार नाही.'

जरा वेळ रंजन गप्प बसली. मग तिच्या मनात विचार आला. पुष्पाला डोळे असलेला अरुण आवडत असे. बिन डोळ्याचा अरुण आता तिला कदाचित आवडतही नसेल.

खाटेवर पडलेल्या अरुणला ती जाणूनबुजून दुरूनदुरूनच पाहात होती. डोळे नसलेल्या अरुणला जवळ जाऊन पाहायची हिंमत रंजनला झाली नव्हती. एकदम तिच्या मनात अनुकंपा उफाळून आली.

'डोळे गेले म्हणजे काय, सगळंच गेलं की काय ? प्रेम पण नाहीसं होतं ? आईवडील, भाऊ-वहिणी एखाद्या दृष्टिहीनाला आपल्या गळ्याशी घट्ट धरतात. आणि, प्रेम-प्रेम' अशी हाकाटी करणाऱ्या, वेडावून गेलेल्या प्रेयसीचे प्रेम डोळे नाहीसे होताच ओसरून जाते की काय ? इतरांच्या प्रेमात डोळे नसले तरी चालतात, हाताशिवाय अडत नाही. पायावाचूनही बिघडत नाही. पण प्रेमाला सौंदर्य अखंडच हवे असते काय ? मग कोणाचे प्रेम श्रेष्ठ ? प्रेम म्हणजे काय फक्त सौंदर्यपिपासा ?

'कसल्या विचारात गढली आहेस ?' पुष्पाने विचारले.

'कसल्या नाही ग. तुझा विचित्रपणा समजतच नाही मला.'

'उदार बनायचा हक्क काय फक्त तुला एकटीलाच दिला आहे ?'

'मी कुठे असं म्हणतेय ? मी कधीपासून उदार झाले ?'

'अरुणकान्तला माझ्या हाती सोपवलंस तेव्हापासून ! जसं तू त्याला मला देऊन टाकलंस तसं आज मी तुला तो परत देते आहे.'

'फक्त डोळ्यांवाचून.' रंजनने टोमणा मारला. पण पुष्पाला तो जाणवला नाही. तिच्या डोक्यात दुसरीच कल्पना आली होती.

'अरुणकान्तांची दृष्टी कायम राहती तर त्यांना माझी सेवा नक्कीच दिसली असती.

मी रंजनपेक्षा काय कमी देखणी आहे ? त्यांनी तिला आधी पाहिलं म्हणून !' स्त्रीला आपल्या सौंदर्याची जाणीव स्मशानात जाईपर्यंत असते.

'पण आता मी परत नाही करणार त्याला. अजून तुला विचार करायचा असला तर विचार कर.' रंजनने पुष्पाच्या विचारात अडथळा आणला.

'मी पक्का विचार केला आहे.'

'तर मग माझ्याबरोबर येऊन मला तो परत दे.'

'चल तर. पण एका अटीवर देईन ' पुष्पा बोलली. तिने रंजनकडे काही अनाकलनीय भावनेने पाहिले.

'कसली अट ?'

'काही नाही ग. उगीचच आपलं. चल.' असे म्हणत जरा हसत, चेहरा थोडा प्रसन्न करीत पुष्पा रंजनबरोबर जाण्यासाठी तयार झाली.

रंजन मनात म्हणाली,

'स्वार्थी.'

# 40. प्रत्येकाचा मार्ग

**या पक्ष्यांनो सौधावरती**
**उघडे आहे द्वारे मनाचे**
**सर्व विश्व हे घरटे तुमचे**
**तुम्हास लाभो ईशसंगती**

**– न्हानालाल**

पोलीस स्टेशनला आग लागलीच कशी? हा प्रश्न वादग्रस्त चर्चेचा बनला. हे काम क्रांतिकारकांचेच असावे असे सरकारपक्षीय वर्तमानपत्रांनी ठरवून टाकले. तर आतल्या तीन महान कैद्यांचा काटा काढून टाकावा या हेतूने खुद्द सरकारने नाहीतर त्याच्या पित्त्यांनीच आगीचे निमित्त निर्माण केले, असा युक्तिवाद प्रजापक्षाच्या वर्तमानपत्रांनी करायला सुरुवात केली. पोलीस ठाण्यासारखी सतत पहारा असलेली इमारत जर सुरक्षित राहू शकत नसेल तर मग काहीही सुरक्षित राहाणे शक्य नाही, तेव्हा या क्रांतिकारकांचा पक्का बंदोबस्त केलाच पाहिजे, अशी मागणी सरकार-पक्षाकडून होऊ लागली. तर कैद्यांच्या जिवाविषयी बेफिकीर राहणारे सरकार प्रजेचे रक्षण करायला मुळीच लायक नाही अशी ओरड प्रजापक्षाचे लोक सभा-सभांतून करू लागले.

पोलिसखात्यातसुद्धा बरीच उलथापालथ झाली होती. गुप्त पोलिसांच्या काही हुशार अधिकाऱ्यांनी आपल्या असंख्य सहाय्यकांच्या मदतीने बऱ्याच माणसांचे जाब-जबाब घेतले, आणि संपूर्ण महाभारत लिहिता येईल एवढे कागद वाया घालवून एक केस तयार केली होती. त्यावरून कैद्यांवर आग लावण्याचा आरोप शाबित करता येईल अशी सरकारी वकिलांचीही खात्री पटली होती. ते कैदी चळवळे होते. त्यांनी सरकारी हुकमाचा भंग केला होता. आणि त्यांनी लोकांच्या भावना चेतविल्या होत्या.

भल्याबुऱ्या रीतीने त्यांना लोक मानीत होते. त्यामुळे त्यांचे जाळे सर्वत्र पसरलेले असणार. चांगल्या, पैसेवाल्या, प्रतिष्ठित कुटुंबांचे साहाय्य त्यांना मिळत होते. इतकेच काय पण हलक्या कुळातल्या अस्पृश्यांबरोबरही त्यांनी संबंध ठेवले होते. तेव्हा त्यांचे कट सर्वत्र पसरलेले असणार हे निश्चित.

तिघे कैदी एकत्रच ठेवले होते. चांगल्या जागी ठेवले होते. त्यांना भेटायचीही खूप सवलत देण्यात आली होती. अशा सवलतींचा फायदा न घ्यायला ते मूर्ख थोडेच होते! आग लागली त्याच्या थोडाच वेळ आधी कैद्यांच्याबरोबर काम करणारी रंजन एका मोटारीत बसून त्या इमारतीजवळ आली होती, थोडा वेळ तिथे थांबलीही होती. पोलिसांनी हटकेपर्यंत ती तिथून हलली नव्हती. रंजनने स्वतः ही गोष्ट मान्यही केली होती. कैद्यांच्या सोयीसाठी ठेवलेली जाळी खुद्द कैद्यांनीच तोडून टाकली होती, हे स्वतः कैदीच कबूल करीत होते. त्यांनी मोठ्या प्रामाणिकपणे त्या युरोपियन मुलाला वाचवले असे मानण्यात येते खरे, पण मग कंदर्प पोलिसांना पाहून पळून का गेला? खरे म्हणजे त्यांनी पोलिसांना आगीची बातमी देऊन त्यांची मदत घ्यायला हवी होती. तेच जास्त स्वाभाविक ठरले असते – ते स्वतः गुन्हेगार नसते तर! पण ते गुन्हेगार होते, म्हणूनच कंदर्पला पोलिसांनी पाहून पळावेसे वाटले. हा एवढा प्रसंगही कैदीच दोषी आहेत हे ठरवायला पुरेसा आहे.

गुप्त पोलिसांचे नुसलेले अधिकारी किंवा कसलेले सरकारी वकील अशी चर्चा करीत. त्यात त्यांना एकच अडचण येत होती. त्या घरात राहणारा गोरा पोलीस अंमलदार चार्ली हा कैद्यांच्याविरुद्ध कसलीही तक्रार ऐकून घ्यायला तयार नव्हता. त्याचे स्पष्ट म्हणणे होते की,

'ज्यांनी माझ्या पत्नीला वाचवले, मुलांना आगीतून बाहेर काढण्यासाठी स्वतःचा जीव संकटात घातला तीच माणसं आग लावतील हे मला मान्य नाही.'

'पण ह्याच कैद्यांनी तुमच्या कुटुंबियांना वाचवलं असं तुम्ही कशावरून म्हणता? तुम्ही घरात नव्हता ना त्या वेळी?'

'मग माझ्या पत्नीला विचारा तुम्ही.'

या प्रकरणाची चौकशी करणारा घरात आला. आणि या भयानक संकटातून वाचल्याबद्दल प्रथम त्याने चार्लीच्या पत्नीचे अभिनंदन केले. मग त्याने विचारायला सुरुवात केली.

'आग कशी लागली ते ठाऊक आहे का तुम्हाला?'

'नाही हो. मला काहीच समजत नाही!' जेनने उत्तर दिले. चार्लीच्या पत्नीचे

नाव जेन होते.

'अशा या सुरक्षित जागेला आग लागावी यात काही कट असावा, असं नाही का तुम्हाला वाटत ?'

'असेल ना तसंही !'

अंमलदार हे उत्तर ऐकून खूष झाला. तो म्हणाला,

'असंच आहे. तुम्ही समजूतदारपणे सगळी माहिती दिलीत तर ताबडतोब गुन्हेगारांना पकडता येईल.'

'मी नीट समजून उमजूनच उत्तरं देईन.'

'एक भयंकर राजद्रोही चळवळ चिरडून टाकायला त्यामुळे तुमची मदत होण्याची शक्यता आहे.'

'मला ठाऊक आहे ते.'

'जनार्दन, अरुण आणि कंदर्प यांनी रंजनच्या मदतीने ही आग लावली असा आमच्याजवळ पुरावा आहे.'

'ते तुम्हाला माहीत. मला त्याबद्दल काहीही माहिती नाही. मला आग लागल्या-नंतरची हकीकत माहीत आहे.'

'आग लागल्यानंतर तुम्ही —अरुण आणि कंदर्प यांना तुमच्या घरात आलेलं पाहिलं होतं, खरं की नाही ?'

'होय.'

'मग मला असं विचारायचं आहे की, ह्या लोकांनी आग लावली नाही असं तुम्ही कशावरून म्हणता ?'

'नाही ! नाही !! नाही !!! ह्या लोकांनी आग लावली नाही असं मी अगदी खात्रीपूर्वक सांगते. उगीच मला गोंधळात टाकणारे प्रश्न विचारू नका.'

जेन प्रक्षुब्ध झाली होती. चौकशी करणारे अशा प्रक्षुब्धतेचा चांगलाच फायदा घेतात.

'पण तुम्ही अशी खात्री कशावरून देऊ शकता ? आग लागण्यापूर्वी तुम्ही त्यांना पाहिलं असतं तर एकवेळ तुमचं म्हणणं मान्य करता आलं असतं.'

'मला आणि माझ्या मुलांना वाचवणारे लोक आग लावतील असे मला मुळीच वाटत नाही.'

'असं तुम्हाला वाटतं; पण हे खरं नाही.'

'हेच खरं आहे. ज्यांनी आगीतून माझा मुलगा बाहेर काढला, जाळातून मला

वाचवले आणि माझ्या मुलीला छातीशी धरून स्वतःचे डोळे आगीत घालवले त्याच शूरांनी आग लावली असं मलाच सांगताना तुम्हाला लाज नाही वाटत ? शेम ! शेम !

'असं संतापायचं काही कारण नाही. चार्ली, लुक हिअर. धिस इज द फेमिनिन हीरो-वर्शिप कॉम्प्लेक्स. (हे बघ, हा सगळा बायकी विभूती पूजेचा प्रकार आहे.)'

'आणि चार्ली, या लोकांविरुद्ध चौकशी होणार असेल तर मी तुला नोकरी सोडून द्यायला लावीन.'

'अग पण त्यामुळे चौकशीचं काम थोडंच थांबणार आहे ?' हसून चार्लीने विचारले.

'कोर्टात काय सांगायचं ते मी बरोबर सांगीन. असला जुलूम मी नाही चालून देणार.'

'पण आम्हाला जुलूम करायचाच नाही. आम्ही सत्य शोधून काढायचा प्रयत्न करीत आहोत.' चौकशी करणारा म्हणाला.

'मग मी सांगितलं तेच खरं आहे. खोटी चौकशी करून उगीच सत्याला लाज वाटेल असं करू नका.'

'तुम्हाला त्यांनी वाचवलं हा कदाचित योगायोग असेल. तुम्ही पहिल्यांदा त्यांना पाहिलं तेव्हा त्यांच्या चेहऱ्यावर कोणते भाव होते ?'

'देवदूतासारखे.'

'ही त्या लोकांची पूर्वीपासूनची युक्ती आहे. – नम्र चेहरा, साखरेसारखी मिट्ठास भाषा आणि जोडलेले हात. – जरा विचार करून या प्रश्नाचं उत्तर द्या हं. तुम्हाला कंदर्पने खिडकीतून ढकलून दिलं, हे तर खरं आहे की नाही ?'

'हो. मला जाळातून वाचवण्यासाठी ढकललं.'

'असं तुम्हाला वाटतं; पण धक्का मारला हे तर खरं ? आता पुढे खाली बंब-वाल्यांनी जाळं पसरलेलं होतं हे तुम्ही पाहिलं होतं ना ?'

'हो तर.'

'तुम्ही पडण्याच्या आधी ?'

'होय.'

'मग तुमच्यासारखं कंदर्पनेही ते जाळं पाहिलं होतं असं तुम्ही खात्रीपूर्वक सांग शकाल का ?'

'होय.'

'त्यानं तुम्हाला खाली जाळं असल्याचं सांगितलं होतं ?'

'नाही.'

'तर मग त्यानं खाली जाळं असलेलं पाहूनच तुम्हाला धक्का मारला असं तुम्ही कसं सांगू शकता ?'

'मग तुम्हाला काय म्हणायचंय ? त्यानं खाली न पाहताच धक्का मारून मला खाली ढकलून मारून टाकायचा प्रयत्न केला ?' जेनचे डोळे आता रागाने लाल झाले होते.

'असंसुद्धा असू शकेल. हे पाहा, माझे प्रश्न महत्त्वाचे आहेत. तुम्ही खाली पडलात तेव्हा आणखीही एक घडलं— कंदर्पलाही तुम्ही बरोबरच खाली खेचलंत. तो सांगतोय की तुमची इच्छा नसताना त्यानं तुम्हाला खाली लोटलं. आणि तुम्ही . . .'

'मी काहीही उत्तर देणार नाही. तुम्हाला उत्तर द्यायला मी बांधलेली नाही. न्यायाधीश विचारतील तेव्हा सांगेन. आणि चार्ली, आजच्या आज तू नोकरीचा राजीनामा देऊन टाक' एवढे बोलून जेन उठली. आणि आपल्या मुलीला घेऊन आत निघून गेली. तिथून ती तडक अरुणला भेटण्यासाठी दवाखान्यात गेली.

जेनने आपली सर्व हकीकत वर्तमानपत्रातून प्रसिद्ध केली. त्यात कंदर्प आणि अरुण यांच्या बहादुरीचे कौतुक मुक्तकंठाने केले होते. त्या दोघांना त्यामुळे एवढी प्रसिद्धी मिळाली, की वर्तमानपत्रातून त्यांच्या धाडसावर काव्ये प्रसिद्ध होऊ लागली. दोन्ही पक्षाच्या वर्तमानपत्रांना जेनचे पत्र प्रसिद्ध करावेच लागले. परंतु प्रत्येक पत्राने जेनच्या पत्रावर आपापल्या अग्रलेखातून आपापल्या मताप्रमाणे टीका-टिप्पणी केली. प्रजा-पक्षाच्या पत्रांनी अरुण आणि कंदर्प यांना सामान्य जनतेचे प्रतिनिधी मानून त्यांना थोरवी मिळवून दिली. तर सरकार पक्षाच्या पत्रांनी त्या दोघांचे शौर्य अपवादात्मक ठरवून एक-दोन ओळींतच त्यांना उडवून लावले. आणि जेनसारख्या इंग्रज स्त्रीचा स्पष्टवक्तेपणा हाच या सगळ्या प्रसंगात महत्त्वाचा ठरवून इंग्रजांचा संबंध, म्हणजेच त्यांचा वरचढपणा, आणखी कितीतरी काळ कायम राहायला पाहिजे, यावर भर दिला.

पण या सगळ्यामुळे गोंधळात आणखीनच भर पडली. जेन आणि तिची मुले यांच्या साक्षीविरुद्ध जात होत्या. त्यामुळे सगळ्या घटनेत सुसंगतता आणण्याचा प्रयत्न केला तरी तीत कच्चा दुवा राहात होता. मॅजिस्ट्रेट रहीमने आगीच्या या प्रसंगानंतर आरोपींना जामिनाशिवायच सोडून दिले होते. शिवाय आपण अरुणचे मित्र आहोत, असे सरकारला स्पष्ट सांगून त्याने आपल्याला हा खटला पुढे चालवता येणार नाही, असे जाहीर करून टाकले. जिवाला धोका असतानाही परक्या बायका-मुलांचा जीव वाचवणाऱ्या या शूरांविरुद्धचा खटला काढून टाकण्याचे सौजन्य सरकारने दाखवावे अशीही शिफारस त्याने केली. रहीम रोज दवाखान्यात जात होता. आणि आपला

बालमित्र अरुण याच्या शुश्रूषेत जमेल तसा हातभार लावीत होता.

अेका सकाळीच त्याला हुकूम मिळाला की, अनेक योगायोगांचा विचार केल्या-नंतर सरकारने मोठ्या दयाळूपणे अरुण, कंदर्प आणि जनार्दन यांच्यावरचा खटला पुढे चालवण्याचे रद्द केले आहे. सरकार जे काही करते ते दयावंत होऊनच करीत असते. रहीमने दुसरी पत्रे तशीच टाकली आणि तो धावतच दवाखान्यात गेला. तिथे त्या वेळी अनेक आश्रमवासीयही आलेले होते. कृष्णकान्त आणि धनसुखलालही तिथेच होते. शिवाय जेन आणि तिची मुलगी गर्ट्रचुडही तिथे होती. गर्ट्रचुड हजर असली की ती अरुणवर आपलाच हक्क असल्यासारखी वागत असे. पुष्पाही तिथे फार वेळ बसलेली गर्ट्रयुडला आवडत नसे.

रहीमने अरुणजवळ जाऊन सांगितले,

'अरुण आजपासून तू मोकळा आहेस. तुमच्यावरचा खटला काढून घेतला आहे.'

सगळ्यांनाच ही बातमी ऐकून आनंद झाला. गर्ट्रचुड तर आनंदाने टाळ्या वाजवीत नाचू लागली,

'गर्टी ! काय हे गर्टी ?' तिच्या आईने तिला दटावले.

'आता मज्जाच येईल. माझ्या बोलण्याची कशी सगळ्यांना भीती वाटली !'

गर्टीने आपले महत्त्व सगळ्यांना जाणवून दिले. आपल्या भीतीमुळेच अरुणला सोडून दिले आहे, अशी तिची खात्री होती.

'पण त्यात तुला काय मजा वाटते ? तू कळून-सवरून उड्या का मारतेस ?' चार्लीने हसत हसत विचारले.

'अरुणकान्तला आपण आपल्या घरी घेऊन जाऊ. मी त्यांना सरबत बनवून देत जाईन. दुसऱ्या कोणाला बनवता येत नाही सरबत. सगळं खराब करून टाकतात.'

अरुणने गर्टीला आपल्याजवळ खाटेवर बसायला बोलावले. थोड्या वेळाने अरुण गर्टीला उद्देशून पण सगळ्यांनाच सांगू लागला.

'गर्टी, अजून आमची शिक्षा संपली नाही. आमचा सगळा देशच तुरुंग बनला आहे.'

'तुमच्या देशालाही सोडवू आपण. मग तर झालं ? तुम्हाला पाहिजे ते मला मागत चला तुम्ही !'

सगळेच हसू लागले. परंतु त्या हास्याच्या मागे एक गंभीर सत्य लपले होते. राग-द्वेष माहीत नसलेली बालके रंगभेदाच्या पलीकडे गेलेली असतात. त्यांच्याइतके औदार्य जर मोठ्यांच्यात असते तर स्वराज्यासाठी सत्याग्रह करण्याची गरजच पडली नसती.

थोडा वेळ तिथे बसून कृष्णकान्त आणि धनसुखलाल तिथून निघून गेले. बऱ्या झालेल्या किसनला ठाकूरजीच्या पायांवर घालायचा मुहूर्त आज होता. त्यामुळे जिन्याची तजवीज करायला आणि इतर सगळ्या व्यवस्थेबाबत कृष्णकान्तची पसंती घेण्यासाठी धनसुखलाल लवकर निघाले.

नेहमी येणारी पुष्पा आज दवाखान्यात आलेली दिसली नाही, म्हणून रंजन पुष्पा-कडे गेली होती. डोळे नसलेला अरुण पुष्पाला आवडत नाही, असा विचार करून रंजनने अरुणकडे जायचा पुष्पाचा आग्रह मान्य केला, आणि दोघीही दवाखान्यात आल्या.

गर्टी त्यांना येताना पाहून चिडली.

'ही माणसं कशाला उगीच येत असतात ? त्यातली एक बाई तर तुम्हाला खूपच सतावते, खरं ना ? किती औषधं पाजते ? तिला दया नाही का हो येत तुमची ?'

अरुणने डोळे नसलेले आपले डोके हलवून गर्टीला 'हो' कार दिला. त्याला वाटले सुशीला आणि पुष्पा आल्या असतील. सुरभी तिथेच होती, आणि रंजन येईल असे त्याला वाटत नव्हते– अर्थात तो तिची प्रतीक्षा प्रत्येक क्षणाला करीत होता.

गोऱ्या डॉक्टरने येऊन प्रकृती तपासली. अरुण कायद्याच्या जंजाळातून सुटल्याची बातमी ऐकून त्यानेही अरुणचे अभिनंदन केले. हसत हसत तो म्हणाला,

'तुम्ही आता सरकारचे पाहुणे राहिला नाहीत. तेव्हा आता मीसुद्धा तुम्हाला इथे अडकवून ठेवीत नाही. आजपासून तुम्हाला मोकळीक. आता तुम्हाला बिछान्यात पडून राह्यची गरज नाही. तुम्ही सुखाने घरी जाऊ शकता.'

सगळ्यांनी डॉक्टरांचे आभार मानले. अरुणचे डोळे वाचवण्यासाठी या गोऱ्या डॉक्टरने आकाश-पाताळ एक केले होते. भूक, तहान, थकवा या कशाचाही विचार न करता दोन पायांवर उभे राहून आपण केलेली सगळी मेहनत वाया जाणार आणि हा तरुण दृष्टिहीन होणार अशी जेव्हा त्याची खात्री झाली तेव्हा दुःखाने आणि निराशेने त्याने हातातली किमती हत्यारे तोडून जमिनीवर फेकून दिली होती. आणि आपल्या बुद्धीलाच शिक्षा केल्यासारखे त्याने आपल्या दोन्ही गालांचे जोरात गालगुच्चे घेतले होते. आतासुद्धा ते दृश्य सगळ्यांच्या डोळ्यांसमोर तरळत होते.

'डॉक्टर, तुम्ही मला जीवदान दिलंत याबद्दल मी तुमचा आभारी आहे. पण हे दृष्टिहीन जीवन नसेल तर चालणार नाही का ?' अरुणने डॉक्टरांचे आभार मानताना म्हटले.

'ही चूक आहे तुझी. डोळ्यांना महत्त्व आहे खरं, परंतु आपण त्यांना फारच महत्त्वाचं

बनवून टाकलं आहे. जगाशी संपर्क ठेवण्याच्या साधनांपैकी ते एक साधन आहे. परंतु डोळयांतच सगळं काही आलं असं म्हणणं म्हणजे शरीराच्या इतर अवयवांवर अन्याय केल्यासारखं आहे. दृष्टीवाचूनही जगाशी संबंध ठेवता येतो ' डॉक्टरनी समजावले.

अरुणच्या समाधानासाठी डॉक्टरने जे सांगितले त्याने अरुणचे कितपत समाधान झाले कोण जाणे ! पण आपल्याला कुठे घेऊन जावे याबद्दल चाललेले प्रेमाचे भांडण तो ऐकू लागला. सुरभी त्याला स्वत:कडे घेऊन जाणार होती. पण जनार्दनचे म्हणणे होते, 'अरुणची जागा माझ्या आश्रमात आहे. त्याने माझ्या आश्रमाचे नाव उजळून टाकले आहे.'

'पण तिथे भाईची देखभाल कोण करणार ? सुरभीने शंका काढली.

'आम्ही सगळे इतके नालायक आहोत काय ?' कंदर्पने विचारले.

रहीमने त्यावर तोड काढली. 'आता अरुणला सुरभीताईकडे जाऊ द्या. त्याचे वडीलही तिथेच आहेत. ते आणि अरुण, दोघांना थोडे दिवस एकत्र राहू द्या. मग जरा तो सुधारला की मग तो आश्रमात येईल.'

रंजनला कोणी काही बोलूच देत नव्हते की तिच्याच्याने काही बोलवतच नव्हते ? सगळयांनी रहीमची तोड मान्य केली. तेव्हा रंजनचा चेहरा आनंदाने खुलला. पुष्पाची विचित्र मागणी ऐकून मात्र तिला आश्चर्य वाटले. पुष्पा म्हणाली,

'सुरभीताई, अरुणकान्तना घरी घेऊन जाण्यापूर्वी त्यांना आमच्या घरी घेऊन यावे लागेल.'

'ते कशाला ?'

'मी नवस बोललेय. इथून बाहेर पडतील तेव्हा प्रथम माझ्या ठाकूरजीचं दर्शन घेतील.'

रंजनला आश्चर्य वाटले. पुष्पानेही रंजनकडे पाहिले. चंद्राला भेटू पाहणारे दोन ढग जणू एकत्र येत होते.

सगळयांनीच पुष्पाच्या इच्छेप्रमाणे करायचे मान्य केले. तेव्हा पुष्पा अरुणला न भेटताच घरी गेली. सर्वांनाच एकप्रकारचा आनंद झाला होता. पण अरुणच्या डोळयांत मात्र अश्रू भरून आले होते.

'एक अवयव कमी झाला तर एवढी पराधीनता ! सगळेच माझी कीव करीत आहेत ! ठाकूरजींचं दर्शन मी कुठल्या डोळयाने घेणार आहे ?'

अरुणच्या डोळयांवर मऊ रुमाल दाबला गेला. थोडया वेळाने तो रुमाल बाजूला

करण्यासाठी अरुणने हात अुचलला. पण तो रुमाल कोणीतरी हातात धरला होता. अरुणने आपली बोटे त्या हातावरून सहज फिरवली. आपण पुष्पाला स्पर्श करीत आहोत, असे त्याला वाटले. मृदुतेचा अनुभव घेण्यासाठी अरुणला डोळ्यांची गरज भासली नाही.

'मी आहे.' रंजन चिवचिवली.

'रंजनगौरी ?' हलकेच अरुणने विचारले. त्याच्या त्या प्रश्नात आनंदाश्चर्य भरून राहिले होते. स्वर्गातून अप्सरा उतरली की फुलातून परी प्रगटली ?

'हो. का, दचकलातसे ?'

अरुणचे डोळे सजीव असते तरी ह्या क्षणी त्याने ते मिटून घेतले असते. काही सौंदर्याचा आस्वाद डोळे मिटूनच घ्यायचा असतो. काही रस डोळे मिटूनच प्यायचे असतात.

आपली सगळी सुखस्वप्ने डोळे मिटल्यावरच आपल्याला चांगली दिसतात. अरुण काहीच बोलला नाही. त्याची दृष्टी रंजनला पाहू शकत नव्हती. तरीसुद्धा आपल्या डोळ्यांत पाहण्याचे सामर्थ्य आले आहे असे वाटून अरुणने आपले हात दाबून आपले अंध डोळेही झाकून घेतले.

# 41. दिव्यचक्षू

**काळे काळे ढग जमले आभाळा**
**तेजाच्या शब्दांनी लिहिली मंत्रमाळा**
**दिक्काल दोराने गुंफले शेकडो खगोल**
**ब्रह्मांडाचा महाग्रंथ बोलतो ब्रह्मगोल**

**—न्हानालाल**

सूर्य पश्चिमेच्या दिशेने खाली उतरत होता. अरुणला कुठे आता ते पाहायचे होते ! दृष्टी असलेल्या जगाने सूर्याकडे पाहिले, त्याच्या गतीचा अंदाज घेतला, त्यावरून घटका, वेळ आणि ताम याचे प्रमाण बसवले. अरुणने काय करायचे ?

पण अरुणलाही आता पडल्या पडल्या वेळेचा अंदाज करायची सवय झाली होती. त्याने विचारले,

'सहा वाजायला आले असतील, ना ?'

'हो ना' म्हणत रंजनने त्याचे हात धरून त्याला पलंगावरून खाली उतरवले. तेवढ्यात गटी धावतच तिथे आली. आणि ती कुरकुरत रंजनला म्हणाली,

'तुम्ही मला विचारल्याशिवाय का खाली उतरवलं त्यांना ?'

'माफ कर हं गटी ! चल, आपण अरुणकान्तना गाडीत बसवू या' रंजन तिला म्हणाली.

दोघींनी अरुणचे हात धरले आणि त्याला दवाखान्याच्या खालीतून बाहेर आणले. छोट्या गटीने रंजनला बाजूला केले.

अरुणचे सगळे जगच बदलून गेले होते. एकलेपणा जाणवून देणारा गडद अंधार त्याच्या चहूबाजूला पसरला होता. सपाट जमिनीवरही त्याचा आता विश्वास नव्हता. त्याचे पाय कधी निश्चल राहातच नसत. पावलापावलावर खोल खड्डे असल्याचा

त्याला सारखा भास होत असे.

खोलीबाहेर येताच दवाखान्यातली सगळी माणसे जमा झाली. डॉक्टर आणि परिचारिकांनी अरुणशी हस्तांदोलन केले. गोरा सर्जन अरुणबरोबरच येणार होता. रहीम, चार्ली, जेन हे सगळे त्याला घरापर्यंत पोचवायला तयार होते. सुरभी, कृष्णकान्त आणि कंदर्प तर होतेच.

पायऱ्या उतरताना आपण पाताळात उतरत असल्यासारखे अरुणला वाटत होते. किती परावलंबी झालोत आपण ! एक मुलगी त्याला आधार देत होती ! डोळ्यां-सारखा एक छोटासा अवयव नाहीसा झाला, तर जीवनात केवढे फेरफार झाले !

आता त्याच्या जगण्याचा फायदा काय होता ? तो क्रांतिकारक होता, पण आता तर त्याला एक अक्षरही लिहिता येणार नव्हते ! तो हिंसावादी होता. पण आता त्याला शस्त्र कसे धरता येणार होते ? हिंदुस्थानला स्वतंत्र करण्याची त्याची महत्त्वाकांक्षा होती. आता त्याचे स्थान कुठे होते ? देशासाठी मरायचीही लायकी आता त्याच्यात नव्हती. तो मेला काय किंवा जिवंत राहिला काय त्याच्यामुळे हिंदुस्थानच्या स्वातंत्र्या-वर आता अणुमात्र परिणाम होणार नव्हता. मग त्याचा जीव वाचवण्यासाठी हे एवढे सारे लोक कशाला प्रयत्न करीत होते ?

जड हृदयाने तो मोटारीत बसला. नव्हे त्याला गर्टीने बसवले. मोटार धनसुख-लालच्या बंगल्यासमोर थांबली तेव्हा गर्टीनेच त्याचा हात धरून त्याला खाली उतरवले. तेव्हा त्याच्या मनात उपकाराची जाणीव टोचत राहिली.

'मानव एकमेकांना मारण्यासाठी जन्माला आला आहे का ?'

जिना चढत असताना त्याच्या मनःचक्षूपुढे धनसुखलालची हवेली प्रत्यक्ष उभी राहिली. तिथे घालवलेले दिवस त्याला पुन्हा आठवू लागले. जिना चढत असतानाच त्याला वरून धना भगतचा आवाज ऐकू आला.

'अरे हा निरुपयोगी आंधळा म्हातारा अजून जिवंत आहे ? मी पण आता पाहता-पाहता असाच एक आंधळा – निरुपयोगी म्हातारा होऊन जाईन ! आम्हा दोघांची जरूर काय आहे ? ज्यांची गरज नाही अशा माणसांना कशासाठी जगवलं जातं ?'

आपल्या आसपास खूप माणसे जमल्याचे त्याला जाणवले. त्याने त्या सर्वांना डोळ्यांनी पाहण्याचा प्रयत्न केला. परंतु शरीरातून गेलेला जीव शरीरात परत आला तरच मेलेल्या डोळ्यांत पुन्हा दृष्टी येईल. अरुणला आपले डोके धरावेसे वाटू लागले.

'काय झालं ? असा का चेहरा केला आहेस ?' गोऱ्या डॉक्टरांनी अरुणला दटावीत विचारले.

'सहज.'

'आनंदात रहा. तू तुझ्या माणसांच्यात जातो आहेस.'

अरुणने हसायचा निष्फळ प्रयत्न केला. रंजन तिथून बाजूला झाली तेव्हा गर्टीने पुन्हा तक्रार नोंदविली.

'ही बाई फार वाईट आहे. इथून जात का नाही ती ?'

'कोण, गर्टी ?' अरुणने विचारले.

गर्टीने रंजनचे वर्णन केले. अरुणने एक निःश्वास टाकला. रोज क्षणाक्षणाला तो जिची वाट पाहात होता ती तरुणी आज शेवटच्या दिवशी आली होती !

'कीव आली असेल माझी.'

तुकडे मागून खाणाऱ्या भिकाऱ्याच्यात आणि अरुणच्यात काय फरक होता ?

तेवढ्यात धनसुखलालची हाक ऐकू आली. ते फार कामात होते. लहान-सहान कामातसुद्धा त्यांचा गोंधळ उडत असे. त्यात आज तर खूप माणसांचे काम होते. त्यातच एका धेडाला देवाचे दर्शन घडवायचे होते. एका बाजूने जुने संस्कार त्यांच्या काळजाला तीव्र टोचणी देत होते. तर दुसऱ्या बाजूने न्यायाची भावना त्यांच्या हृदयाला पटत होती. अशा परिस्थितीत माणूस आपल्या व्यथा दाबण्यासाठी मोठ्याने बोलत असतो.

'आता मगळ्यांना बसायला सांगा. केव्हाचे उभे आहेत. आता सांजआरती होईल. . . . डॉक्टरसाहेब, माफ करा हं ! चार्लीसाहेब, मी या देवघरात कोणालाही बसायला खुर्ची देऊ शकत नाही. आपण अलगद बसा, म्हणजे जमेल आपल्याला बसायला.'

हे युरोपियन पाहुणे हिंदुस्थान जाणून घ्यायला आतुर होते. देवळे, धार्मिक कृत्ये, यांचे थोडे थोडे भाग कौतुकाने पाहून त्याचे वर्णन करून युरोपियन लोक हिंदुस्थानचे अभ्यासक बनतात. खेळणाऱ्या अजाण मुलांच्या गमतीजमती एकमेकांना सांगून खुष होणाऱ्या वडिलधाऱ्यांची कृपादृष्टी त्यांच्या ह्या अभ्यासात असते. परंतु इथे जमलेल्या युरोपियनांच्या मनात मात्र तसले काही नव्हते. अरुणच्या स्वार्थत्यागाने मुग्ध झालेली ही गोरी मंडळी अरुणला त्याच्या घरी सोडायच्या विचाराने इथे आलेली होती. त्याला ठाकूरजीचे दर्शन घेताना पाहण्याची उत्सुकता त्यांना होती. त्यातून एक धर्मनिष्ठ, कर्मठ, रूढीरक्षक, सनातनी हिंदू एका अस्पृश्याला मंदिरात प्रवेश करून देण्याचे अनपेक्षित धाडस करीत आहे, हा त्यांच्याही दृष्टीने कुतूहलाचा विषय होता. म्हणून युरोपियांप्रमाणेच मुसलमान रहीमही देवघराच्या पुढच्या भागात आला होता.

धना भगत आणि किसन लांब एका बाजूला बसले होते.

पुष्पा सगळ्यांना बसवण्याचा प्रयत्न करीत होती. त्यात धनसुखलाल स्वतःच गोंधळात भर घालीत होते. देवाच्या समोर खुर्चीत बसण्याचा कोणाचाही अधिकार धनसुखलालनी मानला नसता. म्हणूनच त्यांनी परधर्मियांसाठी बसायची व्यवस्था निराळी करण्याचे ठरवले होते परंतु या पाहुण्यांना खुर्चीवर बसायची कल्पनाच नामंजूर होती. पाटावर बसून धर्मकृत्य पाहण्याची इच्छा त्यांनी व्यक्त केली.

हलकेच मंदिराचे दरवाजे उघडले.

'उभे राहा सगळे.' हिंदू आणि अहिंदू या सर्वांना धनसुखलालनी उभे केले.

मंदिराच्या दरवाजातून आत झगमगत असलेले दिवे सर्वांना दिसत होते. शंख, चक्र, गदा आणि पद्म घेतलेली अलंकारविभूषित सावळी कृष्णमूर्ती सगळ्यांना दिसली. कोणाची ही मूर्ती ? कुठल्या युगातली ? कोणत्या भावना ती मूर्ती व्यक्त करीत होती ? असले मूर्तिशास्त्रविषयक बुद्धिनिष्ठ प्रश्न स्वधर्मियांच्या मनात उभे राहिले तरी त्यांची चर्चा इथे शक्य नव्हती. आत एक-दोघे पुजारी घंटा वाजवीत मोठमोठ्याने आरती म्हणत होते. आणि सुशीला मोठ्या भाविकपणे आपले हात नाजूकपणे हलवीत मूर्तीची आरती करीत होती. धना भगत, किसन, पुष्पा, जनार्दन आणि धनसुखलाल टाळ्या वाजवून आरतीला साथ करीत होते. ते पाहून गर्टीला आणि तिच्या भावाला मोठी मजा वाटली. आणि त्या दोघांनी सगळ्यांच्यापेक्षा जोरजोरात टाळ्या वाजवायला सुरुवात केली. डॉक्टर, जेन, चार्ली आणि रहीम गंमत म्हणून चुकतमाकत किंवा अत्यंत सफाईदारपणे हलक्या टाळ्या वाजवीत होते.

कंदर्प आणि अरुण मात्र हात जोडून उभे होते. जे देवालाच मानायला तयार नव्हते ते या असल्या बेगडी ईश्वरविषयक भावनांपुढे कसे नमणार ?

पण तसे नव्हते. असला उर्मटपणा आज त्या दोघांच्याही मनात नव्हता. माणूस मोठा आहे, शक्तिशाली आहे, हे सगळे खरे. पण त्याच्याहूनही मोठी आणि शक्तिशाली अशी एखादी घटना घडते. आणि ती मानवाला आपली मर्यादा जाणवून देते. अग्नीच्या त्या विराट स्वरूपाने दोघाही वीरांना मानवी शरीराची मर्यादा दाखवून दिली होती. त्यात अग्नीने अरुणचे डोळे नेऊन त्याला एखाद्या लाकडाच्या मूर्तीसारखे बनवले होते.

ही घटनाही आंधळी असते की तीत काही तात्पर्य असते ? कोण सांगणार ? मानवाच्या नमनाने खूष होईल अशी पामरता जर त्याच्यात असेल तरच ती नमनाला योग्य ठरते ?

'किसन, पाया पड . . . अरुणकान्त, हात जोडा.' धनसुखलालनी आज्ञा केली. त्या आज्ञेचे चटकन पालन झाले. आरती थांबली. आरतीवरून हात फिरवून सुशीलेने हात मूर्तीच्या बाजूने लांब केले, आरतीभोवती पाणी शिपडून तिने आरती बाहेर काढली.

'ही क्रिया मोठी चांगली आणि गोड आहे.' जेन म्हणाली.

'ज्याच्याबद्दल आपल्या मनात आदर निर्माण होतो त्याला अशा सुंदर पद्धतीनेच दीपदर्शन घडवले पाहिजे' डॉक्टर म्हणाले.

'नुसतं तोंड पाहून आनंद होत नाही. तर तो चेहरा प्रकाशाने उजळवून टाकून पाहिला पाहिजे' रहीमने म्हटले.

डॉक्टरने अरुणकडे पाहिले, आणि त्याचा चेहरा जरा चिंतामग्न झाला.

बाजूला बसलेल्या किसनला आरती देता देता सुशीलेने स्वतःच आपले हात किसनच्या डोळ्यांना लावले. सगळेच बोलण्यात गुतले होते. त्यामुळे कोणी पाहिले की नाही ते समजले नाही. पण किसन मात्र थोडा वेळ सुशीलेकडे पाहातच राहिला.

जनार्दनने एक अनोखे दृश्य पाहिले. त्याने अरुणला विचारले, 'अरुण !'

'जी !' जणू काही दुसऱ्याच जगात वावरणाऱ्या कोणाला तरी आपण उत्तर देत आहोत, अशा स्वरात अरुणने उत्तर दिले.

'इथे कोण कोण जमा झालं आहे, माहीत आहे तुला ?'

'हो. कोणालाही मी पाहू शकत नाही. पण आवाजावरून ओळखतो.'

'एका वैष्णवाच्या, जुन्या संस्काराच्या वैष्णवाच्या, देवघरात आपण सगळे सुधारक आस्तिक आणि सुधारक नास्तिकही जमलेलो आहोत.'

'होय.'

'अस्पृश्यांचाही त्यात समावेश आहे.'

'रहीमही इथेच आहे. म्हणजे एक मुसलमानही आहे, खरं ना ?'

'मी तेच म्हणतो आहे. सुवर्ण हिंदू आणि अस्पृश्य हिंदू ह्यांच्याखेरीज मुसलमानही आपल्यात सामील झाला आहे. केवढ सूचक आहे हे !'

'आमचा नाही समावेश केला ?' जेनने विचारले.

'तुमचा समावेश केला आहे तर ! अरुण, तुझे शत्रूही इथे आहेत.'

'माझे शत्रू कोण ?'

'पहिला शत्रू गर्टी !'

'नॉन्सेन्स (हट्) ' गर्टी चिडून म्हणाली.

'दुसरा टॉम!'

'तो काय माझा शत्रू आहे?' अरुणने विचारले.

'नुसतं इंग्रजाला पाहिलंस तरी तू भडकून जायचास. कंदर्प म्हणतो की इंग्रजांना पाहिलं रे पाहिलं की त्याच्या हातात वीज संचारते. तुला पिस्तूल दिलं तर तू काय करशील?'

'पिस्तूल फेकून देईन.'

'मला दुसरं काही सांगायचं नाही. मी आता हिंसा-अहिंसेच्या तत्त्वज्ञानातही शिरत नाही. पण मला एवढंच म्हणायचं आहे की तुझे डोळे देऊन तू चार इंग्रजांना आपलंसं केलं आहेस. तुझ्यामुळे ते साऱ्या हिंदुस्थानचे मित्र बनले आहेत. तू त्या वेळी त्या सगळ्यांना आगीत जळू दिलं असतंस तर....?'

'ते कसं शक्य होतं? त्यांना जळू द्यायला मी काय राक्षस आहे?'

'पण तुझ्यामते इंग्रज राक्षस आहेत ना?'

'बरेचसे!'

'त्यातल्या चौघांना तू मानव बनवू शकलास. मग आता सगळ्याच इंग्रजांची माणुसकी आपण जागी करू शकणार नाही का?'

अरुण कुठेतरी खोल खोल पाहू लागला. कल्पनेनेच त्याने अेक जिवंत चित्र उभे केले. थोडा वेळ ते दृश्य पाहून तो म्हणाला,

'एक मार्ग दिसतोय मला.'

'कोणता?'

'आपण असं एक देऊळ बांधू या की ज्यात हिंदू, मुसलमान, ख्रिस्ती, ज्यू, स्त्री-पुरुष सगळेच एकत्र येऊ शकतील तरच हे शक्य होईल.' अरुण म्हणाला.

'पोरा, पोरा! तुझे डोळे उघडले. देवाने तुला दिव्यचक्षू दिले रे. अरुण, हेच खरं देऊळ. त्यातच देव राहातो रे माझ्या पोरा' सद्गदित होऊन धना भगत म्हणाला.

अरुणने वर्णन केलेले चित्र आता सर्वांच्या डोळ्यांसमोर उभे राहिले. त्याच्यावर विचार करीत सगळेच थोडा वेळ गप्प बसले. रंजन प्रसाद वाटत होती. तिला डॉक्टरने एका बाजूला नेले आणि विचारले,

'अरुण आज तुझ्याच देखरेखीखाली राहाणार आहे ना?'

'होय.'

'आजची रात्र त्याला सांभाळ. कोणी ना कोणी सतत त्याच्याजवळ राहायला

पाहिजे.'

'कारण काय डॉक्टर ?'

'तुला समजून घ्यायची गरज नाही. रोग्याचा चेहरा पाहून मी हे सांगितले आहे, एवढं विसरू नकोस.'

रंजनला काही समजले नाही. तरीसुद्धा तिने डॉक्टरांची सूचना लक्ष्यात ठेवली. विमोचन एकटाच लांब बसला होता. त्याला कोणी पाहिले नव्हते. प्रसाद देताना रंजन त्याला म्हणाली,

'अरे व्वा ! तुम्ही आलात वाटतं ? मग असे मागे का बसलात ? पुढे या ना, साहित्यिक !'

'आता साहित्यिकांना कोण विचारतो ?' विमोचन हलक्या आवाजात म्हणाला. गर्टी, टॉम आणि किसनला रंजनने भरपूर प्रसाद दिला. धनमुखलाल म्हणाले, 'सगळे जमलेत तर आता धना भगतचं एक भजन ऐकू या.'

'बाप रे ! मला काय आवाज आहे ?या ताईबाई बसल्या तर मी त्यांच्याबरोबर गाईन काही.'

रंजन आणि पुष्पा प्रथम लाजल्या. पण मग भगतबरोबर गायचे त्यांनी कबूल केले. दोघीही भगतजवळ जाऊन बसल्या. तेवढ्यात मुशीलेला एकतारी आणि ढोलकीची आठवण झाली. एका पुजाऱ्याने घरात जाऊन एकतारी, ढोलकी आणि झांजा आणल्या संगीत शिकलेल्या रंजनचा हात ढोलकीवर चांगला बसला होता. लाजत लाजत पुष्पाने झांजा हातात घेतल्या. शांत वातावरणात भगतची एकतारी झणकारली. तिन्ही दलितांनी गीत सुरू केले— स्त्रियाही दलितच ना ?

ज्योत पाहिली आत्म्याची । मी आज पाहिली ज्योत
डोळे असुनी कशी आंधळी । मी पाहिली ज्योत
दुर्गम ठायी चमके ज्योती
सूर्य-चंद्र ना तिथे पोचती
—आज पाहिली ज्योत ।
गंगा थबके, चुकली यमुना
सागर उसळे, सुटे किनारा
—आज पाहिली ज्योत ।
प्रिय पिंजऱ्याची जाळी तुटली

हंस उडाला माला तुटली
—आज पाहिली ज्योत।
तुझे नि माझे भेद निमाला
अनेकतेचा एक हिंदोळा
—आज पाहिली ज्योत।
ज्ञानमुग्ध मी, वाणी थकली
ध्वनी निनादे 'तू ही', 'तू ही'
—आज पाहिली ज्योत।

ढोलकीची थाप, झांजाचा किणकिणाट आणि एकतारीचा झणकार या तिघांना एकत्र करून देणारा मानवाचा आवाज अडखळला. नास्तिकानी पण भजन म्हणायला, भजनात सामील व्हायला पाहिजे. त्यात काही वेगळीच गोडी असते— नावेत बसून डोलताना वाटते ना तशीच ! जशी जोरात झोका घेताना वाटते, तशीच ! देवासाठी नाही, आपल्या उद्धारासाठी नाही; पण आपल्या मनाला एक अनोखा रस मिळावा म्हणून तरी भजन म्हणायला पाहिजे.

सगळेच निघायची तयारी करू लागले. अरुण प्रत्येकाला शोधून काढून भेटत होता. तो देवाच्या पाया पडला तसाच इतर सगळ्यांच्याही पाया पडला. धना भगतजवळ त्याला आणले तेव्हा धना भगतने त्याला नमस्कार केला. धना भगतला अरुणमध्ये आपलेच प्रतिबिंब दिसले. दृष्टीशिवाय वावरण्याची सवय झालेल्या धना भगतला आपल्या अंधत्वाची सुरुवात आठवली. अनुकंपायुक्त आवाजात त्याने म्हटले,

'अरुणभाऊ, घाबरू नकोस बाप्पा !

"नाही भगत."

'आता कसं वाटतंय ?'

'बघा ना, पिंजऱ्याची एक जाळी तुटून गेली. पण तेवढ्यामुळे हंस कुठे मोकळा झाला आहे ?'

धना भगत थोडा वेळ काहीच बोलला नाही. नंतर म्हणाला,

'बरं, शरीराशी वैर धरू नका हं.'

अरुण हसला. आणि पुष्पाला नमस्कार करण्यासाठी त्याने पुष्पाला हाक मारली. त्याच वेळी रंजनच्या खांद्यावर हात ठेवून गप्पा मारणाऱ्या पुष्पाचे तोंड रंजन आपल्या हातांनी बंद करीत होती.

'रंजन, सकाळी मी अट घातली होती. ती आठवते आहे?'

'होय.'

'ती अट मी मगाशीच मागे घेतली. तुला अटीने बांधून ठेवण्यापेक्षा तुझ्याकडून मागून घेतलेलंच अधिक चांगलं होईल, असं मला वाटलं.'– रंजनच्या चेहऱ्यावर उत्सुकता दाटून आली. पुष्पा हसत म्हणाली.

'घाबरू नकोस. मी अरुणकान्तला परत मागत नाही.'

'मग मांग ना, वेडे. काय हवं ते माग. जे दिलं होतं ते तर राखता आलं नाही!'

'मागू? तुझं पहिलं बाळ मला... देऊन..टाक.' पुष्पाच्या तोंडावर रंजनने हात ठेवला तरी तिने ते वाक्य पुरे केलेच.

माणूस जिवंत राहण्याचा प्रयत्न करीत असतो. आपले शरीर चिरंजीव बनवण्याची कला अजून मानवाला अवगत झालेली नाही, कदाचित होणारही नाही. पण माणूस त्यामुळे पराभव पत्करीत नाही. तो आपल्या शरीराने जरी नाही, तरी दुसऱ्याच्या शरीराच्या रूपाने जिवंत राहतोच. तो जीवनात चितेची जोड मागून घेतो. हेच प्रेम! प्रेम म्हणजे जीवन, असे कोणी म्हणाले तर त्यात चुकीचे काय आहे? स्त्रीची मुलाबद्दलची भूक हीदेखील प्रेमाचीच तहान आहे—हीच जीवनतृष्णा आहे!

# 42. त्याच आकाशी एक स्त्री उगवली

**स तस्मिन्नेवाकाशे स्त्रियमाजगाम**
**बहुशोभमानामुमां हैमवतीतां**
**होवाच किमेतद्यक्षमिति ।।**

**—केनोपनिषद**

'ताई, तू जाऊन झोप आता.' अरुण सुरभीला म्हणाला. रात्र वाढत होती. अरुणचे वडील मगाशीच आपल्या खोलीत गेले होते. आश्रमवासीय आणि इतर मित्रही निघून गेले होते. गर्टीला रात्री राहायची खूप इच्छा होती. आणि सुरभी आणि कृष्णकान्तही तिला ठेवून घ्यायला तयार होते. पण तिच्या वडिलांनी त्यांच्या अडचणीत भर टाकायचे मान्य केले नाही. अरुणनेही तिला जवळ घेऊन समजावले,

'गर्टी, मी आश्रमात जाईन ना तेव्हा तुला माझ्याबरोबर नेईन. तुझ्याशिवाय माझा हात कोण धरील ? घरात सगळेच आहेत. तेव्हा तुझी जरुरी नाही, आता.'

नाराज होऊनच गर्टी गेली होती. अरुण एक तासभर पलंगावर लोडाला टेकून काही न बोलता बसून राहिला. सुरभी आपल्याजवळ बसलेली आहे हे अरुणच्या लक्षात होते. म्हणूनच अरुणने बहिणीला झोपायला जायची विनंती केली.

'मग मी झोपतो तुझ्याजवळ.' सुरभीच्या ऐवजी कृष्णकान्तचा आवाज आला.

'तुम्हीही अजून इथेच बसला आहात ? कशाला इतका त्रास घेता ? अरेरे ! मी तुमची सेवा करायची, तर तुम्हालाच माझी सेवा करायचा प्रसंग आला आहे.' अरुण म्हणाला.

'Now no melodrama you silly boy. (ए, आता वेडेपणा बस झाला हं तुझा.) आम्हाला काय त्रास पडतोय ? सोफ्यावर आरामात बसून राह्यचं याला काय कष्ट म्हणायचे ?'

कृष्णकान्त भावना उचंबळून आल्या म्हणजेच इंग्रजी बोलत असे.

'भाई, कोणीतरी जवळ झोपल्याशिवाय चालणार नाही.'

'म्हणजे तुम्ही सगळे मला कैदी बनवणार? माझे डोळे गेले म्हणून काय सगळ्यांचे डोळे माझ्यावर राहणार?'

'अरुण, यू गूज (ए मूर्खा) तुला असं वाटत असेल तर आम्ही इथून जातो. चल सुरभी त्याला एकट्याला बसू दे. . . . या रंजनला पण काही समजत नाही. इतक्या रात्रीची ही गात बसलीय!' असे म्हणत कृष्णकान्त सुरभीला घेऊन खोलीबाहेर आला.

दोघेही खरोखरच खोलीबाहेर गेले का? अरुणला काहीच दिमत नव्हते. त्याने बाहेर जाणाऱ्या पावलांची चाहूल ऐकली आणि दरवाजा बंद केल्याचा आवाज ऐकला. त्याच्या जगात आता दृश्य नव्हते. जगाच्या अंधाऱ्या विहिरीत त्याचे जीवन तडफडत दोन दिशांनी चाचपडत होते. एका बाजूला स्पर्श आणि दुसऱ्या बाजूला श्रवण. या दोहोंना सजीव करणारे त्याचे डोळे विझले होते. या स्पर्शाचा आणि श्रवणाचा आधारही त्याला सहन होत नव्हता. रंजनचे गाणे ऐकू येत नसते तर किती बरे झाले असते?

रंजन आज इतकी का गाते आहे हे अरुणला समजले नाही. तिच्या गाण्यात आज स्वस्थता नव्हती. गोड, व्याकुळ अशा स्त्रीच्या रुदनाला अनुकूल असे गीत रंजनने सुरू केले.

नयन माझे पाझरती
        कोणी धरा ही धार
सागर माझा उफाळे
        कोणी धरा सागराची लाट

गाणे आणि दिलरुबा दोन्हीही एकदमच बंद झाले. गुजराती भाषेतील गीतात भाव भरलेले नसावेत. रंजनने हिंदी चीज सुरू केली.

मेरो मन नंदलाल सो
        अटको . . .

गौड सारंगाचे सूर आळवताना त्यात जास्त कैफ जाणवू लागला. त्यात व्याकुळतेचा पूर्ण अंश उतरू शकला नाही. म्हणून तिने तेही गीत अर्धवटच सोडून दिले. आणि करुण सुरात झुलणाऱ्या बागेश्रीत तुलसीदासाची चौपाई गायला सुरुवात केली.

जय जय जय गिरिराज किशोरी
जय महेश मुखचंद्र चकोरी
जय जय जय गिरिराज किशोरी

स्वयंवरापूर्वी रुक्मिणीने अंबिकेचे स्मरणदर्शन घेतले होते, त्याची आठवण होताच रंजन भावपूर्ण परंतु मर्यादशील गुर्जरी गरबी गाऊ लागली.

सुन्या सुन्या या सरोवरी
ये रे राजहंसा
सुन्या या सरोवरी ये . . . !
. . .     . . .     . . .
हृदयीच्या सरोवरी
ये रे राजहंसा ।
हृदयीच्या सरोवरी ये . . . !

आणि ती एकदम अडखळली. अरुणने लांबून आलेले सुरभीचे शब्द ऐकले.

'रंजनवन्स, आज झोपायचं नाही का ?'

'आलेच. मी गाणं बंद करते. आज गायलाच जमत नाही.'

आता अरुणची श्रवणसृष्टीही संपली. त्याला जिवंत ठेवता ठेवताच सूर अडखळले. मध्यरात्रीची घोर शांतता त्याच्याभोवती पसरली. मृत्यू असाच सुन्न असेल काय ? मृत्यूचा अनुभव घेण्यासाठी त्याने शांततेत बुडी मारली. थोड्याच वेळात त्याच्या लक्षात आले की त्याचे हृदय धडधडत आहे.

'एवढ्या शांततेत या हृदयाचा केवढा आवाज येतो !'

त्याला त्याच्या काळजाचीच चीड आली. हृदयाची धडधड ऐकू येऊ नये म्हणून त्याने कुशी बदलली. आणि तो दचकून उठून बसला. त्याच्या शरीरातला अणून् अणू जिवंत होता, जागा होता. त्याच्या डोक्याला उशी टोचली. हातापायाना बिछाना टोचला, त्याच्या अंगावरचे पांघरूण त्याला टोचले. स्पर्शाचा ईश्वर त्याच्या सर्व शरीराला व्यापून राहिला होता.

'कुठे आहे शांती ?' त्याने उशी फेकून दिली.

स्पर्शाबरोबरच त्याचा श्रवणदेवही जिवंतच होता. त्याला उशी जमिनीवर पडल्याचे जाणवले.

आपली ही दोन्ही इंद्रिये आपल्याला चिडवीत असल्याचा अरुणला भास झाला.

'ही कसली थट्टा ? डोळ्यांबरोबर जीवही का नाही जात ? माझे स्थान कुठले ? माझे काम कोणते ?'

त्या प्रश्नांनी जणू उत्तरे मागितलीच अशा तऱ्हेच्या विचारात अरुण गढून गेला. 'माझी जागा सेवादलात आहे . . . . पण तिथे मला कोण घेऊन जाणार ? कदाचित

थोडे दिवस गर्दी येईल.... रंजन येणारच नाही ना ? रंजनचा आवाजही इतक्या दिवसानंतर आज ऐकला. आणि तिला पाहिलं तर...'

अरुणने आपला हात पकडला. आंधळ्याची सगळ्यांनाच दया येते असे त्याला दिसून आले होते. आंधळ्याबद्दल कोणाला प्रेम वाटत नाही. त्याने हात खाली आपटला.

'मला कुठेच स्थान नाही. दयेच्या एका कोपऱ्यात माझी जागा आहे.' तो जरा सावरून बसला. त्याने आपल्या दुसऱ्या प्रश्नाचेही उत्तर शोधून काढले.

'मग माझं काम तरी कोणते? हं, एक काम होतं– देशसेवेत मरून जाण्याचं. पण आता हे काम कोण करणार ? इतरांनी धरल्यावर मी कसा मरणार ? अरेरे, मरायचीही माझी लायकी राहिली नाही ना ?'

त्याने हात छातीवर ठेवला आणि सदरा हातात गच्च धरून पिरगळला. पुन्हा तो स्वस्थ झाला. पण त्याच्या त्या स्वस्थतेत एकप्रकारची उग्र भयानकता होती. त्याच्या आंधळ्या मुखावर जरा हास्य चमकले. खोलीला डोळे असते तर ते हसू पाहून खोली हादरली असती. त्याने अंथरुणावरून सगळीकडून हात फिरवला. आणि रजईखालचे पातळ पांघरूण ओढून काढले. त्या पांघरुणावरून एक-दोनदा हात फिरवून त्याने त्याला एक गाठ मारली. मग त्याने खोलीत चहूकडे नजर फिरवली. आपण काहीही पाहू शकत नसल्याचे त्याला फिरून जाणवले, आणि पुन्हा छातीत एक भयानक कळ उठली.

थोडा वेळ थांबून त्याने हाक मारली,

'ताई.'

खोलीने उत्तर दिले नाही.

'कृष्णकान्त.'

'कोणी आहे का इथे ?'

खोलीत अनेक वस्तू पडल्या होत्या, पण त्यांना जीव नव्हता. कोणी हलवले तरच त्या हलतील अशा असहाय्य होत्या – अरुणसारख्याच !

खोलीत कोणीही नाही याबद्दल अरुणची खात्री पटली. त्याने पांघरुणाचे एक टोक गळ्याभोवती गुडाळले. मग दोन्ही टोके हातात धरून पुन्हा एकदा नजर चौफेर फिरवली आणि मग चेहरा कठोर करून त्याने दोन्ही हातातील टोके खूप ताकदीने ओढली.

क्षणभरातच आपल्याला नीरव शांतता लाभेल अशी त्याची कल्पना होती. परंतु कितीही प्रयत्न केला तरी त्याचे हातच खेचले जाइनात ! एक अपरिचित स्पर्श त्याचे

हात सोडवत असल्याचे त्याला जाणवले. तो दचकला. त्याला शब्दही ऐकू आले:

'फार झालं. आता बस करा ! फास घेता तर येत नाही !' रंजनचा हसरा, खेळकर आवाज त्याला ऐकू आला.

'रंजनगौरी, तुम्ही इथेच होतात ?' अरुणने घाबरून जाऊन विचारले.

'मी कुठेही असेन, पण मी तुमचं शौर्य पाहिलं. शेवटी असंच करायचं होतं ना ?' रंजनचा सूर उपहासाने भरलेला होता.

'आणखी काय करू शकणार होतो मी ? जगावरचा माझा भार कमी करणार होतो.'

'बघू, बघू, तुमचा किती भार आहे तो.' अरुणचा हात उचलीत रंजन म्हणाली.

'मला हसू नका, रंजनगौरी. मला मरू नाही दिलंत, ठीक आहे. पण मी आंधळा जिवंत असूनही मेलेलो आहे.'

'मी तुम्हाला दृष्टी दिली तर ?'

'जगलो तर कोणाचे तरी डोळे घेऊनच जगणार ना ?'

'तर मग माझ्याच डोळ्यांनी पहा की !'

'नाही नाही रंजनगौरी, मी जगूच शकणार नाही !'

'मी जवळच आहे ना. मी बरी मरू देईन ?'

'पण मला जिवंत ठेवून तुम्ही करणार काय ? मी घरात काही कामाचा नाही. कुटुंबाच्या उपयोगी नाही की देशाच्या फायद्याचा नाही.'

'पण माझ्या तर उपयोगाचे आहात ना !'

अरुणचा हात अजूनही रंजनच्याच हातात होता, हे अरुण विसरला होता. रंजनचे शब्द ऐकून त्याने आपला हात काढून घेतला, आणि तो रंजनकडे पाहू लागला. रंजनने आपली नजर वळवली. अरुण, नसलेल्या डोळ्यांनी आपल्याला निरखीत आहे हे लक्षात येताच रंजनच्या चेहऱ्यावर लाली चढली.

'रंजनगौरी, तुमची काहीतरी चूक होते आहे !' जरा वेळाने अरुण म्हणाला.

'चूक तुमचीच होत असेल, माझी नाही.'

'मला दृष्टी नाही, हे माहीत आहे ना तुम्हाला ?'

'नाही बाई. आताच तर माझ्याकडे पाहात होता ना तुम्ही ?'

'रंजनगौरी, साऱ्या आयुष्यभर दया पुरायची नाही.'

'माणसाच्या हृदयात दयेखेरीज इतरही भावना असतातच की!'

'मी म्हणजे एक ओझं आहे !'

'बरं, आणखी काही सांगायचं आहे?'

'तुमच्या आश्रयाने कायम राहणारा नवरा चालेल का तुम्हाला?'

रंजन मोठमोठ्याने हसू लागली.

'हो. चालेल चालेल. मला असाच नवरा पाहिजे. जगातल्या स्त्रियांना विचारून पाहा तुम्ही. आता आम्हीच पुरुषांना संरक्षण देणार आहोत.'

'पण मी असा आश्रित बनून कसा राहू शकेन?'

'अस्सं होय? स्त्रियांना आश्रित बनवताना लाज नाही वाटली? आणि आम्ही आता तुम्हाला आश्रित बनवायला लागलो तर तुमचा पुरुषाभिमान दुखावला जातो काय?'

'नाही, नाही, तसं नाही. पण . . .'

'सांभाळा, आता आणखी सरकत जाल तर खाली पडाल. पलंगाच्या कडेला आला आहात तुम्ही.'

रंजनच्या शरीराच्या सान्निध्यापासून दूर जायचा प्रयत्न करता करता अरुण हळूहळू पलंगाच्या एका टोकाला आला होता. आता त्याला सरकायला मुळीच वाव नव्हता.

'रंजनगौरी, सगळं जग तुम्हाला मूर्खात काढील, आणि मला स्वार्थी म्हणेल. इकडे यायच्या आधी तुम्ही भाईला विचारलं होतं?' रंजनचे वेड कमी व्हावे म्हणून अरुणने दुसरा मार्ग शोधून काढला.

'मी कशाला विचारू? भाई मला कधीच कशाला 'नाही' म्हणत नाही. आणि जग काय म्हणेल याची चिंता आतापर्यंत तुम्ही किंवा मी कधीतरी केली आहे का?'

'पण स्वार्थाची टोचणी मला तरी आयुष्यभर लागतच राहील.'

'पण कशासाठी? तुम्हाला माझ्या संपत्तीची भीती वाटते? मी तर ती संपत्ती केव्हाच आश्रमाला देऊन टाकली आहे.'

अरुण बराच वेळ गप्प राहिला. रंजनही काही न बोलता बसून राहिली. अरुणला चिकटून बसली होती का ती? अरुण पुन्हा दचकला. पण त्याला आता सरकणं शक्यच नव्हते. शांत परंतु भारावलेल्या वातावरणात दोन हृदये धडधडत होती. भावना नेहमीच शब्दांच्या पलीकडच्या असतात. मनात असते ते सगळेच बोलता येत नाही. आपला गोंधळ लपवीत अरुण म्हणाला,

'पण जगून मी करू तरी काय?'

'आतापर्यंत करीत होता तेच.'

'म्हणजे?'

'ध्वज घेऊन पुढे चला.'

'डोळे असताना ध्वज फडकावू शकलो नाही. तो आता डोळे गेल्यावर काय करणार? माझा ध्वज कधीच पडून गेला.'

'नाही, नाही. हा काय इथे आहे.' रंजनने आपल्या छातीजवळच्या कपड्यातून एक छोटा ध्वज काढीत म्हटले. तिने तो ध्वज अरुणच्या हातात दिला.

ते एक खेळणे होते. दागिना होता. एका बोटात धरता येईल असे ते ध्वजाचे प्रतीक होते. परंतु त्या प्रतीकात हिंदुस्थानची प्राचीन प्रतिष्ठा, चालू तपश्चर्या आणि भावी स्वतंत्रतेच्या आकांक्षा भरलेल्या होत्या. सर्वव्यापी परमेश्वर आपल्या हृदयात अंगठ्याएवढा बनून राहातो ना? मग हिंदमातासुद्धा ध्वजाच्या रूपाने छोट्या स्वरूपात हिंदवासियांच्या हृदयात का बरे नाही विराजमान होणार?

अरुणच्या चेहऱ्यावर थोडे तेज चमकू लागले. त्याने मोठ्या भक्तिभावाने तो छोटा ध्वज हातात धरून ठेवला. एकाएकी त्याच्या हातातून तो ध्वज खाली पडला. आणि रंजन एकदम बोलली,

'घाबरू नका. मी ध्वज उचलून घेऊन उभारीन.'

पुरुषाकडून न उभारला गेलेला ध्वज एक स्त्री उभारील? रंजनचे हे म्हणणे म्हणजे हिंदुस्थानच्या आणि जगाच्या भविष्याची नांदी तर नाही ना? नांदी का म्हणून? —असे व्हायलाच लागलेले आहे

'रंजनगौरी, तुम्ही देवता आहात!' अरुण म्हणाला.

'फार छान. आता असं बोलायचं नाही. आपण काही नाटक करीत नाही,' रंजन फणकारून म्हणाली.

'मग काय म्हणू?'

'तुम्ही व्याकरण शिकलात ना?' रंजनने विचारले.

अरुणला काही समजलेच नाही. त्याने उत्तर दिले,

'शिकलो असलो तरी आता विसरून गेलो आहे.'

'मग आता मी शिकवते. सर्वनाम म्हणजे काय ते माहीत आहे ना?'

'हो.'

'द्वितीय पुरुष कोणते ते सांगू शकता?'

'होय. तू आणि तुम्ही.'

'आणि एकवचन माहीत आहे?'

'तू.'

'तुम्ही', 'तुम्ही' करता आहात. मी तर लाजेने अर्धमेली झाले.'

'म्हणजे ? मी तुम्हाला 'तू' म्हणून म्हणायचं ?'

'आता एवढंही समजत नाही ?'

'नाही, नाही. मी तुम्हाला एकवचनाने कधीही हाक मारू शकणार नाही. तुम्ही तर पूजनीय. . . .'

'पाहा हं, आता पुन्हा 'तुम्ही' म्हणालात तर मी गळयाला फास लावीन.'

'लावा.'

'अस्सं काय ?' असे म्हणत रंजनने अरुणच्या गळयाभोवती दोन्ही हात जोराने दाबल्याचा अभिनय केला. अरुण घाबरून गेला.

'अहो, अहो, सोडा मला.'

'कोणाला म्हणताय ? कोणी हात धरलेत?'

'तुम्ही.'

'तुम्ही म्हणजे कोण ?'

'रंजनगौरी , तू.'

'कशावरून म्हणताय ?'

'तुला मी पाहतोय ना, त्यावरून.'

प्रेमिकांना डोळेच नसतात. रात्री भाईंची पूसतापास करायला आलेल्या सुरभीने दरवाजा उघडलेला होता हे त्या दोघांपैकी कोणाला समजलेच नाही. सगळया खोलीभर, एकच आवाज घुमे– 'तू. तू. तू.'

---